KÂVYASANGRAHA. 50.

# THE MAHÂBHÂRATA

OF

# MOROPANTA,

THE GREAT POET OF THE MAHÂRÂSHTRA.



## 12. SHÂNTIPARVA.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

BÂLKRISHNA ANANT BHIDE, B. A.

AND

DATTÂTRAYA KESHAV JOSHI.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JAVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJI'S "NIRNAYA-SÂGARA" PRESS

Bombay.

1904.

*Price 8 Annas.*

# मोरोपंतकृत महाभारत.

## १२. शांतिपर्व.

(गीतिवृत्त.)

### अध्याय पहिला.

रविपुत्राद्यखिलांच्या उत्तरकार्यासि लागला मास; ।
मग आले भेटाया धर्मास मुनींद्र जेंवि रामास. ॥ १

आले दूर कराया सकळा बाधा रविप्रभ व्यास, ।
नारद, देवल, अन्यहि जे जे आधार विप्र भव्यास. ॥ २

बहु शतसहस्र भूसुर बसविले स्वासनीं पदीं नमुनी, ।
त्यांत वदे धर्मातें श्रीनारद जो सदा अदीन मुनी. ॥ ३

'या यदुपतिप्रसादें गेले विलयासि सर्वही दुष्ट, ।
शोक नसे कीं कांहीं? धर्मा! झालास कीं जयें तुष्ट?' ॥ ४

धर्म म्हणे, 'जय झाला श्रीकृष्णब्राह्मणप्रसादानें, ।
पटु आश्रितांसि द्याया नाहीं कल्पद्रुगण असा दानें. ॥ ५

परि माझ्या दुर्दैवें जय अजयाकार जाहला स्वामी! ।
सुख काय त्यांत, नाहीं सौभद्र द्रौपदेय ज्या धामीं? ॥ ६

सुतशोकीं कृष्णेला राज्याच्या काय हर्ष लाभाचा? ।

---

१. **'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति'** या अष्टादशाक्षरी मंत्रांतील बारावें अक्षर पंतांच्या संकल्पाप्रमाणें या बाराव्या पर्वाचें आद्याक्षर आहे. २. रवि+पुत्र+आदि+अखिलांच्या=कर्णादिक जे सर्व त्यांच्या. ३. क्षत्रियांस बारा दिवस आणि युद्धांत अधर्मानें मारिलें त्याबद्दल अठरा दिवस मिळून एक महिना अशौचांत घालवावा लागला. ४. [व्यासादि] मुनिश्रेष्ठ. ५. रवीसारखी प्रभा आहे ज्याची; सूर्यासारखा तेजस्वी. ६. पांडवांचे उपाध्याय जे धौम्यमुनी त्यांचा भाऊ. ७. कल्याणास. ८. ब्राह्मण. ९. आनंदी. 'सिद्धूरें सत्कारुनि, बैसविला आपुल्या पदीं नमुनी । सर्वत्र पूज्य ज्यासम कोणीहीं, जो कधीं न दीन मुनी ॥.' (पंतकृत विनायकमाहात्म्य—अ० ४. गी० २.) १०. विलयासी गेले=नाश पावले. ११. तयार, सिद्ध. १२. द्यावयास. १३. कल्पवृक्षसमुदाय. अन्वय:—आश्रितांसि दानें द्याया कल्पद्रुगण असा पटु नाहीं. १४. अपयशोरूप.

**प्र**भुसि म्हणेल **सु**भद्रा, 'सुख भोगुनि फार हर्षला भाचा[1]!' ॥ ७
झांकुनि[2] मंत्र[3] **पृथे**नें अतिदुःसह दुःख मज दिल्हें बा! हें, ।
पाहें मनांत सानुज[4] दहनीं[5] मी आज भाजलों आहें. ॥ ८
नागायुतबळ[6], अप्रतिरथ[7], जो सुव्रत[8], दयालु, बहु दाता, ।
तो **क**र्ण स्वसुत, असें मज देतां[9] तोय बोलिली माता. ॥ ९
प्रथमचि[10] दिनमणि[11]पासुनि हे **कुं**ती प्रसवली, न राधा[12], त्या; ।
आलें[13] सुयश कधीं सुतरत्न समर्पुनि असें नरा **धा**त्या? ॥ १०
बा! उपजतांचि घालुनि पेटींत तनुज नदींत वाहविला, ।
मद्दुर्दैवेंचि **पृथे**करवीं सदपत्यविरह सोहविला[14]. ॥ ११
तो भाग्यें सांपडला[15] **रा**धेला अर्पिला अधिरथानें[16], ।
द्रवली[17] उदयीं शशिमणिपात्रेंशीं; न धरतीच थिर थानें. ॥ १२
**भा**रत[18], **यु**धिष्ठिराग्रज, **कौं**तेय म्हणोत विप्र, सूत[19] न यां[20], ।
म्हणुनि रणापूर्वी[21] हें नातें हे ऐकवि प्रसू[22] तनया[23]. ॥ १३
निज[24]गुरुनिदेश सुयशस्कर[25] माथां धरिल तोक सामान्य, ।
होय कृतघ्नत्वप्रद जरि, तरि कवि[26] करिल तो कसा मान्य? ॥ १४

---

१. अभिमन्यु. अन्वयः—भाचा सुख भोगुनि फार हर्षला (असें) सुभद्रा प्रभुसि म्हणेल. व्याजोक्ति आहे. अभिमन्यु हा लहान वयांतच समरांगणीं पडला ह्या गोष्टीकडे ह्या उक्तीचा संबंध आहे. २. गुप्त ठेवून. ३. गुह्यगोष्ट. ४. भावांसह. हें 'मी' ह्याचें विशेषण. ५. शोकाग्नीं ६. दहा हजार हत्तींचें बळ आहे ज्यास असा. ७. नाहीं बरोबरीचा योद्धा ज्यास अस अद्वितीय. ८. सत्यप्रतिज्ञ. ९. (अंत्यविधीचे वेळीं), पाणी देतांना. १०. आमच्या आध कुमारिकादशेंतच. ११. सूर्यापासून. १२. जिनें कर्णास वाढविलें व आपला पुत्र म्हटलें कर्णमाता. १३. असें सुतरत्न नरा समर्पुनि धात्या कधीं सुयश आलें? आजपर्यंत कोणा मानवाला असें सुतरत्न प्राप्त झालें नव्हतें—असा भाव. १४. सोसावयास लावि १५. सांपडलेला. हें 'तो' ह्याचें विशेषण. १६. सत्यकर्मा नामक राजास ब्राह्मणीपा झालेला पुत्र. हा पुढें सूतकर्म करणारा झाला. ह्याच्या स्त्रीचें नांव राधा. १७. चंद्रकांत मण्या पात्रें जशीं चंद्रोदय होतांच पाझरूं लागतात, त्याप्रमाणें कर्णाला पाहतांच राधेला पान्हा फुट १८. भरतकुलांत उत्पन्न झालेला. १९. किरात; सारथि. २०. कर्णाला. २१. भारतीययुद्धापू २२. माता, कुंती. २३. कर्णास. २४. आपल्या वडिलांची आज्ञा. २५. कीर्तिप्रद. २६. शहा अन्वयः—सुयशस्कर निजगुरुनिदेश सामान्य तोक माथां धरिल; तो (निदेश) कृतघ्नत्वप्रद जरि तरि कवि कसा मान्य करिल? कीर्तिप्रद अशी वडिलांची आज्ञा साधारण मुलांच्याही आद पात्र होते; पण, तीच आज्ञा पाळण्यानें हरामखोरपणाचा दोष जर पदरीं येणारा असेल

काव्यसंग्रह. ५०.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

'कैः पुण्यैः प्राप्तमेतत्सकलमपि सखे! चित्रवृत्तं मयूर!' ॥ सुभाषित.

## १२. शांतिपर्व.

हें

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.

व

दत्तात्रय केशव जोशी

यांनीं

अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन अनेक हस्तलिखित प्रतींच्या आधारें तयार केलें.

तें

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१९०४.

किंमत ८ आणे.

'श्रीमन्मयूर, रसवित्, प्रतिभानदीन,
जो वागलंकरणसद्धटनाप्रवीण, ।
त्याची सुवर्णपदका कवितासुमाला
ही अर्थरत्नखचिता दिधली बुधांला ॥'

'काव्यसंग्रह'कार.

# प्रस्तावना.

१. मोरोपंती आर्याभारतांतील शांतिपर्व आज आम्ही मराठी वाचकांस सादर करीत आहों. महाभारतांतील शांतिपर्व हें बारावें पर्व आहे. यांत आप्तांच्या वधानें व्याकुळ झालेल्या धर्मराजास धर्मबोध करून, भीष्मांनीं त्याच्या उद्विग्न व संन्यासातुर मनाला शांतिलाभ करून दिला असल्यामुळें, याला शांतिपर्व हें नांव साजेसेंच आहे.

२. मूळ भारतांत शांतिपर्व फारच मोठें व अत्यंत महत्वाचें आहे. अध्यायसंख्येनें हें इतर सर्व पर्वांपेक्षां मोठें असून, यांत मुख्य मुख्य राजकीय, सामाजिक व पारमार्थिक विषयांचें बरेंच विस्तृत विवेचन आल्यामुळें, याची थोरवीही बिनमोल आहे. या पर्वाचे मूळांत विषयानुरोधानें तीन विभाग केलेले आहेत.—(१) राजधर्म, अध्याय १३०; (२) आपद्धर्म, अध्याय ४३; व (३) मोक्षधर्म, अध्याय १९२. तेव्हां या पर्वांत एकंदर अध्याय ३६५ आहेत. पैकीं पहिल्या ५५ अध्यायांत धर्माला अभिषेक होऊन तो कृष्णाच्या संमतीनें भीष्माकडे उपदेशग्रहणार्थ गेला, इतका प्रास्ताविक कथाभाग आहे, व एवढाच भाग मुख्य मुद्दा यत्किंचितही न सोडतां पंतांनीं आपल्या शांतिपर्वांत गोंविला आहे; व बाकी राहिलेल्या ३१० अध्या-

---

१. मुक्तेश्वराच्या हिशोबानें पाहिलें असतां, शांतिपर्व १३ वें ठरतें. पंतांप्रमाणेंच मुक्तेश्वरांनीं गदापर्व हें स्वतंत्र दहावें पर्व गणिलें आहे. परंतु पंतांप्रमाणें त्यांत सौप्तिकाचा अंतर्भाव न करितां, तेंही स्वतंत्र म्हणजे अकरावें पर्व मानिलें आहे व तें काव्यसंग्रहांत 'मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यां'त प्रसिद्धही झालें आहे. तेव्हां मुक्तेश्वरांच्या गणनेनुसार सौप्तिकापुढील स्त्रीपर्व १२ वें ठरून, त्यापुढील शांतिपर्व १३ वें ठरतें. असाच हिशोब पुढें करीत गेलें म्हणजे मौसलपर्व १७ वें येतें. परंतु मुक्तेश्वरांनीं तें पर्व (मूळभारताप्रमाणेंच) १६ वें असल्याचें स्पष्ट लिहिलें आहे. तेव्हां शांतिपर्व व मौसलपर्व या दोन पर्वांच्या मध्यंतरींच्या पर्वांपैकीं कोणत्यातरी दोन पर्वांचा मिलाफ करून, मुक्तेश्वरांनीं त्यांचें एकच पर्व हिशोबाला धरिलें आहे हें उघड आहे. आतां हीं दोन पर्वें कोणतीं, हें जाणण्याला मात्र कांहीं साधन नाहीं. आमच्या जवळ संस्कृत भारतापैकीं सौप्तिक, शांति व अनुशासन पर्वांची एक जुनी हस्तलिखित पोथी आहे. तींत शेवटच्या पर्वावर 'अनुशासन' असें न लिहितां, 'शांतौ दानधर्मः' असें लिहिलेलें आहे. इतकेंच नव्हे तर आंतही जेथें जेथें महत्वाचे विषय किंवा उपाख्यानें समाप्त झालीं आहेत, तेथें तेथें 'शांतौ दानधर्मे' असेच शब्द आहेत. परंतु मुक्तेश्वरांनीं अनुशासनाचा शांतिपर्वांत मिलाफ केला असेल असें वाटत नाहीं, कारण या विषयाविषयींच्या त्यांच्या ओव्या अशा आहेत:—आदिपर्व, सभापर्व, । वन-विराट-उद्योगपर्व, । भीष्म-द्रोण-कर्णपर्व । शल्य, गदा दहावें; ॥ ११६. सौप्तिक-स्त्रीपर्व, शांतिपर्व । अनुशासन-अश्वमेधपर्व, । व्यासाश्रम-मौसलपर्व, । हें सोळावें जाणिजे; ॥ ११७. महाप्रस्थानिक सत्रावें, । स्वर्गारोहण अठरावें । भारतपर्वांचीं हीं नांवें । अनुक्रमें जाणावीं. ॥ ११८. (मुक्तेश्वरकृत आदिपर्व, अ० १.)

यांतील विषयांचा दोन गीतींत केवळ नामनिर्देश करून, त्यांस अक्षता दाखविल्या आहेत. असें करण्यांत पंतांचे दोन हेतू असावेतः—मध्येंच निरनिराळ्या विषयांसंबंधें लांबच लांब चऱ्हाट वळल्यानें रसभंग होऊन कथासूत्रही तुटल्यासारखें वाटतें, तरी असें होतां होईल तों घडूं द्यावयाचें नाहीं, हा एक हेतू; व भारतांतील सर्वच गोष्टी आर्याभारतांत उतरूं लागल्यास, ग्रंथाचें भारूड फार वाढून, हें काम आपल्या हातून पार पडणार नाहीं, अशी पंतांस भीति वाटत असल्यामुळें मुख्य कथासूत्र अखंड राखून, इतर गोष्टींचा शक्य तेवढा संक्षेप करावयाचा, हा दुसरा हेतू. हे दोन्ही हेतु पंतांनीं भारतांत अथपासून इतिपर्यंत सतत नजरेसमोर ठेविलेले आहेत.

३. पंतांच्या भारतांतील विशेष मोहक, रसाळ व प्रतिभादर्शक स्थळें म्हटलीं म्हणजे त्यांतील संवाद होत. हे संवाद म्हणजे त्या त्या पात्राच्या स्वभावाचें प्रतिबिंब दाखविणारे आरसेच आहेत. मूळ भारतांतच व्यासांनीं आपल्या पात्रांच्या तोंडीं घातलेल्या भाषणांत त्या त्या पात्राचे स्वभावगुण यथास्थित रीतीनें उमटविले आहेत. पंतांनींही ही दिशा आपल्या कृतींत मोठ्या खबरदारीनें संभाळून, या संवादांत ठिकठिकाणीं योग्य ती छाटाकाट, तोडजोड, ठाकठिकी व इतर मखलाशी करून, ते चांगले चटकदार, आटोपशीर व सफाईदार वठविले आहेत. यांतच पंतांचें खरें भाषाकोविदत्व, रचनाचातुर्य, मार्मिकता, मानवी स्वभावांची पारख, वादविवादाच्या खोचखुब्या, वकिली डावपेंच व कारकुनी टापटीप हीं ठळक रीतीनें अनुभवास येतात. याचें प्रत्यंतर या आर्याभारतांत सर्वत्र येण्यासारखें आहे. या दृष्टीनें विचार करितां प्रस्तुत पर्वांतील तिसरा अध्याय फारच मनोहर उतरला आहे. या अध्यायांतील संवादांत धर्माचा उद्वेग व मनस्ताप, अर्जुनाचा बाणेदार स्पष्टवक्तेपणा, भीमाची तडफ, तापटपणा व भडभड्या स्वभाव, आणि नकुळसहदेवांची नम्रता, कळकळ व निर्भीडपणा हीं उत्तम रीतीनें रेखाटलीं आहेत. या प्रसंगींचें द्रौपदीचें भाषण तर फार हृदयंगम आहे. तिच्या भाषणांत क्षण क्षण आढळणारें उपहास, प्रेम व कळवळा यांचें मिश्रण, पुढच्या फसूं पाहणाऱ्या उभ्या व मागील दुःखाची आठवण, सासूच्या आशीर्वादाचें स्मरण व पुत्रवधाचा उल्लेख, स्वतःची औपरोधिक निंदा वगैरे गोष्टी पुत्रशोकानें डागलेल्या व दुःखानें वैतागलेल्या स्त्रीच्या स्वभावाशीं अत्यंत सुसंगत आहेत.

४. पांचव्या अध्यायांतील धर्माचा नगरप्रवेश, राजगृहप्रवेश, अभिषेक वगैरे प्रसंग चांगलेच साधले आहेत. सातव्या अध्यायांतील कृष्णभीष्मांचा संवादही वाचण्यालायक आहे. या ग्रंथाच्या शेवटीं एक सुभाषितांचें परिशिष्ट जोडलें आहे, त्यांत लेखकांस व वक्त्यांस सामान्यतः उपयोगीं पडतील अशा गीतींचा किंवा गीत्यर्धांचा संग्रह केला आहे. त्यांवरूनही पंतांच्या कवित्वासंबंधें साधारण कल्पना होण्यासारखी आहे.

५. या पर्वावर मूळ सुबोध करण्याकरितां जरूर तितक्याच टीपा दिल्या आहेत. मागून जे कित्येक अधिक चांगले पाठ व अर्थ आम्हांस सुचले किंवा आमच्या साहाय्यकारी मित्रमंडळींनीं सुचविले, त्यांचा व मुख्य मुख्य अलंकारांचा परिशिष्टांत समावेश केला आहे.

६. या पर्वाचा बराचसा भाग काव्यसंग्रहाचे माजी संपादक व आमचे परमप्रिय मित्र कै० रा० रा० नारायण चिंतामण केळकर, बी. ए., यांच्या नजरेखालून गेला होता, परंतु या सर्व कामास त्यांचा शेवटचा सफाईचा हात लागला नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय. नारायणरावांच्या अकालमृत्यूनें काव्यसंग्रहाचें व परंपरेनें महाराष्ट्र काव्यभक्तांचें फार नुकसान झालें आहे, यांत शंकाच नाहीं.

७. हें पर्व तयार करितांना रा० महादेव केशव जोशी, बी. ए., (धुळें), श्रीधर नारायण दातार (मुंबई), बाळकृष्ण सीताराम जोशी (मुरूड-जंजिरा), या गृहस्थांनीं आम्हांला फार मदत केली, याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहों.

मुरूड-जंजिरा,
१५ आक्टोबर १९०४.

काव्यसंग्रहकार.

---

# अनुक्रमणिका.

O151 15 ...





एकूण ग्रंथसंख्या ५०६

## परिशिष्टें.

कर्ण असें वदला कीं, 'धर्मासीं [1]संधि करिन जरि माते! ।
विजया भ्याला म्हणतिल, जे गाती [2]मत्प्रतापगरिमा ते. ॥ १५
म्हणतिल [3]अदय [4]अनार्य, त्यजितां [5]समयीं सुयोधना, मातें; ।
जाणुनि [6]कृतघ्न, घेतिल नच माझ्या [7]द्विजें, [8]सुयोध नामातें. ॥ १६
यास्तव आधीं जिंकुनि कृष्णासह अर्जुनास मी युद्धीं, ।
संधि करिन धर्माशीं मग, [9]कीं मत्प्रीति बहु यशीं शुद्धीं.' ॥ १७
'विजयाशीं युद्ध करीं चवघांला अभय दे' असें वदली; ।
परि कांपली बहु [10]भयें हे कुंती, जेंवि [11]मारुतें [12]कदली. ॥ १८
कर्ण म्हणे, 'देइन मी जिंकुनियां जीवदान चवघांस, ।
[13]गजमुक्तांचाचि हरिस अन्याचा तेंवि दे न चव घांस. ॥ १९
[14]कर्णवधीं ध्रुव सविजय, विजयवधीं तूं सकर्ण सुत पाहें, ।
जा माते! पांच तुझे उरतिल' वदला उदार [15]सुतपा हें. ॥ २०
हें वृत्त तोयदानीं वदली तेव्हांचि मज न [16]आइकवे, ।
ऐसी दुसरी लोकीं त्वां आइकली नसेल आइ [17]कवे! ॥ २१
विजयें वधिलें भ्रात्या युद्धीं नेणूनि जेंवि [18]अभ्रात्या, ।

---

सुज्ञ मुलगा ती आज्ञा कशी मान्य करील ? अर्थात् करणार नाहीं. दुर्योधनानें कर्णास त्याच्या गुणाची बूज करून आपल्या पदरीं ठेवून त्याचें सर्वतोपरी कल्याण केलें इतकें असून मातेच्या आज्ञेवरून त्यानें जर दुर्योधनाचा पक्ष सोडला असता तर त्याजवर कृतघ्नपणाचा दोष आला असता हें जाणून कर्णानें मातेचा शब्द मोडला, ह्यांत त्यानें वावगें केलें नाहीं असें पंतांनीं ध्वनित केलें आहे.

१. एकी; समेट. २. मत्+प्रताप+गरिमा=माझ्या प्रतापाचा मोठेपणा. ३. दयारहित. ४. नीच. ५. ऐन प्रसंगीं. ६. मी कृतघ्न आहें असें समजून. ७. ब्राह्मण. ८. महावीर. ९. कारण. १०. अर्जुन जरी महापराक्रमी तरी त्यालाही कर्ण मारील ही भीति. ११. वाऱ्यानें. १२. केळी. १३. अन्वयः-(जेंवि) गजमुक्तांचा घांस हरिस (सिंहास) चव दे तेंवि अन्याला (घास) न दे. अर्जुनाप्रमाणें इतराशीं निकरानें युद्ध करण्यांत मला महत्व वाटत नाहीं—हा भावार्थ. उत्कृष्ट हत्तीच्या गंडस्थलांमध्यें मौक्तिक असतें हा कविसंकेत आहे. १४. अन्वयः—कर्णवधीं सविजय, विजयवधीं सकर्ण, (असे) सुत तूं ध्रुव (निश्चयें करून) पाहें. सहा पुत्रांपैकीं अर्जुनासह पांच किंवा कर्णासह पांच उरतील. मात्र अर्जुन व कर्ण दोन्हीही कधींच जिवंत राहणार नाहींत. १५. तपोनिष्ठ. १६. कर्णकटु लागलें. १७. सुज्ञ नारदा ! १८. नव्हे जो भ्राता तो अभ्राता त्याला; परस्यास.

बहु अर्थिचातकांच्या शोचितसें आठवूनि अभ्रा त्या. ॥ २२
होता मजला कर्ण भ्राता श्वेताश्वसा जरि सहाय, ।
वा! लावितों म्हणाया जिंकुनियां संगरीं हरिस 'हाय!' ॥ २३
कोप सभेंत दुरुक्तें त्या द्यूतीं मन्मनांत जो पेटे, ।
त्या कर्णपाद, जेंवि प्रतिबंधक मणि हुताशना भेटे. ॥ २४
आहेत हे पृथेचे जैसे, होते असेचि ते पाय, ।
हाय! मुने! हा यमुने कालियसा, ईस भासला काय? ॥ २५
सादृश्यहेतुतें बहु शोधुनि हृदयांत तेंधवां पाहें, ।
परि नाहींच समजलें नातें मज मंदमतिस बापा! हें. ॥ २६
क्षितिनें रथचक्र कसें गिळिलें, कोणें दिला तया शाप, ।
बा पद्मोद्भवपुत्रा! वद वागमृतें तुझ्या निवो ताप.' ॥ २७

## अध्याय दुसरा.

नारद म्हणे, 'परिस तुज कथितों मी देवगुह्य गा राया! ।
साधु विचार सुरांहीं केला क्षत्रिय समस्त माराया. ॥ १
वैराग्नि पेटवाया हा कन्यागर्भ निर्मिला धर्मा! ।
कीं शस्त्रपूत होउनि पावो क्षत्र त्रिविष्टपीं शर्मा. ॥ २
देवांच्या संकल्पें पावे सूतत्व तो महातेजा, ।
झाला असह्य पांचचि सगुण तुम्हीं कुरुकुळीं रहाते ज्या. ॥ ३

१. याचकरूप चातकांच्या मेघाला, म्हणजे कर्णाला. अन्वयः–अर्थिचातकांच्या त्या अभ्रा आठवूनि [मी] बहु शोचितसें. २. अर्जुनाप्रमाणें. ३. युद्धामध्यें. ४. इंद्राला. ५. अन्वयः–सभेंत त्या (प्रसिद्ध) द्यूती [कर्णाच्या] दुरुक्तें मन्मनांत जो कोप पेटे, त्या जेंवि हुताशना (अग्नीला) प्रतिबंधक मणि (तेंवि) कर्णपाद भेटे. कर्णाच्या पायाकडे नजर गेली म्हणजे माझा राग शांत होत असे. त्याचें कारण धर्मास आतां कळलें. कर्णाचे पाय कुंतीच्या पायासारखे होते. ६. अन्वयः–हाय! मुने! यमुने (यमुना नदीला) कालियसा, हा (कर्ण) ईस (कुंतीस) भासला काय? ७. कुंती आणि कर्ण यांच्या पायांतील सादृश्याच्या कारणाला. ८. सभेंत द्यूताचे वेळीं. ९. कर्णाला. १०. पद्म+उद्भव+पुत्र=कमलापासून जन्मलेल्याचा पुत्र–ब्रह्मदेवपुत्र नारद. ११. शब्दरूप अमृतानें. १२. देवांचें रहस्य, गुप्तगोष्ट. १३. अविवाहित दशेंत धारण केलेला गर्भ. १४. धारातीर्थी पडून. १५. अवघा क्षत्रियवर्ग. १६. त्रैलोक्यांत. १७. कल्याणास. १८. इच्छेनें. १९. अन्वयार्थ–कुरुकुळीं रहाते (असणारे) सुगुण तुम्हीं पांचचि (ते) ज्या (कर्णाला) असह्य झालां.

तव मति, **भी**मबळ, **वि**जयलाघव[1], **मा**द्रीतनूजविनय, असे ।
हे अद्भुत गुण पाहुनि तो[2] बाळपणींच फार खिन्न असे. ॥ ४

पाहुनि **कृष्णध**नंजयसख्य, अतिशय प्रजानुराग[3], मनीं ।
तापे तो **कर्ण**; जसा बहु[4] बर्हींच्या[5] भुजंग आगमनीं[6]. ॥ ५

**वि**जयासि धनुर्वेदीं बहु सकळांहूनि अधिक पाहूनी, ।
एकांतीं **द्रो**णातें प्रार्थी माथां तदंघ्रि वाहूनी[7]. ॥ ६

'गुरुजी! ब्रह्मास्त्र मला द्या, **स्कं**दीं आणि **भर्ग** सम **रामीं**[8], ।
बा! करिन **अर्जु**नाशीं दुखवाया शत्रुवर्ग समरा मी. ॥ ७

न म्हणोत विचक्षण[9] मज अंकृतास्त्र[10] असें देहांत[11] कल्पतरो! ।
स्वामी! मनोरथांबुधिमध्यें[12] हा **कर्ण** पुत्रकल्प[13] 'तरो.'[14] ॥ ८

यापरि गळां पडुनि तो **कर्ण** ब्रह्मास्त्र जेधवां यांची[15], ।
जाणे दुरात्मता[16] गुरुवर्य स्वमनांत तेधवां यांची[17]. ॥ ९

सापेक्ष[18] जसा तो या **वि**जयीं[19] शिष्यांतरीं न सुतपा हो! ।
किंबहुना[20] **द्रो**णमनीं उत्कर्ष न या असा स्वसुत पाहो.' ॥ १०

**कर्णा**सि म्हणे द्रोण, 'ब्रह्मास्त्रातें कुलीन तो मात्र, ।
ब्राह्मण किंवा क्षत्रिय होय[21] करुनि सुव्रतें तपें, पात्र.' ॥ ११

पूजुनि, पुसोनि गुरुला **कर्ण** महेंद्राचळासि[22] तो जाय, ।
श्रीभार्गवरामाचे बहुविनयें मस्तकीं धरी पाय. ॥ १२

---

१. अर्जुनाचें चापल्य. २. कर्ण. ३. प्रजाजनाचें प्रेम. ४. हें क्रियाविशेषण, 'तापे' ह्या क्रियापदाचें. ५. मयूरांच्या. ६. येणें झालें असतां, आले असतां ७. त्याचे पाय मस्तकावर घेऊन, पायां पडून—असा भाव. ८. देवसेनाधिपति कार्तिकस्वामी व राम (परशुराम) या दोहोंच्या ठिकाणीं भर्ग [=शंकर] सम [=समानदृष्टी] [तेव्हां तुम्हीही मला आपल्या अश्वत्थाम्याप्रमाणेंच लेखा—हा भाव]. ९. शहाणे लोक. १०. अस्त्रविद्येचें शिक्षण ज्याचें झालें नाहीं असा. ११. चार चौघांत. १२. इष्टकार्यरूप समुद्रामध्यें. १३. 'कल्प' हा प्रत्यय नामास व विशेषणास लाविल्यानें न्यूनतागर्भसादृश्य व्यक्त होतें; तेव्हां पुत्रकल्प=पुत्रासारिखा. १४. तरून जावो, कार्यसिद्धि पावो—असा भाव. १५. प्रार्थी. १६. दुष्टपणा. १७. ह्याची, कर्णाची. १८. सप्रेम, कळकळ बाळगणारा. १९. अर्जुनाचे ठायीं. २०. थोडक्यांत म्हटलें तर; सारांश. अन्वयः—हो! तो सुतपा (द्रोण) जसा या **वि**जयीं सापेक्ष (तसा) शिष्यांतरीं [अन्य शिष्याचे ठायीं, कर्णाविषयीं] न; किंबहुना, असा (अर्जुनासारखा) उत्कर्ष स्वसुत (अश्वत्थामा) [ही] न पाहो, (असें) या द्रोणमनीं [असे]. २१. ह्याचा संबंध 'पात्र' (योग्य) ह्याकडे. २२. पर्वतविशेष. ह्या ठिकाणीं अवतारसमाप्तीनंतर परशुराम रहात होते.

गुरुचि पिता या भावें ब्रह्मास्त्राच्या धरूनियां कामा,[1] ।
'ब्राह्मण भार्गव[2] आपण' ऐसें सांगे विचारितां रामा[3]. ॥ १३

विनयादिगुणें झाला प्रिय गुरुस अनंतपुण्यलभ्यास,[4] ।
केला शरसंधानीं[5] तेथें अत्यंत निपुण अभ्यास. ॥ १४

इष्वस्त्रीपरदुर्जय[6] भासे सर्वांस कर्ण कामारी[7]. ।
घडला प्रसाद;[8] मानुनि हरिण द्विजधेनुतर्णका मारी. ॥ १५

अज्ञानें घडलें तें कर्म निवेदूनि कर्ण कर जोडी, ।
तरि वाग्वज्रातें,[9] बहु कोप करुनि, तो तपस्विवर सोडी. ॥ १६

'घे पदरांत फळातें पाप्या! या वत्सरत्नहानीच्या, ।
विफल असो स्पर्धेनें[10] ज्याकरितां करिसि यत्न हा नीचा! ॥ १७

ज्यातें मारिन म्हणसी दुष्टा! तूं वृत्र जेंवि शक्रातें, ।
त्यासीं करितां समर, क्षिति गिळिल तुझ्या शतांगचक्रातें.[11] ॥ १८

रथचक्रातें धरणी ग्रासिल तूं तेधवां असावध हो! ।
वधिला असावधपणें वत्स जसा त्वां, तुझा असा वधे[12] हो.[13]' ॥ १९

व्हाया प्रसन्न दिधलीं कर्णें बहु त्यासि धेनु, धन, रत्नें, ।
विप्र म्हणे, 'मद्वचन न होईल मृषा धनाधिपतियत्नें.[14] ॥ २०

जा कीं रहा, चुकेना कर्मफळ कदापि वत्सहानिकरा[15]! ।
तूं माझ्या कोपाच्या, धर्मांच्या 'पापिवत्,[16] सहा[17] निकरा.[18]' ॥ २१

---

१. इच्छेस. २. भृगुकुलोत्पन्न. ३. परशुरामास. ४. अगाध पुण्यसंचयानेंच प्राप्त होणारा जो गुरु परशुराम त्यास. ५. नेम धरून बाण मारण्यांत. ६. मित्र, स्त्री, व शत्रु ह्यांपैकीं कोणाकडूनही जिंकला न जाणारा. ज्याच्यापुढें कोणाचेंच कांहीं चालावयाचें नाहीं असा. हें 'कामारी'चें विशेषण. 'इष्वस्त्रीं परदुर्जय' हा पाठ बरा. अन्वय:-इष्वस्त्रीं (=बाण व अस्त्रें यांच्या योगानें) परदुर्जय (=शत्रूंना अजिंक्य असा) कर्ण सर्वांस कामारी (=शंकर) भासे. ७. मदनशत्रु, शंकर. ८. उत्तरार्धान्वय:-द्विजधेनुतर्णका (ब्राह्मणाच्या गाईच्या वासरास) हरिण मानुनि तो मारी; (हा) प्रसाद (अनुग्रह) घडला. कर्ण हा सर्वश्रेष्ठ झाल्यामुळें असा प्रमाद जर त्याचे हातून न घडता तर काय प्रसंग आला असता कोण जाणे, अर्थात् पांडवांचें त्याच्या पुढें कांहीं न चालून ते हतजीवित झाले असते; तेव्हां त्याचे हातून गाईचें वांसरू मारलें गेलें हें बरेंच झालें असें ह्यांत ध्वनित केलें. 'प्रसाद'बद्दल 'प्रमाद' असा अन्य पाठ. ९. वाणीरूपवज्रातें; कठोर शब्दातें. १०. मत्सरानें. ११. रथचक्रातें. १२. अंत. १३. होवो. १४. कुबेराच्या प्रयत्नानें. १५. वांसरू मारणाऱ्या! १६. पाप्याला ज्याप्रमाणें धर्मांच्या निकरा (शासनास) सहन करावें लागतें तसा. १७. मोस. १८. परमावधीस.

झाला शाप असा बहु दारुण मग 'हाय! हाय!' कर्ण वदे, ।
[1]जाय गिळोनि; गमे त्या रुद्रा तें काळकूट अर्णव दे. ॥ २२
[2]त्यावरि [3]गुरु [4]शुश्रूषाप्रणयदमबळादि सुगुण पाहूनी, ।
होय प्रसन्न, शिकवी श्रीब्रह्मास्त्र [5]स्वयेंचि [6]बाहूनी. ॥ २३
ब्रह्मास्त्रातें [7]साधुनि गुरुची सेवा करीत कर्ण वसे, ।
[8]सच्छिष्य मीनसे त्यां सेव्यचि आचार्यचरण अर्णवसे. ॥ २४
राम [9]कदाचित् [10]कुतुकें कर्णकर धरूनि आश्रमीं [11]भ्रमला; ।
[12]उपवासकृशकलेवर [13]संचारेंकरुनि तो बहु श्रमला. ॥ २५
अंकीं शिर ठेवुनि, [14]करि कर्णातें पात्र तोक विश्वास; ।
सोडि श्रमासह निजुनि अतिदुर्बळगात्र तो कवि श्वास. ॥ २६
तों [15]क्रमि अलर्कनामा त्या [16]गुरुशिष्यांत विघ्न बहु मांडी; ।
न कळत तळीं शिरुनियां फोडी तो [17]सूर्यसूनुची मांडी. ॥ २७
गुरुनिद्राभंग न हो म्हणउनि तो धीर वेदना साहे, ।
[18]धृतिच गुणगणा शोभाहेतु म्हणति सुज्ञ; वेद, ना सा हे. ॥ २८
न शके माराया [19]कीं क्रमितें उडवावयाहि तो दूर, ।
गुरुनिद्राभंगभयें साहे [20]उग्राहि वेदना शूर. ॥ २९
जागा झाला [21]सहसा राम रुधिर लागतांचि आंगातें, ।

१. शोक आंवरिला. 'शोक' हें 'गिळोनि' ह्याचें अध्याहृत कर्म. श्रीशंकरांनीं कालकूट नामक अतितीव्र विष गिळून टाकिलें, तद्वत् कर्णानें हें शापोद्भूत शोकरूपी विष गिळून टाकिलें. २. कर्णावर. ३. परशुराम. ४. सेवा, आदरबुद्धि, आत्मसंयमन व वीर्य इत्यादि. ५. आपण होऊन. ६. बोलावून. ७. प्राप्त करून घेऊन. ८. सच्छिष्य मीनसे; त्यां आचार्यचरण अर्णवसे सेव्यचि–असा अन्वय. समुद्रांत राहण्यांतच जसा माशांस आनंद असतो तद्वत् गुरुची सेवा करण्यांतच चांगल्या शिष्यास आनंद असतो–असा भाव. ९. एकदां. १०. स्वेच्छेनें; सहज गमतीनें. ११. हिंडला. १२. उपोषणानें वाळलेलें आहे शरीर ज्याचें असा (तो परशुराम). १३. फिरण्यानें. १४. [जो] तोक (मुलगा, शिष्य) पात्र (योग्य) [तो] विश्वास (विश्वासाचें आश्रयस्थान) करि–असा अन्वयार्थ करावा लागतो. 'पात्रतोक-विश्वास' असें सामासिक पद घेऊन 'हंसानां राजा राजहंसः' याप्रमाणें 'तोकविश्वासस्य (पुत्राप्रमाणें विश्वासाचें) पात्रं पात्रतोकविश्वासः' असा अर्थ होईल. १५. अलर्क नांवाचा किडा. १६. त्या गुरुशिष्यांच्या आनंदांत विघ्न उत्पन्न करी. १७. कर्णाची. १८. अन्वयः–गुणगणा शोभाहेतु धृति (धैर्य) च; हे वेद [किंवा] सा (षट्शास्त्रें) ना (न) [असें] सुज्ञ म्हणती. किंवा 'सा=षड्रिपु' असा अर्थ घेऊन सुज्ञ [आणि] वेद म्हणति सा ना (न). १९. किंवा. २०. तीव्र. २१. एकाएकीं.

'सोसेल युद्धयज्ञावांचुनि शुद्धा अशुद्ध कां गा! तें? ॥ ३०
राम म्हणे, 'शिव! शिव! रे! झालें कीं अशुचि शोणितें आंग! ।
कां हें भरलें? केलें काय? भय त्यजुनि सत्य तें सांग.' ॥ ३१
कृमिकृतनिजोरुभक्षण कर्णें कथिलें गुरूसि पद नमुनी, ।
पाहे त्या कीटातें क्षतजीं तो शुद्धकीर्तिसदन मुनी. ॥ ३२
तो रामदृष्टमात्र प्राणातें कीट तत्क्षणीं सोडी, ।
विकराळरूप होउनि ठाकुनि गगनीं मुनीस कर जोडी. ॥ ३३
'रामा! सुटलों मी या नरकापासुनि तव प्रसादानें, ।
स्वस्ति असो तुज; द्यावीं त्वां दीनाला असींच बा! दानें.' ॥ ३४
राम म्हणे, 'तूं कोण? त्यज संकोच स्ववृत्त सांगाया, ।
कवण करुनि अतिदारुण अघ नरका पावलासि कां गा! या?' ॥ ३५
'भृगुशार्दूला! होतों सत्ययुगीं असुर दंशनामा मी, ।
भृगुभार्येतें हरिता झालों होऊनि आंधळा कामी. ॥ ३६
परदारसंग नरकचि म्हणति सकळ तरि तुला नसे वीट, ।
हो पापा! श्लेष्मरुधिरमूत्राशन परम दुष्ट तूं कीट.' ॥ ३७
तव पूर्वपितामह भृगु देता झाला मला असा शाप, ।
पाप क्षणांत फळलें; फळ आलें जो असा महा ताप. ॥ ३८
म्यां शापांत कराया जेव्हां भृगु विनविला पदीं नमुनी, ।
'भार्गवराम करिल तव उद्धार' असें वदे अदीन मुनी. ॥ ३९

---

१. अन्वयः–युद्धयज्ञावांचुनि, तें अशुद्ध (रक्त) शुद्धा सोसेल कां गा!? समरांगणावांचून इतर ठिकाणीं रुधिर अंगास लागलेलें पवित्र मनुष्यास कसें खपेल? खपणारच नाहीं. २. तसलें अपवित्र. ३. अशुद्ध, घाण. ४. [कर्णाचें] शरीर. ५. कृमि+कृत+निज+ऊरु+भक्षण=किड्यानें केलेलें आपल्या मांडीचें भक्षण. ६. [बाहेर निघालेल्या] रक्तामध्यें. ७. परशुराम. ८. परशुरामाच्या दृष्टि पडतांच. ९. अंतरिक्षांत उभा राहून. १०. कल्याण. ११. 'शार्दूल' या शब्दाचा मूळ अर्थ 'व्याघ्र' असा आहे, तथापि हा [illegible] या अर्थी समासांतीं जोडतात. उदाहरणार्थः–[illegible] 'कुंजर' इत्यादि शब्दही याच अर्थी जोडलेले [illegible] 'भृगुशार्दूल'=भृगुवंशदीप; भृगुकुलोत्पन्न अतिप्रसिद्ध [illegible] अविचारी. १३. तिटकारा. १४. मल, रक्त व मूत्र हें ज्याचें खाद्य आहे असा. हें 'कीट' (किडा) याचें विशेषण. १५. अन्वयः–जो असा महाताप, (तें) फळ आलें. या प्रकारच्या यातना भोगाव्या लागल्या हें पापाचें फळ. 'फळलें' या पदानें पापवृक्षाला फळें आलीं. योग्य शासन मिळालें–असा गर्भितार्थ. १६. उच्छाप व्हावा म्हणून. १७. उदारप्रकृति.

बहु मान्य होय जन या[1] पायांला भाळ[2] लाविता नाकीं[3], ।
तुमच्या[4] शुद्धयशाच्या अमृतकरहि भाळला विताना कीं. ॥ ४०
मीच[5] न, नसतां सदनुग्रह, सकळहि सर्वथा पशु चिदंश,' ।
ऐसें वर्णुनि गेला होउनि गततापपाप[6] शुचि[7] दंश[8]. ॥ ४१
कर्णासि गुरु म्हणे, 'रे! अन्या पीडांसि देह वाहेल[9], ।
ऐशा अतिदुःखातें सुब्राह्मण तो कधीं न साहेल. ॥ ४२
हें[10] क्षत्रियधैर्य तसें धैर्य तुझें, स्पष्ट सांग तूं कोण?।
शोण[11] न अनृतें व्हावे डोळे सारेहि, हे जसे कोण.' ॥ ४३
कर्ण म्हणे, 'मी ब्रह्मक्षत्रांतरजात[12] सूत[13]; मज लोक ।
राधेय[14] कर्ण म्हणती; गुरुजी! धर्मेंचि शिष्यजन तोक[15]. ॥ ४४
ब्रह्मास्त्रलुब्ध झालों, आलों साधावयासि तें बा! मी, ।
सद्गुरु पिताचि, यास्तव वदलों भार्गव असें असें स्वामी!' ॥ ४५
वंदुनि शतदां[16], लोळे, लेश[17] नसे पाप ताप दर ज्यांत, ।
परि विपरीताचरणें झाला तो तापता[18] पदरजांत[19]. ॥ ४६
सुज्ञें समजुनि गुर्वघ[20] करितां, नमनें[21] टळेल कां पेंच[22]? ।
पदरज म्हणे देहांला[23] गुरुवंचनफळ[24] कळेल कांपेंच[25]. ॥ ४७

---

१. तुझ्या. २. ललाट. ३. स्वर्गांत. ४. गीत्यर्धभावार्थः-प्रत्यक्ष चंद्र सुद्धां तुमच्या निर्मळ यशोरूप पडद्यास मोहित झाला. म्हणजे तुमचें यश चंद्रप्रभेलाही मागें सारणारें आहे. ५. अन्वयः-सदनुग्रह नसतां मीच (पशु) न, सर्वथा, सकळहि चिदंश पशु. साधूचा प्रसाद नसल्यानें मीच तेवढा पशु झालों असें नाहीं, साधूंचा प्रसाद नसल्यास अवघे जीवमात्र सर्वतोपरी पशुच होत-असा भाव. ६. नष्ट झालेला आहे त्रास व पाप ज्याचें असा. पापापासून व त्रासापासून मुक्त झालेला असा. ७. शुद्ध. ८. दंश नामक असुर. ९. सोसील. १०. अन्वयः-(असें) क्षत्रियधैर्य, तसें हें तुझें धैर्य (असे); तूं कोण (हें) स्पष्ट सांग. ११. अन्वयः-जसे हे कोण (डोळ्यांचे कोपरे) तसे सारेहि डोळे अनृतें शोण (लाल) न व्हावे. खोटें बोलून मला चेतवूं नकोस-हा भाव. डोळ्याचा कोपरा नेहमींच लाल असतो. रागाचे वेळीं सर्व डोळा लाल होतो-ही गोष्ट येथें लक्ष्य आहे. १२. ब्रह्म+क्षत्र+अंतर+जात=ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या मध्यंतरीं (म्ह० संकरानें) जन्मलेला. १३. रथवाहक कुलांत जन्मलेला. ब्राह्मणीचे ठायीं क्षत्रियापासून झालेलें कुल तें सूतकुल. १४. राधेचा तो. १५. बालक. १६. शंभर वेळां. १७. अन्वयः-ज्यांत पाप ताप दर (भय) लेश नसे [त्या पदरजांत] लोळे. १८. त्रास पावला. १९. गुरु जो परशुराम त्याच्या पदधूलींत. २०. महापाप. २१. पायां पडण्यानें. २२. संकट. २३. सर्वांना. २४. गुरूला फसविण्याचा परिणाम. २५. थरकांपानेंच.

राम म्हणे, 'धर्म वदसि गुरुचि महाजनक, विप्र, तारक हा. ।
तरि तूं न म्हणसिल कसा जरिहि महाजनकविप्रतारक 'हा!'? ॥ ४८
ब्रह्मास्त्र जोडिलें त्वां हा हतभाग्यांगणीं स्वरग रुजला, ।
सदृशासीं रण करितां वधकाळीं न स्फुरेल तें तुजला. ॥ ४९
ब्रह्मास्त्रसिद्धि झाली कष्टें अब्राह्मणा जरि नरा हे, ।
अकुलीनां अनयज्ञां, श्रीसी चिर बहु भजे तरि, न राहे. ॥ ५०
अनृता! आजिच जा गा! जागा आश्रमपदीं नसे तुज या, ।
कैसा तरेल बहुमत सत्याभिध भवनदी न सेतु जया?' ॥ ५१
'त्वत्सम समर्थ होइल पिउनिहि वारुण सुरा न राजन्य, ।
चित्र करिल कर्णा! त्वां केलें दारुण सुरा नरा जन्य.' ॥ ५२

---

१. अन्वयार्थ:-राम म्हणे, गुरुचि महाजनक, विप्र (शहाणा) [आणि] तारक (असे) हा धर्म वदसि; [पण] जरिहि तूं महाजनकविप्रतारक (सत्पुरुष आणि शहाणे यांस फसविणारा) तरी 'हा!' कसा न म्हणशील? परशुराम म्हणतात; अरे गुरु हाच पिता व उद्धारकर्ता, ही विहित गोष्ट होय असें तूं म्हटलेंस. परंतु, जर तूं सत्पुरुषास फसविणारा असलास तर मग 'हाय हाय' करावयास न लागतां तूं कसा राहशील? गुरूनें जर शिष्याचा उद्धार करावयास पाहिजे असेल तर शिष्यानेंही गुरूस फसवूं नये हें उघड-असा भावार्थ. २. कमनशिब मनुष्याच्या घरापुढील मोकळ्या जागेंत. ३. कल्पवृक्ष. ४. लागून वाढला. भावार्थ:-तुला ब्रह्मास्त्रप्राप्ति झाली ही गोष्ट म्हणजे अभाग्याच्या घरीं कल्पवृक्षाचें झाड लागून वाढल्याप्रमाणें होय; अर्थात् त्या अभाग्यास जसा त्या कल्पवृक्षाचा उपयोग होत नाहीं तद्वत् तुलाही त्या अस्त्राचा उपयोग होणार नाहीं. ५. बरोबरीच्याशीं. ६. युद्ध. ७. अंतकाळीं. ८. आठवेल. ९. महाप्रयासानें. १०. उत्तम वंशामध्यें जो जन्मास आलेला नाहीं त्याचे ठायीं. ११. न्यायातें न जाणणारा अर्थात् सन्मार्गपराङ्मुख त्याचे ठायीं. १२. अन्वय:-(तो तिस) बहु भजे (परी) श्रीसी [लक्ष्मीप्रमाणें] चिर न राहे. मुद्राराक्षसांतील लक्ष्मीचांचल्यवर्णनपर श्लोकांचें सादृश्य ह्या गीत्यर्थांत आहे. (पहा मुद्रा० ना० अंक ३). १३. असत्य भाषण करणाऱ्या (कर्णा)! १४ अन्वय:-जया बहुमत सत्याभिध सेतु न, (तो) भवनदी कैसा तरेल? ज्या मनुष्यास सर्वमान्य असा सत्यरूपी पूल माहीत नाहीं, तो ही संसारनदी कशी उतरून जाईल. अर्थात् सत्याच्या जोरावरच मनुष्याची संसारयात्रा सुखानें पार पडणार-असा भाव. १५. वरुण नामक झाडाची. हें 'सुरा' ह्याचें विशेषण. १६. दारु. दारुणसुरा=सोम(?). १७. दुसरा कोणीही क्षत्रिय. १८. चित्र करील=चित्राप्रमाणें स्तब्ध करील; म्हणजे आश्चर्यचकित, थक्क करील. १९. केलेलें. २०. घोर. २१. युद्ध, संग्राम. अन्वय:-कर्णा! त्वां केलें दारुण जन्य सुरा नरा चित्र करिल.

यापरि[1] गुरु दे व्हाया शिष्यपरोत्कर्षहानि शाप वर, ।
रामद्विजराजयशें[2] नच पाहे म्हणुनि 'हा![3]' निशाप[4] वर[5]. ॥ ५३
गुरुची आज्ञा घेउनि येउनि भेटे सुयोधना कर्ण, ।
गेला [6]गतिला, [7]वारुनि [8]रणयज्ञें तो [9]सुयोध [10]नाकर्ण. ॥ ५४
त्यावरि [11]कलिंगराजें [12]राजपुरीं [13]कुशळ दूत धाडून, ।
कन्यास्वयंवरीं बहु गोळा केले [14]क्षितीश [15]झाडून. ॥ ५५

---

१. 'सर्वसंग्रहां'त ५२ व ५३ ह्या गीतींचा क्रम उलट आहे, पण तो सरळ दिसत नाहीं; कारण कर्णाला परशुरामानें ४८ व्या गीतींत बुद्धिवाद सांगून, ४९, ५० व ५१ या गीतींत शाप दिला व ५२ (म्हणजे स० सं० ५३) व्या गीतींत 'वर'ही दिला कीं, 'वारुणी पिऊन मत्त झालेले राजसमूहसुद्धां तुझ्याएवढा पराक्रम करूं शकणार नाहींत. तुझें युद्धनैपुण्य पाहून मनुष्य व देव—सर्व—आश्चर्यचकित होतील.' तेव्हां पंत ५३ (म्हणजे स० सं० ५२) व्या गीतींत म्हणतात कीं अपराधी शिष्यावर शाप देऊनहि अनुग्रह करण्याचें अजब हुन्नर दाखवून परशुरामांनीं जें यश संपादिलें त्याच्यापुढें चंद्रिकाही फिकीच पडणार. या पंक्तीचा अन्वयार्थः—यापरि (अशा प्रकारें) गुरु (परशुराम) शिष्यपरोत्कर्षहानि (शिष्याच्या उत्कर्षाची हानि व शत्रूच्याही उत्कर्षाची हानि) व्हाया शापवर (शाप आणि वर दोन्हींही) दे. शापानें कर्णोत्कर्षाची हानि झाली, परंतु वरानें त्याच्या शत्रूच्या उत्कर्षाची हानि झाली. जर 'सर्वसंग्रहां'त आहे तसाच क्रम ठेविला, तर ५२ व्या गीतीचा पुढील पाठ घेतल्यासच कांहीं तरी अर्थ निष्पन्न होईलः—यापरि गुरु दे व्हावा शिष्यपरोत्कर्ष हा निशाप वर, । रामद्विजराजयशें इ० ॥ ५२ ॥ निशाप=शाप ज्यांत नाहीं असा, शापमुक्त. 'नि' या उपसर्गाचा 'निवृत्त'='परत फिरलेला, नाहींसा झालेला' असा अर्थ बहुव्रीहि समासांत होऊं शकतो, जसें 'निवृत्तः वातः यस्मात् सः निवातः, निवृत्तं धनं यस्मात् सः निधनः (दरिद्रः), निखिलं, निरागः,' इ०. अन्वयार्थः—परि (परंतु) शिष्यपरोत्कर्ष (कर्णाचा बराच उत्कर्ष) व्हाया, गुरु या (कर्णाला) निशाप (ज्यांत शाप नाहीं असा, शुभप्रद) हा (पुढील गीतींतील) वर दे (देता झाला). २. राम+द्विजराज+यशें=परशुरामरूप चंद्राच्या यशानें. येथें 'द्विजराज' हें पद श्लिष्ट आहे. त्याचे अर्थः—(१) ब्राह्मणश्रेष्ठ, (२) चंद्र. ३. हाय. ४. निशेचा पति, चंद्र. ५. वरती; ऊर्ध्व. भावार्थः—भार्गवरामाच्या कीर्तिकौमुदीपुढें प्रत्यक्ष चंद्रही फिका पडला. ६. उत्तम गतीला. ७. फेडून. ८. संग्राममरूपी यज्ञाच्या सहाय्यानें अर्थात् युद्ध करून. ९. उत्तम योद्धा, महावीर (कर्ण). १०. नाक+ऋण=स्वर्गसंबंधीं ऋण. [पहा मागें, गीति १–२, अध्याय २.] हें अर्ध यमक साधण्यासाठींच घातलेलें दिसतें. याचा मागें किंवा पुढें संबंध जुळत नाहीं. ११. कलिंग देशाचा राजा चित्रांगद. १२. याचा 'क्षितीश गोळा केले' याकडे अन्वय करावा. १३. हुषार. १४. क्षिति+ईश=पृथ्वीचे शास्ते; राजे. १५. एकून एक.

रुक्मी[1], कपोतरोमा[2], नीळ[3], जरासंध[4], भोज[5], शिशुपाळ[6], ।
क्रथनृप[7], अशोक[8], भीष्मक[9], आला तोही सृगाळ[10] नरपाळ. ॥ ५६
तेथें गेला होता दुर्योधनसहित कर्ण, तों कन्या[11], ।
[12]वर्णन परिसुनि, [13]पाहे लंघाया कुरुवरा जसें अन्या. ॥ ५७
[14]भीष्मद्रोणाश्रित कुरुपति लंघन तें न पाउलहि साहे, ।
चित्रांगदकन्येतें स्वरथीं [15]अभिमानसिंधु तो [16]वाहे. ॥ ५८
[17]सहसा स्वयंवरवधू [18]धर्मा! दुर्योधनें जसी वरिली, ।
कर्णें सर्व नृपांची [19]लीलेनें कीर्तिही रणीं हरिली. ॥ ५९
ज्या अत्यंत प्रबळा [20]लवली [21]भूपावळी जरासंधा, ।
त्याचीही कर्णाशीं रण करितां [22]पावली जरा [23]संधा. ॥ ६०
[24]बाहुरणींहि [25]सुदुर्जय [26]उखळी [27]तनुसंधि, मागध रणीं तें ।

---

१. विदर्भ देशाचा राजा भीष्मक त्याचा ज्येष्ठ पुत्र. २. यदुकुलोत्पन्न एक राजा. ३. पुरुवंशोत्पन्न एक राजा. ४. मगध देशाचा राजा. ५. कुंतिभोज. ६. श्रीकृष्णाचा आतेभाऊ. ७. विदर्भराजाच्या चार पुत्रांपैकीं एक. ८. हा दुर्योधनपक्षीय एक राजा. ९. विदर्भदेशचा राजा. वरील रुक्मीचा हा बाप कल्पिल्यास पितापुत्र एकाच स्वयंवराला आले होते असें म्हणावें लागतें. १०. एक राजा. ११. चित्रांगद राजाची मुलगी जिचा स्वयंवरसमारंभ चालू होता ती. १२. स्वयंवराचे वेळीं मुलीबरोबर एक धात्री असून ती जमलेल्या अनेक राजांचें वर्णन करीत करीत ते ते राजे त्या मुलीस दाखवितें व ती मुलगी आपल्या पसंतीप्रमाणें एकाच्या गळ्यांत माळ घालिते. रघुवंश–सर्ग ६ पहा. १३. अन्वयः–[ती कन्या] वर्णन परिसुनि जसें अन्या (इतर राजांना) (तसें) कुरुवरा (दुर्योधनास) लंघाया पाहे [टाकून पुढें जाण्याच्या विचारांत होती]. १४. भीष्म आणि द्रोण यांच्या आश्रयाच्या जोरावर असणारा (दुर्योधन). अन्वयार्थः–भीष्मद्रोणाश्रित कुरुपति तें लंघन पाउलही न साहे. आपणास टाकून पुढें टाकलेलें एक पाऊलसुद्धां दुर्योधनास खपलें नाहीं. १५. मीपणाचें माहेरघर असा तो दुर्योधन. १६. नेता झाला. १७. एकाएकीं. १८. हे धर्मराजा ! नारद ही कथा धर्मराजाला सांगत आहेत. १९. सहज. २०. वांकली. मान लववून वर्चस्व कबूल केलें. २१. नृपसमूह. २२. 'संधा जरा पावली'=प्रतिज्ञेला वृद्ध दशा आली. ज्याप्रमाणें मनुष्यास म्हातारपण येतांच तो अशक्त होऊन त्याचा अंतकाळ समीप येतो, तद्वत् जरासंधाची शत्रूस जिंकण्याची प्रतिज्ञा ही डळमळीत झाली. २३. प्रतिज्ञा. अर्थात् सर्व नृपांवर वर्चस्व राखण्याची आजपर्यंत चालत आलेली प्रतिज्ञा. २४. द्वंद्वयुद्धांत. २५. जिंकण्यास कठीण असा. २६. खिळखिळा करी. २७. तनु+संधि=शरीराचे ठिकाणीं असलेला जोड. जरासंधाचीं दोन शकलें जरा नामक राक्षसीनें सांधिलीं होतीं हें सुप्रसिद्ध आहे.

बहु बळ पाहोनि म्हणे, 'कर्णा! हो मित्र, माग [1]धरणीतें.' ॥ ६१
सख्य करुनि मगधेशें दिधली कर्णासि [2]मालिनी नगरी, ।
प्रबळाहि [3]पैरा ग्रासी जी अत्युग्रा, जसी [4]ह्रदीं [5]मगरी. ॥ ६२
तैसीच अंगराजें कर्णें परिपाळिली पुरी चंपा, ।
[6]अमरावती म्हणों तरि हे अरिपासुनि न पावली कंपा. ॥ ६३
देहीं दृढ दिव्य [7]सहज कवच, सहज दिव्य कुंडलें कानीं, ।
यापरि न [8]निर्वविलीं पितृनयनें दावूनि [9]तुंड लेंकांनीं. ॥ ६४
बा! [10]त्वद्धितार्थ मागुनि नेलीं तीं कवचकुंडलें शक्रें, ।
हा [11]अन्यथा न मरता [12]त्यां वज्रें, याहि [13]शौरिच्या [13]चक्रें. ॥ ६५
[14]अर्धरथ असें भीष्मप्रमुहि म्हणे त्वद्धितार्थ कर्णातें, ।
तेजातें शल्य [15]उणें करि [16]और्व जसा [17]सरस्वदर्णातें. ॥ ६६
त्या [18]शापयुगें धरिला [19]आलानें द्विरदसाचि [20]आंकळुन, ।
मातेसि दिला तो [21]वैरें अनृत कसा करिल साधु हा कळुन? ॥ ६७
कृष्णाच्या [22]नीतिबळें, [23]पाशुपताद्यस्त्रसंग्रहें [24]शुद्धें, ।

---

१. अन्वयः—बाहुरणींहि (तो कर्ण) सुदुर्जय [असा जरासंधाचा] तनुसंधि उखळी. रणीं तें बहु बळ पाहोनि मागध म्हणे, 'कर्णा! मित्र हो, धरणीतें माग.' 'बाहुरणींहि' असें म्हणण्याचें कारण कर्ण शस्त्रास्त्रविद्येंत निपुण होताच, पण मल्लयुद्धांत प्रवीण जो जरासंध त्याचाही पराभव कर्णानें मल्लयुद्धांतच केला हें कर्णास विशेष कीर्तिप्रद झालें. २. अंग देशांतील एक नगरी. ३. शत्रूला. ४. महासरोवरांत. ५. सुसर. ६. इंद्राची राजधानी. अमरावतीलाही शत्रूपासून भय होतें, पण या नगरीला कोणाचेंच भय नव्हतें. ७. उपजत असलेलें. ८. तृप्त केलीं. ९. मुख. १०. त्वत्+हितार्थ=तुझ्या (धर्माच्या) बऱ्याकरितां. ११. नाहींपेक्षां. १२. इंद्राच्या. १३. श्रीकृष्णाच्या सुदर्शन चक्रानें. १४. रथयुद्धांत निपुण नव्हे असा. १५. दुर्योधनाच्या प्रार्थनेवरून कर्णाचें सारथ्य करण्याचें शल्यानें कबूल केलें, पण अशी अट घातली कीं 'मी कांहींही बोललों तरी तें कर्णानें ऐकून घेतलें पाहिजे.' पुढें शल्यानें हंसकाकीय कथानक वगैरे सांगून कर्णाचा आपल्या बोलण्यानें उत्साहभंग केला. १६. वडवाग्नि. १७. सरस्वत्+अर्णातें=सागरोदकातें. १८. ब्राह्मणानें दिलेला व परशुरामानें दिलेला, अशा शापद्वयानें. १९. गजबंधानें, सांखळदंडानें. २०. आटोपून, ओढून, जखडून. २१. मागें, अ० १ गीति १९ पहा. २२. राजनीति व कारस्थान यांच्या जोरावर. २३. पाशुपत+आदि+अस्त्र+संग्रह=(श्रीशंकरांनीं अर्जुनास दिलेलें) पाशुपत नामक अस्त्र मुख्य आहे ज्यांत असा अस्त्रसमुदाय. २४. तीव्र, जाज्वल्य.

पार्थें गुरुप्रसादें वधिला [1]व्यसनीं सुदुष्करें युद्धें. ॥ ६८
तव बंधु [2]शापिला तो बहुतांहीं [3]वंचिला असा राया ! ।
गेला [4]सारा लोका रणयोगें त्यजुनियां [5]असारा या. ॥ ६९
[6]शोच्य नव्हे तो क्षत्रिय [7]अभिमुख युद्धांत पावला पतन, ।
बा! [8]याकरितांचि करिति तनु मनुजवर प्रवीर जन जतन.' ॥ ७०

---

## अध्याय तिसरा.

कुंती म्हणे, 'सुता! तूं योग्य न याचा करावया शोक, ।
[9]जो करुणास्नेहरहित त्या आप्तासहि न शोचती लोक. ॥ १
भेटुनि भस्म न व्हाया त्या [10]पुण्यश्लोकसायका कुल ती[11] ।
त्याला करिती झाली, यासि तसी हेहि माय [12]काकुलती. ॥ २
'[13]उचिता काय सुतनिकट मातेची प्रार्थना वृथा व्हाया? ।
[14]राधाव्हा सुबहुमता जेंवि न चित्तीं तसी [15]पृथाव्हा [16]या. ॥ ३

---

१. अडचणीच्या वेळीं; रथचक्र भूमीनें गिळिल्यानें संकटांत सांपडल्या वेळीं. या गीतींतील प्रत्येक शब्द महत्वाचा आहे. नारद येथें असें सुचवितात कीं अर्जुनानें कर्णास जिंकिलें यांत मोठासा पुरुषार्थ केला असें नाहीं. वस्तुतः कर्णच खरा बलाढ्य. परंतु तो शापग्रस्त व व्यसनपतित होता. तरीही त्याला जिंकण्यास अर्जुनाला किती सामग्री लागली पहाः– (१) कृष्णाचें कारस्थान, (२) गुरुशापानें दग्ध झालीं नव्हतीं अशीं अस्त्रें, (३) द्रोणाची बहाल मर्जी, (४) कर्णावरील संकट, व (५) आपल्या अंगी होतें तेवढें सर्व युद्धकौशल. २. शापिलेला. ३. फसविलेला. ४. श्रेष्ठ. ५. या कमी प्रतीच्या लोकास. ६. शोक करण्यासारखा. ७. समोरासमोर लढून. ८. अन्वयः–या करितांचि (युद्धांमध्यें पडण्याकरितांचि) मनुजवर प्रवीर जन तनु (शरीर) जतन करिती. ९. अन्वयः–जो करुणास्नेहरहित त्या आप्तासहि लोक न शोचती. ज्याचे आंगीं ममता व कळकळ नाहीं असा कोणी नातेवाईक जरी असला, तरी त्याजबद्दल जगांत शोक करणारे आढळत नाहींत. कर्ण जरी तुमचा बंधु होता तरी तो शत्रूला मिळाला आणि तुमच्याशीं क्रूरतेनें वागला म्हणून त्याच्या मरणाबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं–असा कुंतीच्या भाषणाचा भाव. १०. सुप्रसिद्ध आहेत बाण ज्याचे असा त्याला; अर्जुनास. पाठभेदः–''' त्या पुण्यश्लोकनायका! कुल ती । त्या=अर्जुनाला. पुण्यश्लोकनायका!=हे धर्मा! ११. कर्णमाता, राधा. १२. आर्जव. अन्वयः–कुल भस्म न व्हाया [न व्हावें म्हणून] त्या पुण्यश्लोकसायका भेटुनि त्याला ती (जसी) काकुलती करिती झाली तशी हेही माय [कुंती] यासि [कर्णातें] काकुलती करिती झाली. १३. मातेची सुतनिकट (पुत्राजवळ केलेली) प्रार्थना वृथा व्हाया उचित काय? १४. राधा+आव्हा=राधा नांव आहे जिचें ती (कर्णमाता). १५. पृथा+आव्हा=पृथा आहे नांव जिचें ती कुंती. १६. 'या चित्तीं'=कर्णाच्या मनांत.

स्वप्नांत मजसमक्षहि सूक्तींच्या शिकवि [१]सुहित [२]अर्क [३]शतें, ।
[४]उपदेशामृत तो घे नच लेशहि आंत हीरकर्कश तें. ॥ ४
मी काय ? ऐक्य तुजसीं त्यासीं रविहि न करावया शकला, ।
[५]सकलाहि जें सुदुर्घट, कैसें साधेल कार्य तें [६]शकला ? ॥ ५
केवळ [७]विपरीतमति प्रतिकूळ तुम्हांसि तो मला कळला, ।
यास्तव उपेक्षिला म्यां, वळला सूक्तें न, मत्सरें मळला.' ॥ ६
[८]त्या वचनें धर्माचे नयनांसि असूंसि निंदुनि पटपट ।
पडले गळोनि करिती ओला ते अश्रुबिंदु निपट पट. ॥ ७
धर्म म्हणे, 'माते! त्वां न करुनि हा [९]मंत्रभेद, थां [१०]तोकीं ।
पीडा [११]प्रतिष्ठिली गे! [१२]वरें सर्वां [१३]करुनि दे दया [१४]तो कीं.' ॥ ८
ऐसें म्हणोनि झाला कुंतीसुत परम तप्त रोषानें, ।
सर्व स्त्रियांवरि बहु क्षोभे [१५]एकस्वमातृदोषानें. ॥ ९
[१६]कोणीं प्रभुसि म्हणावें सुविचार मनीं करून कोपावें; ।
एकीच्या अपराधें क्षोभ बहुवरी करूं नको, पावें ? ॥ १०
'गुह्यासि आजिपासुनि दृढ कोणीहि स्त्रिया न धरितील,' ।
दे धर्म शाप हा, परि याचा स्तव सर्व सुकवि करितील. ॥ ११

---

१. कल्याण. २. सूर्य, कर्णपिता. ३. (सूक्तींच्या) शतें=शेंकडो तऱ्हेनें बोध करून. ४. तो हीरकर्कश (हिऱ्यासारखा कठीण) तें उपदेशामृत आंत लेशही न घे. ५. सर्व पदार्थांला. सकल कलायुक्त अशा सूर्याला. ६. तुकड्यास. ७. फिरलेली आहे बुद्धि ज्याची असा. ८. त्या वचनें धर्माचे नयनासि [आणि] असूंसि (प्राणांला) निंदुनि पटपट गळोनि पडले (पडलेले) ते अश्रुबिंदु पट (वस्त्र) निपट (अत्यंत) ओला करिती—असा सार्थान्वय. ह्या ठिकाणीं 'करिती' हा भूतार्थी वर्तमानकाल, ज्याला इंग्रजींत Historic Present म्हणतात, त्यासारखा आहे. ह्याचा अर्थ 'करिते झाले' असा होय. ९. रहस्यस्फोट, गुप्त गोष्ट सांगणें. १०. या बालकाचे ठिकाणीं, माझ्या (धर्माच्या) ठायीं. ११. स्थापिली. १२. श्रेष्ठ, अत्यंत. हें 'दये'चें विशेषण. येथें 'वर सर्वां' या ऐवजीं 'सर्वांवर' असा पाठ घेतला तर रचना सरळ होऊन अर्थ सुबोध होतो. १३. करूनि दे=करिता झाला. १४. कर्ण. भावार्थः—हे माते! तूं हें रहस्य न सांगून मजला दुःखांत लोटिलेंस; व त्या श्रेष्ठ पुरुषानें मात्र सर्वांवर दया केली. अर्थात् रणांगणीं आम्हांस (=धर्मादिकांस) हातीं सांपडलों असतांहि न मारून सोडून दिलें व त्यानें अशा प्रकारें दया दाखविली. १५. एकट्या आपल्या आईच्या चुकीमुळें. १६. अन्वयः—मनीं सुविचार करून कोपावें; एकीच्या अपराधानें बहुवरी क्षोभ करूं नको, [प्रसन्न हो] (असें) प्रभूसि कोणी म्हणावें. ह्या ठिकाणीं, 'प्रभू' म्हणजे सर्वांचा शास्ता' तेव्हां 'प्रभूसी कोणीं म्हणावें' म्हणजे 'धन्याचा धनी कोण?'

उद्विग्नहृदय होउनि धर्म म्हणे, 'अर्जुना! पहा काय, ।
कैसें झालें; आतां शोकीं मज वाहवे न हा काय. ॥ १२

वत्सा! तुजला कर्णाद्यातांच्या न स्वजय गमो घातें, ।
या मोघा[२] कर्मातें अनुसरलों, त्यजुनियां अमोघातें[३]. ॥ १३

जरि वृष्णिपुरीं[४] भिक्षा भक्षुनि वसतों, कशास लोकांत ।
ऐसा घातक होतों? पडतों बा! या कशास शोकांत? ॥ १४

झालों निंदित बहु गुरुमित्रसुहृत्स्वजनबंधुसुतपोतें[५]; ।
करिन वनीं चुकवाया दुस्तरसंसारसिंधु सुतपातें[६]. ॥ १५

तूं राज्य कर सितांश्वा[७]! माझ्या या उक्ति मान सत्या[८] गा! ।
सर्वस्वाच्या सजलों[९] साधाया मुक्ति मानसत्यागा[१०].' ॥ १६

अर्जुन म्हणे, 'नृपा! तुज राज्याचा उचित होय अत्याग[११]; ।
जरि पालन प्रजांचें न करिसिल, स्पष्ट हेंचि अत्याग[१२]. ॥ १७

सत्य वदति कवि, कैंचें राज्य क्लीबास दीर्घसूत्रास[१३]? ।
पाहोनि विप्रशीला[१४] पतिला पावे अपार[१५] भू[१६] त्रास. ॥ १८

त्वां तरि किमर्थ वधिले कोपें खवळोनि शक्रसम[१७] राजे, ।
ते[१८] भोगिति क्षिति, क्षितिपांतें मथिती करूनि समरा जे. ॥ १९

धर्में[१९] प्रीत[२०] करावें राज्य सुखें, निंद्य हें नव्हे राया! ।
सीतेसि रामसा या स्वश्रीस न योग्य तूं अव्हेराया[२१]. ॥ २०

[२२]तो कीं हा बहुवर्षें चिंतित होतों सदा अवसरा ज्या, ।
याकरितां कीं[२३] केले कैलासाधिपपदा नवस राजा! ॥ २१

---

१. देह. २. निरर्थका. ३. पुरुषार्थ साधणाऱ्या. ४. द्वारकेंत. ५. पात=घात, किंवा नाश. ६. कडक तपश्चर्येतें. ७. अर्जुना. ८. खऱ्या. हें 'उक्ति'चें विशेषण. ९. तयार झालों. मुक्ति साधाया, सर्वस्वाच्या मानसत्यागा सजलों—असा अन्वय. १०. अंतःकरणापासून केलेला त्याग. अन्वयः—मुक्ति साधाया सर्वस्वाच्या मानसत्यागा सजलों. ११. न टाकणें. १२. अति+आग=महापाप. १३. आळशाला, कोणत्याही गोष्टीची रघळ लावीत बसणाराला. १४. ब्राह्मणासारखा स्वभाव ज्याचा अशा. हें 'पतिला' ह्या शब्दाचें विशेषण; शमदमादिसाधन. युक्त तपस्वी—असा भाव. १५. अत्यंत. १६. पृथ्वी. १७. इंद्रासारखे. १८. अन्वयः—जे समरा करूनि क्षितिपांतें मथिती ते क्षिति भोगिति. अर्थात् तूं आतां राज्य केलें पाहिजे. १९. न्यायानें. २०. मिळालेलें. २१. टाकावयास. २२. अन्वयः—सदा ज्या अवसरा [समयास] बहुवर्षें चिंतित होतों तो हा कीं. २३. काय?

राज्य त्यजसी समरीं मेल्यांचा धरुनियां मनीं शोक,
न्यायविरुद्धाचरणें तुज काय बरें म्हणेल हा लोक?' ॥ २२
धर्म म्हणे, 'बीभत्सो[1]! बहु मानिसि तूं प्रवृत्तिच्याचि[2] पंथा,
वृद्ध न उपासिले[3] त्वां, श्रवण न केली निवृत्तिमार्गकथा[4]. ॥ २३
'ऐकाकिगम्य[5] सत्पथ कोण[6]?' असें पूस तूं मला पार्था!।
अथवा पुसल्यावांचुनि कथितों, सार्थप[7] उपेक्षिना[8] सार्था[9]. ॥ २४
वानप्रस्थाश्रम[10] हित[11], त्याहिपरिस सर्वकर्मसंन्यास[12],।
धन्यासचि हा मौने[13] श्वेताश्वा! काय होय अन्यास? ॥ २५
मुनिमान्य मुक्तिचा हा मार्ग महामहित[14] मानला मजला,।
तो काय यास जाणें, वृद्धातें आदरें न जो भजला! ॥ २६
शिरले प्रवृत्तिमार्गी, विषयसुखातें भुलोनि[15] नर कामी[16];।
तैसा होउनि जाऊं कां कळत[17] कळत[17] बळेंचि नरका मी? ॥ २७
संसारा जिंकाया होइन मी परमहंस[18] सितवाहा!।
लाविन म्हणावया त्या गांधारा[19] तेंवि यांहि कितवा[20] 'हा!' ॥ २८
भीम म्हणे, 'श्रोत्रियसा[21] तूं, त्याची तसिच बा! तुझी शुद्धी[22],।
अनुवाग्हताचि[23] जेसी त्याची, धर्मा! तसीच तव बुद्धी. ॥ २९
तत्वार्थदर्शन[24] जसें श्रुतिपाठकबुद्धिला[25] नसे कांहीं,।
तैसेंचि त्वन्मतिला तत्वार्थज्ञानलेशाही नाहीं. ॥ ३०

---

१. अर्जुना! २. संसारिकांच्या मार्गाला. ३. भक्ति केली. ४. ऐहिक विषय त्यागून परमार्थ साधण्याचा जो मार्ग त्याची माहिती. ५. एकट्यानेंच जाण्यास योग्य. ६. कोणता. ७. समूहरक्षक (धनी). ८. हेळसांड करीत नाहीं. ९. समूहास. १०. गृहस्थाश्रमानंतर ईश्वरभक्तीकरितां वनांत एकान्तस्थळीं जाऊन राहणें. ११. कल्याणप्रद. १२. सर्व कर्मांचा त्याग. १३. रुचतो. १४. प्रशस्त आणि स्तुत्य. १५. मोह पावून. १६. ज्यांची वासना प्रबळ आहे असे. १७. जाणूनबुजून. १८. समाधि वगैरेच्या योगें ज्यानें आपलीं इंद्रियें दमन केलीं आहेत असा. १९. दुर्योधनाला. २०. अन्वयार्थः–हे सितवाहा! संसारा जिंकाया मी परमहंस होईन. (व) त्या (कितवा) गांधारा तेंवि (त्या दुष्ट दुर्योधनाप्रमाणें) याहि कितवा (या दुष्ट संसारालाहि) 'हा!' म्हणावया लावीन (=जिंकीन). २१. वेदपारंगत ब्राह्मणासारखा. हें पुढील सर्व भाषण भीमाच्या स्वभावाला शोभणारें असेंच आहे. २२. पवित्रता. २३. अनुवाच्+हता=पठणानें नष्ट झालेली. २४. खऱ्या अर्थाचें ज्ञान. २५. वेद पाठ करणाऱ्याच्या बुद्धीला. अर्थ न समजतां वेदपठण करणाऱ्या भारवाहकांसंबंधानें हें वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

'[1]पंकें भरोनि [2]तृषितें टाकुनि जावें खणोनि [3]कूपातें, ।
[4]स्त्रीबालवृद्धहास्यास्पद जैसें [5]काय कर्म भूपा! तें; ॥ ३१
तसेंचि आमुचें हें कर्म नृपा! श्रम करूनि [6]जोडूनी, ।
उपभोग न करितां जें म्हणसी जावेंचि राज्य सोडूनी. ॥ ३२
क्षुधितें सदन्नपात्र त्यागावें जोडिलें करुनि यत्न, ।
[7]कीं [8]कामुकें त्यजावें जैसें निर्दोष कामिनीरत्न, ॥ ३३
किंवा [9]अखिलाहितबलपलल [10]खगश्वापदांसि चारावें, ।
[11]वारावें भय जैसें मग आपण आपणासि मारावें, ॥ ३४
तद्वत् तव कर्म नृपा! लोकां तूं मूर्ख वाटसी; मज [12]तों ।
वाटे, मूढ तुजपरिस बहु आम्हीं, कीं अशा तुला भजतों. ॥ ३५
वनवासें मुक्ति, असी येऊं देऊं मनीं नको [13]लहरी; ।
झाले मुक्त खग, हरिण, वृक, जंबुक, कां वनीं न [14]कोल [15]हरी? ॥ ३६
जरि सर्वा कर्माच्या संन्यासेंकरुनि म्हणसि सर्व [16]तरे, ।
[17]व्हावेचि मुक्त राजा! तरि हे निःशेष वृक्षपर्वत रे! ॥ ३७
प्रभुसीं काय वदों मी? [18]विद्वान् वक्ता वदे न अन्यासी, ।
[19]अवनीं [20]अवनीच्या अधिकारी क्षत्रिय, नव्हेचि संन्यासी. ॥ ३८
जे अधन, अशक्त, अलस, [21]नास्तिक, [22]कल्पक तिहींच संन्यास ।
कल्पुनियां चालविला; तैशांसचि योग्य हा न अन्यास. ॥ ३९
तो धन्य, पूर्वजाहीं जें केलें तेंचि जो करी राया!
[23]वेंचीं नृपा! प्रजांच्या अवनीं, न वनीं वृथा, शरीरा या.' ॥ ४०

---

१. चिखलानें. हा दृष्टांत या प्रसंगीं अत्यंत समर्पक आहे. २. तहानेल्यानें. ३. विहिरीतें. ४. स्त्री, लहान व वृद्ध ह्या सर्वांनीं हांसण्याजोगें. ५. ज्या कांहीं प्रकारचें करणें. ६. संपादन करून. ७. किंवा. ८. विलासी माणसानें. ९. अखिल+अहित+बल+पलल=सर्व शत्रू-सैन्याचें मांस. १०. पक्षी व पशू यांनां. ११. नाहींसें करावें. १२. तर. १३. उबळ, कल्पना. १४. वराह. १५. सिंह. १६. तरून जातात, मुक्त होतात. १७. झालेच पाहिजेत. १८. हें 'वक्ता' ह्याचें विशेषण. विद्वान् 'वक्ता' अन्यासी न वदे—असा अन्वय. १९. रक्षणीं. २०. पृथ्वीच्या. २१. श्रुति प्रमाण न मानणारे. २२. उगाच नवीन कल्पना किंवा शंका काढणारे. ह्या गीतींत संन्यासाचें ढोंग माजविणारे कोण हें सांगितलें असून खरा संन्यास फार कठीण आहे असें ध्वनित केलें आहे. २३. खर्च कर; झिजीव.

नकुळ म्हणे, 'राजेंद्रा! तूं ज्ञाना होसि धाम सत्या गा! ।
वाटे, वरा विचार न करुनि म्हणसि करिन तामसत्यागा. ॥ ४१
सर्वसुहृद्धृदयातें हें कर्म करूं नको विदाराया. ।
त्याग घडावा सात्विक; राजस, तामस न कोविदा राया! ॥ ४२
आम्हां हृदयस्थ सदुपदेशचि म्हणतात 'हो! करायास ।
त्यजुनि अहंता ममता गार्हस्थ्या सिद्ध होकरा यास.' ॥ ४३
जरि सर्वाधिक नसतें गार्हस्थ्य, सुकवि कशास या गाते. ।
याच्या साधिति, लोकीं नच मिरवाया यशास यागा ते. ॥ ४४
"एकंच करी तिघांचें, एकाचेंही तिघां नव्हे कार्य" ।
ऐसें तोलुनि वदला धाता' म्हणतात सर्वही आर्य. ॥ ४५
द्यावीं अर्थिजनाला, बहु करुनि क्रतु नवे नवे, दानें. ।
पाठ असोनिहि तरला, उक्त न करितां, न वेनें वेदानें. ॥ ४६

---

१. स्थान. तूं सत्या ज्ञाना धाम होसि—असा अन्वय. २. अन्वयः—तामसत्यागा करिन म्हणसि (तें) वरा विचार करुनि न (म्हणसि असें) वाटे. ३. त्याग तीन प्रकारचे—सात्विक, राजस आणि तामस. यांतील प्रत्येक त्याग वर्णानुरोधानें निराळा आहे. येथें क्षत्रियाचे त्याग सांगितले आहेत ते असेः—(१) धर्मानें प्रजापालनपूर्वक अर्जन केलेल्या वित्ताचा यज्ञादिक मुख्य कृत्यामध्यें जो विनियोग करणें त्यास सात्विक त्याग म्हणावें. (२) वेदाध्ययन, संतति उत्पन्न करणें, यज्ञादि धर्मकृत्यें हीं त्रिविध गृहस्थधर्माचीं कृत्यें सोडून तसेंच शेवटपर्यंत राहणें त्यास तामस त्याग म्हणावें. (३) प्रजापालनादि विहित कर्में सोडून याचनादि अन्य असें जें विप्रधर्माचें अवलंबन करणें त्यास राजस त्याग म्हणावें. पहिल्यांत ज्ञानपूर्वक कर्तव्यकर्मामध्यें धनादिकांचा त्याग असतो. दुसऱ्यांत स्वकर्तव्यासंबंधानें अज्ञानाधिक्यामुळें स्वकर्तव्याचा त्याग आणि तिसऱ्यांत कर्तव्यकर्माबद्दल ज्ञान असूनही त्या आश्रमसंबंधीं श्रास चुकविण्यास दुसऱ्याच्या धर्माचा आश्रय करून स्वकर्तव्याचा त्याग केलेला असतो. ज्यास्त माहितीकरितां व्यासकृत महाभारत—शांतिपर्व—अध्याय १२ पहा. ४. हें 'विदाराया' याचें कर्म. ५. मागील टीप ३ पहा. ६. मागील टीप ३ पहा. ७. ज्ञात्या. ८. हृदयस्थ (आमच्या हृदयांतील) सदुपदेशचि आम्हां म्हणतात, 'हो! अहंता ममता त्यजुनि यास(=तुला, धर्माला) गार्हस्थ्या सिद्ध करायास होकरा(=होकार द्या, अनुमत द्या). [म्हणून तूं] गार्हस्थ्या (गृहस्थाश्रम) करायास सिद्ध हो. ९. ते (सुकवि) याच्या (गृहस्थाश्रमाच्या) यागा [केवळ] लोकीं यश मिरवावया नच साधिति—असा अन्वय. गृहस्थाश्रम हा इतर आश्रमांपेक्षां श्रेष्ठ आहे म्हणूनच त्यांत राहून यज्ञ करितात—असा भाव. इतर तीन आश्रमांत राहणाऱ्यांचें पोषण, सर्वप्रकारचे यज्ञ आणि प्रजोत्पत्ति करून जग अस्तित्वांत ठेवणें इत्यादि कर्तव्यामुळें गृहस्थाश्रमाला श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे. १०. गृहस्थाश्रम. ११. ब्रह्मचर्य, वानप्रस्थ आणि संन्यास. १२. विचार करून. १३. यज्ञ. १४. वेन पाठ असोनिहि उक्त न करितां, वेदानें न तरला. १५. हा फार दुष्ट असल्यामुळें ह्यास ब्राह्मणांनीं शापून मारिलें होतें.

क्लेशचि भोगावा, कीं आम्हीं धर्मा! त्वदाश्रयें स्वर्ग? ।
वर्ग पुमर्थांचा दे साधुनि सत्संग कीं जसा भर्ग. ॥ ४७
हर्षावें ऐकुनि तव शक्रें कुरुनायका! यजन कानें. ।
केलें नाहीं पुण्यश्लोकें त्या काय काय जनकानें?' ॥ ४८
सहदेव म्हणे, 'पाठचि येती तुज सांग सर्वही वेद; ।
छेद न पावे कां हा? जो तव हृदयांत वाढला खेद. ॥ ४९
मुक्त्यर्थ ईश्वराचें, त्यागावें राज्य न, भजन कराया, ।
सर्वत्र अलिप्तत्वें होतें सन्मित्र नभ जनकराया. ॥ ५०
ममकार, अहंकार त्यागुनि होसील मुक्त गेहींच ।
भव अपवर्ग, मम नें मम; हे दोघे नांदतात देहींच. ॥ ५१
त्यांत ज्ञाते म्हणती, 'जरि केवळ सोडिला अहंकार ।
तरि होय शीघ्र सर्वव्यवहारोच्छेद हें नव्हे सार.' ॥ ५२
सर्वेहि मुमुक्षु म्हणतो, 'जे ममता हेचि होय मम कारा.' ।
यास्तव आधीं अंजलि जोडीं, सोडींच तोय मममकारा. ॥ ५३
तूं ममकारातेंचि त्यजुनि, सुखेंचि स्वधर्मराज्य करीं ।
या सद्योगाग्नीच्या दे निपटुनि सर्व कर्म आज्य करीं. ॥ ५४
सर्व मनःसंकल्पित जरि नाहीं त्यागिलें अगा राया! ।

---

१. धर्मार्थकाममोक्ष ह्या पुरुषार्थांचा वर्ग म्हणजे समुच्चय. २. महादेव. अन्वयः—जसा भर्ग (तसा) सत्संग पुमर्थांचा वर्ग साधुनि दे कीं. सत्संगमहिमा असा आहे कीं तेणेंकरून सर्वार्थ साधतातच असें येथें सांगितलें आहे. ३. धर्मा! ४. यज्ञ. ५. जनकानें गृहस्थाश्रमांत राहून सर्व कांहीं मिळविलें—असा अर्थ. ६. षडंगसहित. शिक्षा, कल्प, व्याकरण, छंद, निरुक्त आणि ज्योतिष हीं वेदाचीं सहा अंगें. ७. अन्वयः—जो हा खेद तव हृदयांत वाढला (तो) छेद कां न पावे? (सांग). ८. मुक्त्यर्थ ईश्वराचें भजन कराया राज्य न त्यागावें. ९. आकाशाला कोठेंही विकृति प्राप्त होत नाहीं म्हणजे तें अलिप्त राहतें; तसाच सर्व वस्तूंबद्दल नेहमीं जनकराजाही अलिप्त (ममत्वरहित) असे, म्हणून दोघांचें साहृश्य. १०. ममत्व. ११. संसार. १२. मोक्ष. १३. मीपण. १४. माझें नव्हे. मीपणाचा अभाव. मीपणामुळें मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो, पण तेंच मीपण टाकल्यास मुक्त होतो; तेव्हां मुक्त होणें किंवा न होणें हें मनुष्याच्या हातांतच आहे. १५. मीपणा. १६. सर्व+व्यवहार+उच्छेद=सकळ व्यवहारांचा नाश. १७. सत्व. १८. बंदिशाळा. १९. सोडीच तोय=जल दे=टाकून दे. २०. मीपणाला. २१. सत्+योग+अग्नि=उत्तम योगरूप अग्नीच्या. याचा संबंध 'करीं'कडे. २२. कर्मरूप घृत. २३. ज्वाळेंत, किंवा हातीं. २४. इच्छा.

तरि बा! [1]बाह्यद्रव्यत्याग [2]वृथा; त्यजसि कां [3]अगारा या? ॥ ५५
ज्याच्या मनांत लेशहि शेष वसे [4]कायविषयलोभ, वनीं ।
बाह्यद्रव्य त्यागुनि, गेला नाहीं, वसेचि तो भवनीं. ॥ ५६
[5]अंतस्त्यागी वर्तति जैसे वसती [6]सकाम हे भवनीं ।
[7]तरि बा! न म्हणावे ते करिती वसतीस कां महेभ वनीं? ॥ ५७
रम राज्यश्रीशीं, '[9]तो मुक्त करुनि जेंवि जानकी रमला ।
[10]वदलों विशंक, शिकलों होतों तें, म्हणुनि मान '[11]कीर मला.' ॥ ५८
मग आयकवी [12]कृष्णा [13]निजसूक्तिकलाप [14]लोंडकी राजा, ।
प्यावें वाणीकर्णें करुनि [15]बहुकला [16]पलाड कीरा [17]ज्यां. ॥ ५९
'[18]शोकपरा दे गेह न देहहि संताप हाहि कारा हो! ।
[19]संसारीं निजधर्मीं अचळा संता पहा, [20]हिकां राहो. ॥ ६०
[21]चातकसे बंधु, तुम्हीं यांवरि सोडा [22]दयासरी [23]घनसे. ।
[24]झालां कृपणगृहचि, कीं अर्थी अनुजोक्त, यास रीघ नसे. ॥ ६१

---

१. बाह्यविषयांचा त्याग. २. निष्फळ. ३. घराला. ४. अन्वयः—ज्याच्या मनांत लेशहि [तिलप्राय] कायविषयलोभ (शरीर आणि विषय याबद्दल आसक्ति) शेष वसे, तो बाह्यद्रव्य त्यागुनि वनीं गेला नाहीं. (तो) भवनीं वसेचि. ५. अंतःकरणापासून सर्व विषयांचा त्याग करणारे. ६. ज्यांची इच्छा कायम आहे असे, वरील गीतींत वर्णिलेले. ७. जैसे हे सकाम भवनीं वसती (तसेच जर) अंतस्त्यागी (वनांत राहून ही) वर्तति तरि बा! ते महेभ (मत्तहत्तीच) वनीं वसतीस करिती असें कां न म्हणावें? ८. श्रीराम. ९. सोडवून (रावणाच्या अटकेंतून). १०. अन्वयः—[जें] शिकलों होतों तें विशंक (बेलाशक) वदलों म्हणुनि मला कीर मान (समज). ११. कीर=पोपट. मी बोललों त्याचा मला अर्थ समजला नाहीं असेंही पाहिजे तर समज. १२. द्रौपदी. १३. निज+सूक्ति+कलाप=आपल्या उत्तम भाषणाचा समूह. १४. आवडती. १५. पटु. १६. पल्याड, पलीकडे. १७. अन्वयः—ज्या (सूक्तिकलापा) बहुकला कीरा पलाड करुनि वाणीकर्णें (प्रत्यक्ष सरस्वतीच्या कानानें) प्यावें, ती द्रौपदीची वाणी बहुकलासंपन्न अशा [सरस्वतीच्या] पोपटाच्या वाणीहून ही अधिक गोड होती—असा भाव. १८. अन्वयः—हो! शोकपरा [केवळ] गेह न [तर] देहहि संताप दे; हाहि (गेहाप्रमाणें देहहि) कारा (बंदिखाना) [होय] म्हणून अशा वेळीं देह सोडण्यास तयार नसणारास नुसतें गेह सोडून कांहीं व्हावयाचें नाहीं—असा भाव. १९. साधुसंत हे संसारांत राहून आपलें कर्तव्य करितात व मन अस्वस्थ होऊं देत नाहींत; इकडे लक्ष्य दे आणि संसाराची वीट सोडून दे. २०. उचकी, ओकारी, वीट. २१ [तुमचे] बंधु चातकसे [आहेत]. २२. दयेची सर. २३. मेघाप्रमाणें. २४. अन्वयः—कृपणगृहचि झालां; कीं [कारण] अनुजोक्त अर्थी यास रीघ नसे. भावार्थः—तुम्ही कृपणाच्या घरासारखे झालां; कारण, बंधुभाषणरूप याचकास आंत शिरतां येत नाहीं; अर्थात् तुमच्या अंतःकरणावर त्यांच्या भाषणाचा कांहींही परिणाम झालेला दिसत नाहीं.

'मारूं सत्य करुनि निज[1] पण ससहाया[2] सुयोधनास रणीं ।
मग निःसपत्न[3] होउनि भोगूं आम्हीं तुम्हीं सुखें धरणी. ॥ ६२
सुखवूं[4], दावुनि सुनया कुरुगुरुकविनयसमा[5], नयज्ञातें[6]. ।
जन तारूं[7], विस्तारूं[8] बहु शतमखमखसमान[9] यज्ञातें. ॥ ६३
ऐसें कीं द्वैतवनीं[10] वदलां, दिधलीं अभीष्ट[11] वरदानें ।
तीं अनृतें कां करितां? परिपाळावें स्ववाक्य वरदानें[12]. ॥ ६४
हृदयें वाट पहाती, मेघाची जेंवि करुनि[13] आ[13] शेतें; ।
वंध्या[14] करितां वत्सलवर्य[15] तुम्हीं सुज्ञ केंवि[16] आशेतें? ॥ ६५
क्लीब अधीरचि कळतो; करितां पर्यायशोध[17], नाढळला[18]।
कुलज, स्वव्रत सोडुनि जो नृपवर्या! यशोधना! ढळला.[19] ॥ ६६
राज्य, श्री, स्त्री, सुत हे क्लीबाला कांय होय?[20] जो धीर[21], ।
तोचि धरेतें भोगी[22] विद्वान्, विख्यात, विक्रमी वीर. ॥ ६७
बहु सुंदरहि अदंड[23] क्षत्रिय जो तो सभेंत शोभेना; ।
क्षोभे नारीसी भू, क्लीबा पतिला[24] कधींहि लोभेना. ॥ ६८
मित्रत्व सर्वभूतीं, श्रुतिशास्त्राध्ययन, शुद्ध तप, दान ।
हा[25] विप्रधर्म; कीं तो पावे, होऊनि उद्धत, पदा न. ॥ ६९
दुष्टदमन, अपलायन, युद्धीं द्यावें सदा श्रितां[26] शर्म[27], ।

---

१. आपली प्रतिज्ञा. २. स्वपक्षीय योद्धयांसहवर्तमान. ३. नाहींसे झालेले आहेत शत्रु ज्यांचे असे. ४. कुरुगुरुकविनयसमा सुनया दावुनि नयज्ञातें सुखवूं—असा अन्वय. ५. कुरुकुळांमध्यें वडील व ज्ञाता अशा (भीष्माचार्यांच्या) नीतीसारखी. ६. नीतिविशारद अशा लोकांना. ७. उद्धार करूं. ८. समारंभानें करूं. ९ इंद्राच्या यज्ञाप्रमाणें. १०. पांडव हस्तिनापुरांतून वनवासास निघाले तेव्हां प्रथम ह्या वनांत आले होते. ११. इच्छित. १२. वर देणाऱ्यानें. १३. आ करुनि=अति उत्कंठेनें. १४. व्यर्थ; निष्फल. १५. प्रेम करणाऱ्यांत श्रेष्ठ. १६. कसें. १७. रीतीचा विचार. पर्याय=रीति, राहटी. १८. दृष्टि पडला नाहीं. १९. अन्वय:—पर्यायशोध करितां, क्लीब अधीरचि कळतो; (हे) यशोधना नृपवर्या! जो कुलज [तो] स्वव्रत सोडुनि ढळला [असा] नाढळला (न+आढळला=पाहण्यांत आला नाहीं). २०. काय होय?=ह्या गोष्टीचा (नपुंसकास) काय उपयोग? २१. गंभीर. २२. ह्या शब्दांतील श्लेष 'क्लीब'शब्दावरून सहज ध्यानांत येईल. २३. राजदंडहीन. २४. राजा, पक्षीं नवरा. २५. हा (मागील अर्थात सांगितलेला) विप्रधर्म. कीं (कारण) तो (विप्र) उद्धत होऊनि (उच्च) पदा न पावे—असा सार्थान्वय. २६. आश्रयास राहणारांनां. २७. सुख.

राजांचा[1] हाचि परम हेतु अशेषार्थसिद्धिचा धर्म. ॥ ७०
क्रोध, क्षमा, अनुग्रह[2], विग्रह[3], भय, अभय, दान, आदान[4] ।
जेथें[5] तो धर्मात्मा; होय इतर पात्र साधुवादा न. ॥ ७१
गेले सोडुनि पावुनि तुजपासुनि बहु रणीं इलाप[6] दर[7]; ।
नच पसरिला परांला त्वां संपादावया इला[8] पदर[9]. ॥ ७२
सोडविली श्रीदशरथदायादें[10] दमुनि[11] खळे[12] जसी महिला[13], ।
पुण्यश्लोका **धर्मा**! सोडविलें त्वां तसेंचि या महिला[14]. ॥ ७३
त्या प्रभुला[15] **सीतेचा**, तुज भूचा[16] त्याग वाटला कार्य[17]. ।
त्या[18] कर्मा अनुमोदन[19], तैसें[20] देती न यांसही आर्य. ॥ ७४
'आपत्[21] सरेल सत्वर वत्से[22]! चिरकाळ तूं असें सासू[23]; ।
**धर्म** तुला सुख देइल'. मज माजी[24] बोलिली असें सासू[25]. ॥ ७५
आर्येची[26] आशी:श्रुति[27] सत्या पूज्या[28] सदा इलापा[29]! हे ।
त्यागदुराग्रह[30] कळि हा मिथ्याचि करावया इला पाहे. ॥ ७६
तव उन्मादें[31] भ्रमले[32] **भीमार्जुन भरत**नायका! यमही[33] ।
सावध असते, तरि तुज बांधुनि[34] हे शासिते[35] न काय मही? ॥ ७७
भ्रांति[36] हिताहित न कळों दे मोहुनि मानसा[37], धुरी[38] तीतें ।

१. अन्वय:—हाचि राजांचा परम (मुख्य) धर्म [व] अशेषार्थसिद्धिचा हेतु. हाच राजाचा धर्म असून ह्या योगानेंच त्याचे सर्व पुरुषार्थ साधतात—असा भाव. २. संधि. ३. युद्ध. ४. घेणें. ५. उत्तरार्धान्वय:—जेथें (ज्याचे ठिकाणीं) [पूर्वार्धातील गोष्टी असतात] तो धर्मात्मा (साधु) होय. इतर (पुरुष) साधुवादा (स्तुतीस) पात्र न. ६. राजे. ७. भय. दर पावुनि=भीति प्राप्त होऊन. ८. पृथ्वी. हें 'संपादावया' ह्याचें कर्म. ९. पदर पसरणें=दीन होऊन मागणें. १०. श्रीदशरथ+दायादें=दशरथाच्या मुलानें. ११. मथुनि. १२. दुष्ट, रावण. १३. स्त्री; अर्थात् सीता. १४. पृथ्वीला. १५. श्रीरामचंद्रास. १६. पृथ्वीचा. १७. करावयास योग्य. १८. सीतात्यागास. १९. संमति. २०. भूत्यागास. २१. दुर्गति. २२. हे द्रौपदि. २३. सप्राण, जीवंत. २४. माझी. २५. कुंती. २६. श्रेष्ठकुंतीची. २७. आशीर्वादरूप वेदवाणी. २८. आदरार्ह. २९. भूपा! धर्मराजा! ३०. पृथ्वीचें राज्य सोडून वनवास अंगिकारण्याचा हट्ट. अन्वय—त्यागदुराग्रह हाचि (च) कळि (कलि) इला (आशी:श्रुतिला) मिथ्याचि (विफल) करावया पाहे. ३१. वेडेपणामुळें; हट्टामुळें. ३२. मोह पावले. ३३. नकुलसहदेव. ३४. आळा घालून. ३५. हे मही न शासिते काय? ह्यानीं पृथ्वीचें राज्य चालविलें नसतें काय? अर्थात् चालविलें असतें—असा भाव. ३६. मोह. ३७. मानसा मोहुनि=अंत:करणाची विचार करण्याची शक्ति नाहींशी करून. ३८ तीतें (भ्रांतीला) दूर कराया धुरी द्यावी. कोणीही मनुष्य पिशाचानें झपाटला आहे अशी कल्पना झाल्यास त्या मनुष्यास मिरच्यांची धुरी देतात हें प्रसिद्ध आहेच.

दूर कराया धावी. भ्रांत[1] न दे मान साधुरीतीतें. ॥ ७८
अत्युत्तमाचि तुमची रीति जनामाजि; मीच अधमा, जी ।
वांचावें म्हणतें, कीं बुद्धि[2] विसरलीच पुत्रवध मोजी. ॥ ७९
मेळविति संपदा हे[3], तूं मेळवितोसि आपदा राया! ।
[4]शीत स्वल्पचि वाहति नेत्रें बहु उष्ण आप दारा या. ॥ ८०
[5]लोटिसि कसें पदें जें मत[6] शक्रपदा पद[7], भ्रमांधा! त्या? ।
तुज जेंवि [8]अंबरीषा कीं यश आलें अदभ्र[9] [10]मांधात्या. ॥ ८१
झालासि वृथा विमना[11], पाळीं, त्यागीं कदा न वसुधेतें. ।
इतें सुरसा[12] समुचित[13] तूंचि; परें[14] जसा न दानव सुधेतें. ॥ ८२
भोगावी[15], धर्में बहु कीं ये संपत्ति लेश देवा! जी; ।
विप्रांसि दास, दासी, गज, गाई, ग्रास, देश दे वाजी.' ॥ ८३
पुनरपि अर्जुनभीम प्रार्थिति नानाविधें सदुक्तिशतें[16]; ।
बहु बोलणें तयांचें धर्माच्या येईनाचि युक्तिस[17] तें. ॥ ८४
देवस्थान मुनि म्हणे, 'धर्मा! गुणसंपदर्णवा[18]! त्यागा[19] ।

---

१. वेडा झालेला. २. माझी बुद्धी. ३. भीम, अर्जुन, नकुल व सहदेव हे. ४. अन्वयः–या दारा (तुमच्या स्त्रिया) नेत्रें उष्ण बहु, शीत स्वल्पचि (असे) आप (पाणी, अश्रु) वाहती. दुःखाचे अश्रु उष्ण व आनंदाचे शीत असतात. ५. पदें लोटिसि=लाथाडितोस. ६. मान्य. ७. राज्यपद. ८. हा नाभाग राजाचा पुत्र. हा परमदानशूर व भगवद्भक्त असून इतका पराक्रमी होता कीं त्यानें भूमीचा जय सात दिवसांत करून तिचें आधिपत्य संपादिलें. दुर्वास ह्याचेकडे आले असतां रागावले व स्वकेशनिर्मित कृत्या ह्याजवर सोडिली. तेव्हां भगवानाच्या सुदर्शन चक्रानें तिचा नाश केला व तें दुर्वास ऋषींच्या मागें लागलें. तेव्हां अंबरीषानेंच त्या चक्राची फार स्तुति करून संतुष्ट केलें. मग तें स्वस्थानीं गेलें व दुर्वास मुक्त झाले. ९. पुष्कळ. १०. हा महापराक्रमी व दानशूर असा राजा होता. ह्यास लवणासुरानें मारिलें. ह्याच्या राज्यांत बारा वर्षें अवर्षण झालें असतां स्वतपोबलानें पर्जन्यवृष्टि करून ह्यानें सर्व प्रजा सुखी केल्या. ११. निरुत्साह. १२. देवाप्रमाणें. १३. योग्य. १४. अन्वयः–जसा सुधेतें दानव (समुचित) न (तसा इतें) पर (तुझ्याशिवाय दुसरा) (न). १५. अन्वयः–(हे) देवा! बहु कीं लेश जी संपत्ति धर्में ये ती भोगावी. १६. सत्+उक्ति+शतें=शेकडों उत्तम भाषणांनीं. १७. युक्तिस येईना=मनास पटेना. १८. गुण+संपत्+अर्णव=गुणरूपी संपत्तीच्या समुद्रा! १९. सुखोपभोगाच्या त्यागाला.

विप्र उचित; पर[1]धर्मस्वीकृति [2]शुभशुष्कपर्णवा[3]त्या गा!' ॥ ८५
पार्थ म्हणे, 'दं[4]डाचें धारण संन्यासिया जसें आहे ।
तैसेंचि [5]दंडधारण राजासहि सुमुनि सांगती बा! हे. ॥ ८६
राजांसि दंडधारण [6]उत्तमगतिहेतु होय; [7]पापा हें ।
नाशी, यश दे; तरला सुद्युम्न; मुनीस पुसुनि बा! पाहें. ॥ ८७
[8]व्यासातें धर्म पुसे कीं तन्मति सतत सद्यशीं लोलीं, ।
'बा! दंडधारणें तो तरला सुद्युम्न नृप कसा? बोला.' ॥ ८८

---

## अध्याय पांचवा.

व्यास म्हणे, '[9]शं[10]ख[11]लिखितनामक [12]सुतपःक्रियापर महर्षी ।
होते पृथक् करुनि बहु वित्ता[13]न्नार्थिप्रिया परम हर्षी. ॥ १
[14]स्वपरौदार्यक्रौर्यसुगुणजितजळमुग्धराशिशु भ्राते ।
मेळविति सदाचारें कीर्ति सदा दुग्धराशिशुभ्रा ते. ॥ २
'[15]यत्तेजें कामाचरि शिष्यांचे, त्यजुनि केलि, खितपावे; ।
त्या शंखाभिधमुनिच्या पुण्याश्रमभूमिके लिखित पावे. ॥ ३

---

१. दुसऱ्याच्या धर्माचा स्वीकार. २. हितप्रद. ३. वावटळ. अन्वयः—देवस्थान मुनि म्हणे, '(हे) गुणसंपदर्णवा धर्मा! त्यागा विप्र उचित; गा! परधर्मस्वीकृति शुभशुष्कपर्णवात्या (होय). भावार्थः-त्याग करणें हें ब्राह्मणाचें कर्तव्य. कारण, हा विप्रधर्मच होय. परंतु हे धर्मराजा! परधर्मस्वीकार म्हणजे कल्याणरूपी पिकलेल्या पानाला उडविणारी वावटळ आहे. परधर्मस्वीकारानें कोणाचेंही हित होणार नाहीं—हा भाव. ४. काठीचें. ५. राजवेत्राचा स्वीकार, अधिकार चालविणें, अपराध[illegible] शिक्षा करणें. ६. उत्तमगतीचें कारण; ज्यायोगें उत्तमगति प्राप्त होते असें. हें 'दंडधारण' याचें विशेषण. ७. अन्वयः—हें (दंडधारण) पापा नाशी, यश दे; (येणें) सुद्युम्न तरला; बा! (हें) मुनीस (व्यासाला) पुसुनि पाहें. ८. सुद्युम्नकथा पुढील अध्यायांत (अ० ४ शांतिपर्व) आहे. ९. कारण. १०. लुब्ध. ११. शंख व लिखित नांवाचे. हे दोघे ऋषी भाऊ भाऊ होते. १२. उत्तम तपाचरणामध्यें निमग्न. १३. वित्त+अन्न+अर्थि+प्रिया=द्रव्य व अन्न यांची याच्ञा करणाराचें जें हित, त्याला. हें 'करुनि' याचें कर्म. ०प्रिया करुनि=याचकांना द्रव्य व अन्न देऊन. अर्थि=याचक. अन्नद्वारा व द्रव्यद्वारा लोकांवर उपकार करून मोठ्या आनंदांत वेगळे राहत होते—असा भाव. १४. स्व+पर+औदार्य+क्रौर्य+सुगुण+जित+जळमुक्+धराशिशु=आपल्या उत्तम औदार्यानें व क्रूरत्वानें जिंकिले आहेत मेघ व मंगळ ज्यांनीं असे. १५. अन्वयः—यत्तेजें शिष्यांचे कामाचरि केलि [क्रीडा] त्यजुनि खितपावे. ज्या शंखमुनीच्या सामर्थ्यामुळें त्याच्या शिष्यवर्गावरही षड्रिपूंचा पगडा बसला नव्हता—असा भाव.

आम्रा, रंभावृक्षा, पाहे परिणतफळा लिखित पनसा; ।
क्षुधित म्हणुनि खाय फळें, जो वैरतेजोगुणें शिखिंतपनसा. ॥ ४

पनसादिपादपांचीं पाडुनि जों परिणतें फळें भक्षी, ।
तों तेथें येउनि तो सहसा शंख स्वसोदरा लक्षी. ॥ ५

'कोणीं तुज दिधलीं? हीं कोठील फळें?' असें पुसे विप्र, ।
सांगे लिखित यथार्थ भ्रात्यानें चरण वंदुनि [६] क्षिप्र. ॥ ६

शंख म्हणे, 'चौर्य तुला घडलें; न विचारितां फळें पक्षी ।
भक्षी कीं कपि; सुज्ञ, प्राणासि न, पुण्यसंग्रहा रक्षी. ॥ ७

जा, सुद्युम्ननृपाला सांग, करिल दंड; अंह रायाला ।
कळवावें, वैद्याला दुःख; कुशळ तोचि संहरायाला. ॥ ८

जाय लिखित; [१०] ऐकुनि ये नृप, सोडुनि सर्व काज, सामोरा; ।
होय तया हर्ष मुनिस पाहुनि, मेघास बा! जसा मोरा. ॥ ९

भूप म्हणे, 'भगवंता! लिखिता! ज्या पातलासि कार्यातें ।
उघडुनि सांग मला, 'म्यां दासें केलेंचि जाण आर्या! तें.' ॥ १०

लिखित म्हणे, 'शंखानें [१३] न दिल्हीं म्यां भक्षिलीं फळें पिकलीं, ।
शासीं [१४] विप्रांगें तव राष्ट्रीं चोरी करावया शिकलीं.' ॥ ११

सुद्युम्न म्हणे, 'स्वामी! स्पष्ट जसा दंडधारणीं राजा ।
होय प्रमाण, आज्ञाविपर्यीहि [१६] तसाचि; शुद्ध तूं; बा! जा. ॥ १२

झालासि, मदाज्ञेनें नाशुनियां कीर्तनेंहि पाप, शुची; ।

---

१. पिकलेलीं आहेत फळें ज्यांचीं अशा. हें 'आम्रा, रंभावृक्षा, पनसा' ह्यांचें विशेषण. पुढें गीति ५ पहा. २. फणसांना. ३. उत्कृष्टसामर्थ्यरूप गुणामुळें. ४. अग्नि व सूर्य ह्यां-सारखा. ५. खरा वृत्तांत. ६. सत्वर. ७. अन्वयः–शंख म्हणे, 'तुला चौर्य घडलें; पक्षी कीं (किंवा) कपि न विचारितां फळें भक्षी; सुज्ञ पुण्यसंग्रहा रक्षी, प्राणासि न. ८. शहाणा मनुष्य. ९. अन्वयः–रायाला अंह(पाप) [आणि] वैद्याला दुःख कळवावें, [कारण] (तें) संहरायाला तोचि कुशल. उत्तरार्ध सुभाषित आहे. १०. [लिखित आला हें] ऐकुनि, सर्व काज (काम) सो-डुनि नृप सामोरा ये. ११. मोकळें मन करून. १२. मला सांग कीं काम झालेंच म्हणून समज. १३. न दिलेलीं. १४. ब्राह्मणांचे हात वगैरे अवयव. १५. राजवेत्र हातीं घेणें अर्थात् राज्य-कारभार पाहणें व प्रजाजनाच्या सुखोत्पत्तीकडे लक्ष ठेवून अन्यायाचें शासन करणें, ह्या कामांत. १६. प्रमाण. १७. निर्दोष. १८. अन्वयः–मदाज्ञेनें [आणि] कीर्तनेंहि (उच्चार केल्यानेंही) पाप नाशुनियां शुची (शुद्ध) झालासि.

सेकेंचि[1] मनुष्याची पीडा[2], डागेंचि जाय बा! पशुची. ॥ १३
बा[3]! वाढिव, मागुनि गृह गज हरि मणि भूमि कन्यका, महिम्या; ।
करिजेतिल[4] सर्व तुझें सर्वस्वें सिद्ध अन्य कामहि[5] म्यां. ॥ १४
बहु लोभविला[6] भूपें, परि मुनि कुरुनायका! वैळेनाच[7]. ।
काम[8] कविस लोभविते, तरि हंसा करुनि कावळे नाच. ॥ १५
द्यावें[9] उष्णचि जळ मग सोडीना उष्ण ताप करकापा।
तैसें[10] करी नृप, म्हणे दासांतें, 'शीघ्र लिखितकर कापा.' ॥ १६
मग जाउनि लिखित म्हणे, 'कथुनि नृपा उक्त दंड करवीला.' ।
शंख म्हणे, 'वांटो सुत जो हा पाहोनि दंडक रवीला. ॥ १७
वत्सा! धर्म[11] ने[12] लोपो, जा, मज्जनतर्पणादि[13] साधुनि घे.' ।
या गुरुच्या आज्ञेनें साधाया नित्यकर्म साधु निघे. ॥ १८
जाउनि नदींत दे तो[14] सत्वाचा[15] निधि भला बुचकळीला[16]; ।
साधुचि[17] तारक; त्यासीं करु नीरस जड अलाबुच कळीला. ॥ १९

---

१. शेकल्यानें. 'शहाण्याला शब्द, मूर्खाला बडगा' अशा अर्थाचेंच हें गीत्यर्थ आहे. २. रोग. ३. अन्वय:–बा! [मजपाशीं] गृह, गज, हरि (घोडे), मणि, भूमि, कन्यका (यांतें) मागुनि महिम्या वाढिव. आनंदांत संसार करून रहा–असा अर्थ. ४. केले जातील. ५. इच्छा. ६. मोहविण्याचा यत्न केला. ७. ऐकेनाच. ८. [जरि] काम (इच्छा) कविस (शहाण्यास) लोभविते, तरि कावळे नाच करुनि हंसा [लोभविते]–असा सार्थान्वय. ९. अन्वयार्थ:–उष्णचि जळ द्यावें (=उन्ह पाणी गारांवर ओतावें म्हणजे) मग (जसा) उष्ण ताप (=त्या तापलेल्या पाण्यांतील तीव्र उष्णता) करकापा (=गारांच्या पाण्याला) सोडीना (=सोडीत नाहीं) तैसें नृप करी इ०. ज्याप्रमाणें गारांवर ओतलेल्या सळसळणाऱ्या पाण्याची उष्णता थंडगार गारांना वितळवून उष्ण करिते, त्याप्रमाणें लिखिताच्या निस्पृह व बाणेदार वर्तनानें राजाही बाणेदार झाला व योग्य कडक शिक्षा करण्याचा त्यानें निश्चय केला व म्हणाला इ०. १०. अन्वय:–जो हा दंडक [शास्ता, सुद्युम्नराजा] तो पाहोनि रवीला सुत वाटो. रविसुत=शनैश्वर. शनिमाहात्म्यांत विक्रम राजाचा हात तुटलेली स्थिति सांगितली आहे. त्याचप्रमाणें येथें सुद्युम्नाचे आज्ञेवरून लिखिताचे हात तोडले; व म्हणून एवढ्यापुरतेंच शनि व सुद्युम्न यांचें साम्य आहे. ११. नित्यकर्म. १२. न लोपो=न अंतरो, अंतरूं नये. १३. स्नानब्रह्मयज्ञादि. ब्रह्मयज्ञांत देवतर्पण, ऋषितर्पण व पितृतर्पण असतें. १४. लिखित ऋषी. १५. सत्वगुणाचा किंवा धैर्याचा सागर. १६. बुचकळीला दे=बुडी मारिता झाला. १७. अन्वय:–साधुचि तारक (उद्धारकर्ते; पक्षीं तारणार); त्यासीं [साधुसीं] नीरस जड अलाबुच कळीला करु [करो]. समानधर्मामुळें मनुष्याला तारण्याच्या कामीं भोपळा (अलाबु) साधूंशीं कलह (स्पर्धा, चढाओढ) करो. पण खरें तारण (संसारापासून–पाण्यापासून नव्हे) साधूच करतात. येथें 'तारक' 'नीरस' आणि 'जड' हीं पदें 'सश्लेष' आहेत. श्लेष स्पष्टच आहे.

आचमनाला लागे घ्याया त्या [1]थोंटकेंचि जों पाणी, ।
आले [2]बाहुयुगीं [3]नवनलिनमलिनकर सुरम्य तों [4]पाणी. ॥ २०

विस्मित झाला चित्तीं बहु, [5]तें पाहोनि, तो लिखित, चित्र; ।
गमला नदीप्रवाहीं, स्फटिकमणितळीं जसें [6]लिखित चित्र. ॥ २१

जींत नवल हें, [8]नामें होउनि ती बाहुदा नदी नांदे, ।
[9]अंजुनिही या पापां पतितांतें बाहुदान दीनां दे. ॥ २२

लिखितें हस्त शिरासह शंखपदीं वाहिले [11]उपायनसे ।
श्रीगुरुचें उतराई व्हाया नमनाविणें उपाय नसे. ॥ २३

दावी असकृत् प्रेमें नव करकमळें स्वयें लिखित पाहे. ।
शंख म्हणे, 'म्यां स्वतपें केले तव [12]भव्य [13]नव्य कर बा! हे.' ॥ २४

लिखित म्हणे, '[14]जिंकाया तप सर्वतपस्विनायकां होतें. ।
दंडापूर्वीच [15]'दुरित माझें हरिलें तुम्हीं न कां हो! तें?' ॥ २५

शंख मुनि म्हणे, 'वत्सा! तुज दंडधरें नृपेंचि दंडावें; ।
म्यां ऐसेंचि करावें, भवबंधन हरुनि, दुःख खंडावें. ॥ २६

झालासि पूर्वजांसह तूं, तो सुद्युम्नही, शुचि; [16]तरा जा; ।
तरतो, दंडुनि घे तो; करितो शासनहि जो उचित, राजा.' ॥ २७

ऐसी प्राचीन कथा तुज कथिली म्यां, करूनियां कर्मा ।
[17]प्राचेतसदक्षतसा पावे सुद्युम्न सिद्धितें धर्मा! ॥ २८

अर्जुन समजुनि वदतो, तूं समज, [18]उणें करूं नको दंडा. ।
बा! दंडेंचि [19]क्षत्रा यश, जेंवि [20]गुणेंकरून [21]कोदंडा. ॥ २९

विप्रास [22]ब्रह्मपदप्रद होय, तसें न मुंडन क्षत्रा. ।

---

१. तुटलेल्या हातानें. २. हस्तद्वयाचे जागीं. ३. नव+नलिन+मलिनकर=नूतन कमळांना मागें सारणारे. हें 'पाणी' याचें विशेषण. ४. हात. ५. ती आश्चर्यकारक गोष्ट. ६. काढलेलें; कोरलेलें. ७. बाहुलें. आश्चर्यानें स्तब्ध उभा राहिला—असा अर्थ. ८. नांवानें. ९. हात देणारी. उत्तरार्धातील 'बाहुदान' पद श्लिष्ट आहे. बाहुदान=(१) नवीन हात देणें; (२) हातभार लाविणें, मदत देणें. १०. हें कवीचें म्हणणें आहे. ही बाहुदा नदी कोठें आहे? ११. भेट म्हणून. १२. उत्कृष्ट. १३. नवे. १४. सर्व तपस्विनायकां जिंकाया (जिंकण्यासारखें) [तुमचें] तप होतें. १५. पाप. १६. उद्धार पावा. १७. प्रचेतस नामक ऋषीचा पुत्र व प्राचीनबर्हिराजाचा पौत्र जो दक्ष त्याप्रमाणें. १८. दंडा उणें करूं नको=राजदंडाला कःपदार्थ समजूं नको. १९. क्षत्रियाला. २०. दोरीच्या योगानें. २१. धनुष्यास. २२. ब्रह्म+पद+प्रद=ब्रह्मपद देणारें. हें 'मुंडन' याचें विधिविशेषण.

[1]गज पावेल गणपसा होउनि उन्नीतशुंड नक्षत्रा?' ॥ ३०

अर्जुन म्हणे, 'मुकुंदा! [2]विज्वर बोधें तुझ्या तरी [3]हो हा. ।
धर्माला धर्म कळिव, वळिव, पळिव [4]कलिवनानळा! मोहा.' ॥ ३१

बाळपणापासुनि जो धर्मास [5]अलंघ्य [6]वेदसा राया! ।
प्रेमें [7]विजयाधिक तो देव पुढें होय खेद [8]साराया. ॥ ३२

भुज धरुनि म्हणे, 'राजा! धर्मा! तुज हे [9]दशा नसे उचिता ।
बुध म्हणती, '[10]रोगहंता क्षत्रियदेहा कदा न [11]सेउं चिता.' ॥ ३३

क्षत्रिय ते शोच्य, '[12]गदें ज्यांचीं झालीं गृहांत [13]अवसानें. ।
शस्त्रें [14]रणमरण असें मागावें ईश्वरास नवसानें. ॥ ३४

त्यांस रडावें, मेले असतिल दावूनि जे [15]परां [16]पाठ. ।
तुज [17]रणमखप्रयोग क्षत्रियतिलका! असे बरा [18]पाठ. ॥ ३५

त्वां शोक मोह जाया केलें [19]आचार्यवर्यकुळभजन, ।
तें निष्फळ न करावें, जो मेला तो नव्हेचि [20]सुलभ जन. ॥ ३६

तुज ती शोक शमाया कथितों; जी [21]सर्वसाधुराय [22]कवी ।
हा [23]देवर्षि कथा सुतशोकार्ता [24]संजयासि आयकवी.' ॥ ३७

ऐसें म्हणुनि, [25]मरुत्तप्रमुख नृपांच्या कथी कथा सोळा, ।
[26]खोळा हर्षांच्या ज्या म्हणति [27]अमृतघनघटासि, '[28]करें चोळा.' ॥ ३८

---

१. उन्नीत शुंड होउनि (सोंड उंच करून) गज गणपसा (गणपतीप्रमाणें) नक्षत्रा (स्वर्गास) पावेल? अर्थात् नाहीं. येथें 'पावे न' असा पाठ अधिक सरळ होऊन, काक्वर्थ घेण्याचें प्रयोजन राहिलें नसतें. २. मनःसंताप नष्ट झाला आहे ज्याचा असा. ३. होवो. ४. कलिरूप अरण्याविषयीं अग्नी-सारख्या हे कृष्णा! ५. ज्याचा शब्द मोडावयाचा नाहीं असा. ६. वेदाप्रमाणें. ७. अर्जुनाहून अधिक. ८. नाहींसा करण्याकरितां. ९. मोहस्थिति. हा शब्द दुःखदस्थिति ह्या अर्थीच योजि-तात. १०. रोगानें ग्रस्त होऊन गतप्राण झालेला. ११. सेवो. क्षत्रियाला रोगानें मृत्यु न यावा, धारातीर्थी यावा हेंच उत्तम–असा भाव. १२. रोगानें. १३. अंत. १४. समरभूवर, शस्त्रानें येणारें मरण; धारातीर्थी पतन. १५. शत्रूंस. १६. पाठ दाखविणें=माघार किंवा कच खाऊन भीतीनें तोंड फिरवून समरांगणांतून पळून जाणें. १७. समररूपी यज्ञाची रीत, कर्म. १८. अवगत. १९. गुरुश्रेष्ठांच्या समुदायाची सेवा. २०. (परत) मिळण्यास सोपा. २१. सर्व संतांचा अग्रणी. २२. कवि=ज्ञाता. २३. नारद. २४. शिबिदेशाचा राजा त्यास. २५. ह्याच सोळाजणांच्या सवि-स्तर कथा द्रोणपर्वांत अध्याय ४, ५, ६ ह्यांत आहेत. २६ पिशव्या. २७. अमृतरूप मेघांच्या समूहास. २८. कर चोळणें=हस्त चोळणें, हात चोळणें. ही स्थिति मनाचें दैन्यदर्शक आहे. अमृत पिऊन होणाऱ्या हर्षापेक्षां ह्या कथा ऐकून अधिक आनंद होतो–असा भाव.

पहिला मरुत्त राजा कथिला, नरपति सुहोत्र तो दुसरा, ।
तिसरा बृहद्रथ, जया भजले अर्थी जसे पिपासु[1] सेरा[2]. ॥ ३९

शिबि[3] औशीनर चवथा कथिला जो शुद्धकीर्तिलाभरत[4], ।
मग पांचवा नराधिप दुष्यंततनूज कीर्तिला[5] भरत. ॥ ४०

बहु पावले जयाच्या सुयशीं जितकालकलि[6] नर विसावा[7], ।
तो वर्णिला प्रभूत्तम नरवर रघुवंशनलिनरवि[8] सावा. ॥ ४१

नृप सातवा भगीरथ, तैसाचि दिलीप आठवा, याचा ।
कथिला अद्भुत महिमा चित्तांत सदैव आठवायाचा[9]. ॥ ४२

मांधाता नृप नववा, भूप दहावा ययाति न करावा ।
दूर मनांतुनि पळही; कथिला तो अंबरीप अकरावा. ॥ ४३

शशबिंदु इंदुनिर्मळकीर्तिधवलितत्रिलोक[10] बारावा, ।
तेरावा गय, ज्याच्या साधुत्वें शक्रगर्व वीरावा[11]. ॥ ४४

परमोदार सकळगुणरत्नाकर[12] रंतिदेव चवदावा, ।
जो कांहीं न उरों दे अर्थिमनीं[13] खंति[14], देवच वदावा. ॥ ४५

वाखाणिला मुकुंदें अनरिपुढें[15] सगर पंधरावा ही, ।
तद्यश दुर्लभ, शिर शिवचरणीं कापुनि कंधरा[16] वाही[17]. ॥ ४६

ज्याच्या सुयशीं, व्हाया अति विमळ धवळ, सुधांशु घोळावा[18], ।
अजितें संस्तविला तो पृथु वैन्यें[19] जितार्थिदैन्य[20] सोळावा. ॥ ४७

विश्वगुरु म्हणे, 'ज्ञाते, दाते, करिते[21] समस्त सव लोकीं ।
ठेवुनि सयश गेले, उघडुनि विवेकचक्षु अवलोकीं. ॥ ४८

---

१. उदक पिऊं इच्छिणारे; तृषित. २. सरोवरास. ३. उशीनर देशाचा राजा शिबि. ४. निर्मल अशा यशप्राप्तीच्या मार्गे लागलेला. ५. वर्णिला. ६. जिंकलेला आहे काल व कलि ज्यांनीं असे. ७. विसावा पावले=संतुष्ट झाले. ८. रघुवंशरूप कमळाचा सूर्य, राम. ९. स्मरावयाचा. हटकून लक्षांत राहणारा. १०. चंद्रबिंबाप्रमाणें स्वच्छ अशा यशानें उज्ज्वलित केलें आहे त्रैलोक्य ज्यानें असा. ११. नाहींसा करावा. १२. सर्व गुणांचा समुद्र. १३. याचकांच्या अंतःकरणांत. १४. खेद; मळमळ; असोशी. १५. धर्मराजापुढें. १६. मान. १७. अर्पण करता झाला. १८. सुधांशु (चंद्र) अति विमळ [आणि] धवळ व्हाया ज्याच्या सुयशीं घोळावा—असा अन्वय. कलंकित चंद्राला पृथुराजाचें यश स्वच्छ करील—असा भाव. कविसंकेताप्रमाणें यशाचा रंग पांढरा आहे. १९. वैन्य=वेनराजाचा पुत्र. २०. नाहींसा केला आहे याचकांचा खेद ज्यानें असा. २१. समस्त सव करिते (यज्ञ करणारे) दाते, ज्ञाते लोकीं सयश ठेवुनि गेले.

सर्वहि अनित्य, दुःखचि लोक जरिहि परम हा गमे रुचिर. ।
किति नर? न रहायाचा अढळ, दिसे परि महाग मेरु चिर.' ॥ ४९
'त्वां न वधिले, न भीमें, न सिताश्वें हे प्रवीर न यमांनीं.' ।
व्यास म्हणे, 'राजा! हा केला काळेंचि लोकलय[3] मानीं. ॥ ५०
साधो! बाधो आधि न, जरि धरित्ये नरकपातभय मेधा ।
तरि शक्रसा करीं, तूं झालासि निमित्त, म्हणुनि हयमेधा. ॥ ५१
मृतभूपकुटुंबांचें आपण निववावया मन घरा जा, ।
होतो प्रजासमवनें हयमेधें निश्चयें अनघ राजा. ॥ ५२
असतिल राजसुत तयां अभिषेक करूनि राज्य दे [12]होतें, ।
[13]देतें वात्सल्य यश प्रभुतें, बळ जेंवि आज्य देहातें. ॥ ५३
[14]द्वेषें करोत सवती पोटीं जाणोनि गर्भ कलहा न, ।
अभिषेकावे त्वां नृपदारहि, मग कां न अर्भक लहान? ॥ ५४
किंबहुना जा पांचहि, राज्यपदीं बैसवूनि कन्या, या. ।
बहु रंजवा प्रजांतें, होऊं देऊं नकाचि अन्याया. ॥ ५५
करितें बहु प्रजांचें [18]केलें अघशोकहानि रंजन हो! ।
वारुनि सर्व उपद्रव, करुनि सुखी लोक हा, [19]निरंजन हो.[20] ॥ ५६

---

१. अन्वयः—सर्वहि अनित्य; हा लोक जरिहि परमरुचिर गमे (तरी) दुःखचि (दुःखदायकच). नर किति? [मनुष्य कितीसा चिर असणार? अर्थात् नाहीं] महाग (महापर्वत) मेरु अढळ दिसे परि चिर न रहायाचा. २. नकुलसहदेवांनीं. ३. लोक+लय=लोकांचा संहार. ४. समज. ५. मनः-क्षोभ. ६. [तुझी] बुद्धि, मन. ७. लोकलयाला निमित्त (कारण). ८. अश्वमेधास. ९. 'कुटुंबातें' असा सर्वसंग्रहाचा पाठ. १०. प्रजांच्या रक्षणानें. ११. निष्पाप. १२. आपल्या हातानें. हा उपदेश लक्षांत घेण्यासारखा आहे. १३. अन्वयः—जेंवि आज्य (तूप) देहातें बळ (देतें, तेंवि) वात्सल्य (प्रेम) प्रभुतें यश देतें. १४. अन्वयार्थः—सवती पोटीं गर्भ जाणोनि (=आपण गरोदर आहों हें मनांत आणून) द्वेषें कलहा न करोत, [म्हणून] त्वां नृपदारहि अभिषेकावे; [म्हणजे अ-भिषिक्त राण्यांचा व त्यांच्या संततीचाच गादीवर वारसा राहून, त्यांच्या सपत्नींची मुसमूस मो-डेल.] मग लहान अर्भक (=अज्ञान राजपुत्र असतील ते) कां न? (=कां न अभिषेकावे?) १५. मृत राजांच्या बायका. १६. थोडक्यांत, सारांश. अन्वयः—पांचहि जा; कन्या राज्यपदीं बैसवूनि या [परत या]. १७. मृत राजांच्या मुली. १८. केलेलें. अघ+शोक+हानि=पाप व दुःख यांचा नाश. अन्वयः—हो! प्रजांचें केलें (=केलेलें) बहु रंजन अघशोकहानि (=[राजाच्या] पापाचा व शोकाचा नाश) करितें. १९. निः+अंजन=नाहीं पाप ज्यास असा, अर्थात् पापरहित. २०. अन्वयः—सर्व उपद्रव वारुनि, [व] हा लोक (=प्रजाजन) सुखी करुनि, [तूं] निरंजन (=अघशोकविहीन) हो.

धर्म म्हणे, 'मज तुमचा आदेश, जसा हेया कळावा, हो. ।
संपूर्ण राजधर्म स्वामी! 'करुणालया! कळावा हो!' ॥ ५७

पोहुनि देवर्षिकडे व्यास म्हणे, 'हरुनि भार ताराया ।
क्षितितें क्षम तूं असती, सुपथीं रुचि धरुनि भारता! राया! ॥ ५८

श्रुति विधिजिव्हासिंहासनिं बैसुनि वदलि सारसारा ज्या, ।
त्या पूस राजधर्मा गांगेया सदलिसारसा राजा! ॥ ५९

भीष्में केल्या बहुतचि गुरु भार्गवराम मानवे दास्या ।
या जान्हवीसुतास्या तो, जो साधूंत मान वेदास्या. ॥ ६०

मानिति ज्या अनपत्या धनपत्याखंडलादिलोकेश ।
ज्यां होय, जो अपुत्रिक जन, नाकीं भोजनांत तो केश; ॥ ६१

इच्छामरण असें हें ज्यो दिधलें भगवदंशयश तीतें ।
तो सर्वज्ञ समर्थ च्छेदाया शिष्यसंशयशतातें. ॥ ६२

जों आहे शरतल्पीं धरुनि प्राणेंद्रियप्रकर ओजा ।

---

१. आज्ञा. २. घोड्याला. ३. दवासन, पायबंद. ४. समजावा. ५. अन्वयः—देवर्षिकडे पाहुनि व्यास म्हणे, 'हे भारता [भरतकुलोत्पन्न] राया! सुपथीं रुचि धरुनि [नीतिमार्गाची आवड ठेऊन] भार हरुनि क्षितितें ताराया तूं क्षम [समर्थ] असती. ६. वेद. ७. विधि+जिव्हा+सिंहासनिं=ब्रह्मदेवाची जिव्हा हेंच एक सिंहासन त्यावर (बसुनि), अर्थात् विधिमुखानें. ८. तात्पर्याचें तात्पर्य अशा, उत्तमोत्तम अशा. ९. सत्+अलि+सारस=साधुरूप भ्रमरांच्या कमळा. हें 'गांगेया' याचें विशेषण. अन्वयः—श्रुति विधिजिव्हासिंहासनिं बैसुनि ज्या सारसारा (उत्तम राजधर्मा) वदली त्या राजधर्मा, हे राजा! सदलिसारसा गांगेया (भीष्माचार्यांप्रत) पूस. १०. अन्वयः—भीष्में केल्या (केलेल्या) दास्या गुरु भार्गवराम बहुतचि मानवे. भार्गवराम दास्या मानवे=भार्गवरामाला दास्य पसंत पडलें. दास्यानें भार्गव संतुष्ट झाला. [पहा शांति० अ० ६ गी० ३१] साधूंत, जो मान वेदास्या [वेदाच्या मुखाला म्हणजे श्रुतीला] तो (मान) या जान्हवीसुतास्या (=भीष्माचार्यांच्या शब्दास. अर्थात् भीष्माचार्यांचा शब्द श्रुतितुल्य होय—असा भाव. ११. अन्वयः—ज्यां नाकीं जो अपुत्रिक जन तो भोजनांत केश होय [ते] धनपत्याखंडलादिलोकेश (धनपति+आखंडल+आदि+लोक+ईश=कुबेर व इंद्रादि लोकपाल) [ही] ज्या अनपत्या (निपुत्रिक भीष्माचार्यांस) मानिति. १२. ज्या भीष्मास. १३. भगवत्+अंश+यश=परमात्म्याच्या अंशाची कीर्ति आहे ज्यांत असें. हें 'इच्छामरण' याचें विशेषण. अर्थात् परमात्म्यावांचून ही इच्छामरणशक्ति इतरांस नाहीं—असा भाव. १४. शंतनूनें. १५. भीष्म. १६. शिष्यांच्या अनेक संशयांस. १७. बाणासनीं, शरपंजरीं. १८. प्राण+इंद्रिय+प्रकर=प्राणेंद्रियांचा समूह, पंचप्राण. १९. भीष्माचार्य.

तों वा! चातक तूं, त्या स्तनयित्नुपुढें[1] हितार्थ कर[2] 'आ' जा.' ॥ ६३
धर्म म्हणे, 'ज्ञाति वधुनि, अपराध करूनि सर्वजनघातें, ।
सरळपणें रण करितां कपटें[3] पाडूनि त्याहि अनघातें[4], ॥ ६४
धर्म पुसाया सर्वक्षत्रघ्न कृतघ्न हा कसा जावा? ।
छात्र[5] कुपात्र सुपात्रा, तरि हंसा कां न काक साजावा?' ॥ ६५
श्रीकृष्ण म्हणे, 'धर्मा! ऐक गुरु **व्यास** वीतकुत्स[6] वदे; ।
या ब्राह्मणांसि आम्हां सुहृदांसि. पदीं[7] बसोनि उत्सव[8] दे. ॥ ६६
सिंहासनीं प्रजांच्या[9] तूं आजि हितार्थ **रामसा** चढ गा! ।
कर[10] म्हणतों मेघांच्या श्रितचातकपक्षिकाम साच ढगा! ॥ ६७
सुखवाया भ्रात्यांला, **कृष्णेला**, आइला, मलाहि वसें. ।
'करितो[11] भजज्जनहृदय चंदनसा झिजुनियां भला हिवसें.' ॥ ६८
या वचनें साधूंच्या रोमांचासहचि तो उटे **धर्म** ।
कर्म श्रुतिविहित करुनि. लोकाला द्यावया यशें शर्म[12]. ॥ ६९

## अध्याय पांचवा.

नमुनि मुनींद्रासि[13] म्हणे, 'मजवरि करुणापयोद[14] हो! वोळा[15].' ।
बैसे कनकरथीं ज्या शुभलक्षण[16] अश्व लाविले सोळा. ॥ १
सारथि होय **वृकोदर**, ढाळिति **माद्रेय**[17] चामरें दोघे, ।
**नारायणसख**[18] **नर**[19] जो, धरुनि शिरीं छत्र शुद्ध यश तो घे. ॥ २

---

१. मेघापुढें. २. आ कर, तोंड पसर; अर्थात् त्यास विचार. चातकपक्षी मेघांबुकरितां नेहमीं आ पसरून असतो हा कविसंकेत सर्वप्रसिद्ध आहे. ३. शिखंडीस पुढें करून भीष्माचार्यांशीं युद्ध केलें त्या समयास अनुसरून हें आहे. ४. निष्पाप अशा भीष्माचार्यांतें. ५. अन्वयः–(जरी) सुपात्रा (गुरुला) कुपात्र छात्र (शिष्य) साजावा, तरि हंसा काक कां न साजावा? ६. निंदारहित. ७. राज्यपदीं. ८. आनंद. ९. याचा संबंध 'हितार्थ'कडे. १०. मेघांच्या ढगा! श्रितचातकपक्षिकाम (तुझ्या आसऱ्यानें राहणारे बंधु वगैरे हेच कोणी चातकपक्षी त्यांची इच्छा) साच (सत्य, सफळ) कर. ११. अन्वयः–भला (सुजन) चंदनसा झिजुनियां भजज्जनहृदय (भजणाऱ्या लोकांचें हृदय) हिवसें (थंड) करितो. १२. सुख. १३. श्रीमद्व्यासास. १४. दयामेघ हो! १५. वळा. १६. ज्यांच्या शरीरावर उत्तम लक्षणें (चिन्हें) आहेत असे. 'अश्वपरीक्षे'त विवक्षित ठिकाणीं भोंवरा, लहान कान इ० लक्षणें लिहिलीं आहेत. 'वृषभ जुंपिले सोळा' असा अन्य पाठ. १७. नकुल व सहदेव. १८. नारायणाचा सखा. हा प्रयोग संस्कृताप्रमाणें केला आहे. १९. अर्जुन. अन्वयः–नारायणसख जो नर तो शिरीं (धर्मराजावर) छत्र धरुनि शुद्ध यश घे. या ठिकाणीं ज्येष्ठबंधूचा मान कनिष्ठानें राखल्यानें उज्ज्वल कीर्तीचा लाभ होतो हें सांगितलें आहे. भारतीय

बसवुनि वरनरयानीं गांधारीसह पिता पुढें केला; ।  
वाजत, गाजत, लाजत, साजत रौजतरणी पुरा गेला. ॥ ३  
धर्मामागें चाले सुरथीं बैसुनि युयुत्सु नरवरसा, ।  
[6]तेव्हां कांपे, साहे जयवाद्यांचा परंतु न रव रसा. ॥ ४  
भगवान् युयुत्सुमागुनि सात्यकिसह बसुनि निजरथीं चाले. ।  
न्हाले प्रेमाश्रुजळें साधु प्रभुच्या दयामृतें धाले. ॥ ५  
कुंतीकृष्णादि स्त्रीजन यानीं बैसवुनि तयांसि, कैवी ।  
आपण मागें चाले, धर्म नय करूनि जो दया सिकवी. ॥ ६  
प्राणगण तनूंत, तसा शिरतां स्वपुरींत धर्म,[9] पौर वदे, ।  
'[11]पौरवदेवासि सदा जगदीशा! यापरीच गौरव[12] दे. ॥ ७  
सोडविलि, रा[13]क्षसक्षयहेतु करुनि आजि, भौज [15]सीतापें ।  
ती तसि तूं, परि धर्मे निववविलिस, न आजि भाजसी तापें.' ॥ ८  
स्वर्गी गोचर झाला देवांच्या धर्मबंदिरव राजा, ।  
[17]तें तें गमे खचेल, व्यापी स्त्रीवृंद मंदिरवरा ज्या. ॥ ९

---

युद्धांत स्वपराक्रमानें ज्यानें सर्वास थक्क केलें व जो प्रत्यक्ष श्रीकृष्ण परमात्म्याचा स्नेही, अशा अर्जुनानें छत्र धरिलें हें सांगून पंतांनी अर्जुनाच्या आंगची शालीनता व त्यायोगें प्राप्त होणारें कीर्तिफल ह्या गीतींत वर्णिलें आहे.

१. उत्कृष्ट पालखींत. २. धृतराष्ट्र. ३. अग्रभागीं चालविला. ४. राजसूर्य, राजश्रेष्ठ, धर्म. ५. धृतराष्ट्राचा दासीपुत्र. ६. अन्वयः–तेव्हां रसा (पृथ्वी) कांपे, परंतु जयवाद्यांचा रव न साहे. ७. साधु प्रेमाश्रुजळें न्हाले, व प्रभुच्या दयामृतें धाले (संतुष्ट झाले). ८. कृष्णा=द्रौपदी. ९. विदुर. १०. पुरवासी लोक. ११. पुरुकुलोत्पन्नराजास, धर्मराजास. १२. मोठेपणा, प्रतिष्ठा. १३. राक्षसांचा नाश हेंच कारण आहे ज्यांत असें. हें 'आजि'(=युद्ध) ह्याचें विशेषण. १४. भार्या. १५. सीता+प=सीतापतिनें. अन्वयः–राक्षस-क्षय-हेतु आजि करुनि सीतापें ती भार्या तसि तूं सोडविली; परि धर्मे निववविलिस; आजि तापें न भाजसी. ह्या गीतींत पंतांनी 'तसि' पद घालून रामचंद्रांनी सीतेचा त्याग केल्याचें सुचविलें आहे; म्हणजे अर्थात् त्या सोडविण्याचा कांहीं उपयोग नाहीं. परंतु धर्मराजानें धर्मरक्षण करून स्वभार्येचें सांत्वन केलें व रामचंद्रास क्षेपर्यी असें वियोगजन्य दुःख झालें, तसें दुःख धर्मास झालें नाहीं व कोणत्याही प्रकारची त्यास हळहळ राहिली नाहीं–असा भाव. १६. स्वर्गी देवांचा राजा (इंद्राला) धर्मबंदिरव गोचर झाला (ऐकूं गेला). धर्म+बंदि+रव=धर्मराजाच्या चारणवर्गाचा (स्तुतिपाठकांचा) ध्वनि. १७. अन्वयः–ज्या मंदिरवरा (उत्तम इमारती, महाल) स्त्रीवृंद (स्त्रीसमुदाय) व्यापी तें तें खचेल गमे. ठिकठिकाणच्या इमारतींत ही समारंभाची शोभा पाहण्यासाठीं बायकांची इतकी कांहीं गर्दी उसळली, कीं

ये[1] बहु शोभा अंतःशून्यत्वासहि धरूनि आगारा, ।
स्त्रीदृष्टिचातकी त्या गमती गिळिती, करूनि आ, गारा. ॥ १०
'तुज[2] पाहूनि विकसली कुरुराज्यश्री तुझीच आलि, सये ! ।
दुर्गासी दुष्ट दमुनि, जोडुनि सत्कीर्ति, देवि ! आलिस, ये. ॥ ११
तव दृक् खलायुला[3] हरि[4], दीपाची वर्तिका[5] जसी तेला; ।
सति ! सुकर तुला जैसें सुरमानसवर्तिकाज[6] सीतेला[7]. ॥ १२
त्वत्क्षोभें मेलें हें खळबळ; दुःसह असें न गर[8] मेहिला[9]'. ।
बहु मोहिनीसें[10] तैसें कृष्णेला वर्णिती नगरमहिला[11]. ॥ १३
झांकिति पुष्पप्रकरें[12] लाजप्रकराधिकें[13] कनकरचितें, ।
जें औदार्य घनाचें, दाविति पुरकन्यकाजनकर[14]चि तें. ॥ १४

---

त्या इमारती आतां कोसळतात कीं काय असें वाटलें—असा भाव. समारंभ पाहण्यासाठीं पुरुषांची दाटी रस्त्यांत व बायकांची रस्त्याच्या बाजूंच्या इमारतींत होते हा नेहमींचाच अनुभव आहे.

१. अंतःशून्यत्वासहि (आंत कांहीं नसणें ही स्थिति तिला) धरूनि आगारा (गृहाला) बहु शोभा ये. त्या स्त्रीदृष्टि(रूप) चातकी आ करूनि गारा गिळिती [अशा] गमती (भासती). धर्मराजांच्या स्वारीचा थाट पहाण्याकरितां स्त्रीजन अंतर्गृहांतून बाहेर आल्यामुळें एका बाजूनें पाहिलें तर गृहें शून्यत्वामुळें भयाण असावीं, परंतु, स्त्रीजनानें त्या गृहांचीं बाह्यांगें सुशोभित झाल्यामुळें तीं फार खुलून दिसलीं—असा भाव. उत्तरार्धांतील रूपकावरून स्त्रीवर्गाचें पाहण्याचें औत्सुक्य किती होतें तें व्यक्त होतें. २. अन्वयः—सये ! तुज पाहूनि तुझीच आलि (सखी) कुरुराज्यश्री विकसली (प्रफुल्लित झाली); दुर्गासी (दुर्गादेवीप्रमाणें) दुष्ट दमुनि सत्कीर्ति जोडुनि (संपादन करून) आलिस; ये. ३. खल+आयुला=दुष्टांच्या आयुष्यास. ४. हरण करिती झाली. ५. वात. ६. सुर+मानस+वर्ति+काज=देवांच्या मनांत असणारें कार्य. ७. तीव्र. ८. विष. ९. पृथ्वीला. अन्वयः—असें दुःसह गर महिला न. दुष्ट लोक पृथ्वी पादाक्रान्त करितात व खुशाल तिचा उपभोग घेतात, परंतु, तुजकडे वांकड्या नजरेनें पाहण्याबरोबर तुला आलेल्या कोपास त्यांचे बळी पडले, ह्यावरून, तुझ्या क्रोधाच्या अंगीं असणाऱ्या तीव्र विषाप्रमाणें विष धरित्रीमध्यें नाहीं—असा भाव. १०. विष्णूनें मोहिनीरूप घेऊन दुष्ट राक्षसांचा नाश केला तेव्हां देवांनीं विष्णूची फार स्तुति केली, हें प्रसिद्ध आहे; व ही उपमा देऊन द्रौपदीस येथें प्रत्यक्ष परमेश्वर बनविलें आहे. ११. नगरांतील स्त्रिया. १२. पुष्पांच्या समुदायानें. १३. लाह्यांच्या समुदायाहून जास्त अशानें. हें व 'कनकरचितें' (=सुवर्णमय) हीं दोन हीं 'पुष्पप्रकरें' ह्या पदाचीं विशेषणें होत. ही फुलें उधळण्याची चाल फार प्राचीन आहे. रघुवंश—सर्ग ७ पहा. ह्याच गीतीच्या उत्तरार्धांत आलेल्या 'औदार्य'शब्दावरूनही कनकपुष्पांचें प्राचुर्य व्यक्त होतें. तसेंच 'कर (हात, पक्षीं सोंड) ह्या शब्दांतील श्लेष खुबीचा व कविसंकेतदर्शक आहे. १४. नागरिक कन्यकांचे हात.

शोभा नहुषभ्रंशीं येतां पाहुनि पतीस जी नाकीं ।
तीच कुरुपुरीं; स्वामीविण बहु आत्मा सती सजीना कीं. ॥ १५
धर्मे कुरुपुर पावे, बहु अर्के जेंवि तोखे राजीव; ।
करितां प्रवेश, वाटे तें नृप गृह देह, तो खरा जीव. ॥ १६
राजगृहीं देवांसह नमुनि पुरोहितमनांत तोख रची, ।
पुण्याहवाचनीं बहु धनगोधन धर्मराज तो खरची. ॥ १७
म्हणतां मंत्र गमे नृप, सेवी समजोनि सुरस मा ज्याला, ।
श्रीरामसा बहुमत प्रभु झाला भूमिसुरसमाजाला. ॥ १८
ऐकत होते सुरतीं, नुघडुनि सुरजन कवाड, वाद्यातें. ।
धर्म म्हणे, 'जो जितुकें घेइल मणिकनक, वांडवां द्या तें.' ॥ १९
चार्वाक सुयोधनसख राक्षस, विषदुष्टरस जसा ईक्षू, ।
त्या ब्राह्मणांत होता होउनि कपटें त्रिदंडधर भिक्षू. ॥ २०
तो दुष्ट तशा उत्सवसमयीं गर्जुनि म्हणे, 'अरे धर्मा! ।
तुज मन्मुखें वदति हे विप्र सकळ, उचित जें तुझ्या कर्मा. ॥ २१
धिक्कार असो कुनृपा! ज्ञातिगुरुघ्ना! तुतें वृथा व्याली; ।
मरण श्रेय. न जीवित तुज पापा. व्याल तूं. पृथा व्याली.' ॥ २२

१. नहुष राजा इंद्रपदापासून भ्रष्ट झाला ते वेळीं. २. स्वर्गी. अन्वयः–नहुषभ्रंशीं पतीस (इंद्रास) येता पाहुनि जी बहु शोभा स्वर्गी (असे) तीच कुरुपुरीं (असे); कीं (=कारण) सती स्वामीविण (पतिवांचून) आत्मा सजीना (सजवीत नसते). ह्या गीतींत 'सजणें' ह्या शब्दाची सकर्मक योजना केली आहे. 'सजणें'=सजविणें, सिद्ध करणें, दागदागिन्यानें खुलविणें, प्रफुल्लित करणें. पतिवियोगस्थितींत खरोखर साध्वी स्त्री आपल्या देहाला नटवीत नाहीं. हें सुभाषित आहे. ३. संतोष. ४. सूर्यविकासी कमल. ५. अन्वयः–नृप प्रवेश करितां तें गृह देह वाटे (व) तो (धर्मराज) खरा (वस्तुतः) जीव वाटे. जीवावांचून जसा देह व्यर्थ, त्याप्रमाणें धर्मराजावांचून कुरुपुरमंदिर व्यर्थ होतें–असा भाव. उपमा चटकदार आहे. ६. अन्वयः–ज्याला मा (लक्ष्मी) सुरस समजोनि सेवी [त्या विष्णूप्रमाणें] नृप (धर्म) मंत्र म्हणतां गमे; [तो] प्रभु भूमिसुरसमाजाला (ब्राह्मणसमुदायास) श्रीरामसा बहुमत झाला. ७. शृंगारचेष्टेंत गुंतलें असतां–असा भाव. ८. न+उघडुनि=न उघडतां. ९. कवाड=(शयनमंदिराचें) दार. १०. ब्राह्मणांस. ११. दुर्योधनाचा मित्र. (पहा अ० ५ गी० २). १२. विषानें घातक झाला आहे रस ज्यांतील असा. १३. ऊंस. १४. तीन दंड धारण करणारा. संन्यासी तीन दंड एकत्र करून हातीं घेतात, व तेणेंकरून वाग्दंड, मनोदंड व कायदंड असें व्रत घेतलें आहे असें सूचित होतें. १५. माझ्या तोंडानें. १६. प्रसवली. १७. सर्प. १८. सर्पीण.

तें निष्ठुर वच परिसुनि, लागे चरकाचि काळिजा भाला; ।
व्रीडित परमोद्विग्न ब्राह्मणसमुदाय रायही झाला. ॥ २३
जरिहि सदीडित पीडित झाला त्या आयकोनि धिक्कारा, ।
जावें ब्रह्मांड गमे भेदुनि त्या, होय सर्व दिक् कारा. ॥ २४
क्षणभर उगेचि राहुनि धर्म म्हणे, 'मायबाप हो! पावा; ।
नमितों पदर पसरितों मज दासास प्रसाद ओपावा. ॥ २५
भावांच्या इतरांही जीवांच्या सर्वदुःखपरिहारा ।
हा 'राज्य करिन' म्हणतो, न वहाया मुकुटकटकमणिहारा. ॥ २६
जो किंकर पायांला स्वशिर करुनि पादपीठ आतळतो ।
न करावा धिक्कारुनि प्रभुंनीं पाण्यापरीस पातळ तो.' ॥ २७
ब्राह्मण वदले, 'पुण्यश्लोका! हें आमुचें नव्हे उक्त. ।
युक्त श्रीशीं हो तूं राघवसा जन करावया मुक्त.' ॥ २८
ऐसें बोलुनि सुमुनि ध्यानीं जाणोनियां तया पापा, ।
सांगति, 'दुर्योधनसख राक्षस चार्वाक होय हा, बापा! ॥ २९
निंदूं कसें? हरि! हरि! श्रुतिपरि तव कीर्ति शिकतसों गाया, ।
'जीवितधन देउनि हा आला घेऊनि विकत सोंगा या.' ॥ ३०
राजाचा खेद हरुनि तो विप्रांहींच राक्षस खपविला, ।
आटोपता न धर्मोदयसंजातज्वराक्षसख पविला. ॥ ३१
चार्वाकातें केला त्या मुनिंनीं, जेंवि दंड वेनातें; ।
ऐसें तेज कवण, जें ब्राह्मणतेजास दंडवेना, तें? ॥ ३२
केशव म्हणे, 'कृतयुगीं बदरींत बहु स्वसाधना जपला, ।
न पलाशन हा श्रमला, बहुवर्षें उग्र तप नृपा! तपला. ॥ ३३
धात्यासि सर्वभूताभयवर वंदूनि पाप हा याचा, ।

१. लज्जायुक्त. २. अत्यंत खट्टु. ३. राजा, धर्म. ४. सत्+ईडित=साधूंनीं स्तविलेला. ५. बंदिशाळा. ६. बावा. ७. पाय ठेवण्याचें आसन. ८. स्पर्श करितो. ९. शब्द. १०. शिव शिव! ११. वेदाप्रमाणें. १२. जिवावर उदक सोडून हा ब्राह्मणाचें सोंग घेऊन आला आहे. १३. मारला. १४. आवरला नसता. १५. धर्म+उदय+संजात+ज्वर+अक्ष+सख=धर्मराजाच्या ऐश्वर्यानें ज्याच्या नेत्रांस दुःख झालें त्या दुर्योधनाचा मित्र (चार्वाक). १६. वध्राला. १७. वेनराजास. हा राजा अतिदुष्ट होता, त्यास ब्राह्मणांनीं मारिलें. १८. बदरिकाश्रमामध्यें. १९. मांसभक्षक राक्षस. २०. सर्व+भूत+अभय+वर=सर्व प्राण्यांपासून अभय असावें, अर्थात् कोणाचीही भीति नसावी असा वर (प्रसाद).

याची इच्छा समजे ब्रह्मा लोकक्षया पहायाची. ॥ ३४
दिधला वर, अवमानित विप्र निराळे करूनि, वैरदानें. ।
मग जग पीडूं लागे राक्षस, होऊनि मत्त वैरदानें. ॥ ३५
व्रीडित पीडित होउनि, गेले नेऊनि देव कागाळी; ।
वदले, 'दव जेंवि तृणा, राक्षस न तुझ्याहि सेवका गौळी.' ॥ ३६
द्रुहिण म्हणे, 'द्वापर युग ये तोंवरि देव हो! सहा ताप. ।
हा होइल कुरुवंशज दुर्योधननृपतिचा सखा पाप. ॥ ३७
तेव्हांचि मरेल, करुनि तत्स्नेहें द्विजसभावमानातें. ।
जें द्विजतेज, समस्तां तेजांत गुरुप्रभाव माना तें. ॥ ३८
तो हा राक्षस वधिला; भेटेल सखा सुयोधना सत्य, ।
झाला अघरोगाला सर्वसमरहतसुयोध नासत्य. ॥ ३९
धर्मा! राज्य कर अशा या विप्रांचें संभाजन कराया; ।
संसारीं धन्य करिल तुज हे,[11] जसि मुनिसभा जनकराया.' ॥ ४०
या गुरुवरोपदेशें कुंतीसुत शोक दैन्य[12] सोडून, ।

---

१. तुच्छ केलेले ब्राह्मण खेरीज करून, अर्थात् ब्राह्मणांचा अवमान केल्यास त्यांपासून तुझा नाश होईल अशा शर्तीवर–असा भाव. २. वर देणाऱ्यानें, ब्रह्मदेवानें. ३. वराच्या देणगीच्या जोरावर. ४. गाऱ्हाणें. ५. गवळी. दव=वणवा. ६. ब्रह्मदेव. ७. सहन करा. ८. अन्वयः–जें द्विजतेज तें समस्तां तेजांत गुरुप्रभाव (अधिक प्रभावाचें) माना. ९. अन्वयः–तो हा राक्षस वधिला; (हा) सखा सुयोधना सत्य भेटेल. (कारण) सर्वसमरहतसुयोध (सर्व+समर+हत+सुयोध=समरांगणीं मृत झाले आहेत सर्व वीर ज्याचे असा दुर्योधन) अघरोगाला (चार्वाकाच्या पापरूपरोगास–पहा गी० ३५.) नासत्य (अश्विनीकुमार) झाला. भावार्थः–समरांगणीं मृत झालेल्यास स्वर्गप्राप्ति होते; चार्वाक राक्षस मेल्यावेळीं युद्धप्रसंग नव्हता व ती समरभूही नव्हती, तेव्हां त्यास स्वर्गप्राप्ति होणें नाहीं. इतकें असूनही तो 'सुयोधनास सत्य भेटेल' असें म्हटलें आहे तेव्हां तो स्वर्गी जाणारच, व ह्याचें कारण त्यास ब्राह्मणांच्या हातीं मरण आलें हें होय. आतां असें होण्यास कारण दुर्योधन; कां कीं, आपल्या मित्राच्या म्हणजे दुर्योधनाच्या शत्रूचा (धर्मराजाचा, पांडवांचा) सूड घेण्याच्या बुद्धीनें सभेंत जाऊन, धर्मराजास तो दुरुत्तरें बोलला व त्यामुळें ब्राह्मणांचा अवमान होऊन त्यांनीं त्यास मारिलें. व ह्या ब्रह्मवृंदाच्या हातून मरण आल्यामुळें, पूर्वी जग पीडिल्यानें त्यास जो पापरूपी रोग जडला होता त्यांतून तो मुक्त झाला; म्हणजे अर्थात् दुर्योधनरूप अश्विनीकुमार भेटतांच तो ह्या पापरूप रोगापासून मुक्त झाला. त्यासही स्वर्गप्राप्ति झाली–असा भाव. १०. पूजन. ११. ही मुनिसभा. हा प्रयोग अद्यापीहि पत्रलेखनांत येतो. उदाहरणः–'हे विनंति.' १२. त्यजिता.

प्राङ्मुख[1] कांचनपीठीं[2] बैसे विप्रांसि हात जोडून. ॥ ४१
तदभिमुख[3] सुमणिकांचनपीठीं[4] श्रीकृष्णसात्यकी बसले; ।
भीमार्जुन नृपमध्यें घालुनि कनकासनीं समुल्लसले[5]. ॥ ४२
सहदेवनकुळ घेउनि दांनीं[6] सिंहासनीं पृथा बसली, ।
जसि काय देवहूती[7] योगयुगयुता[8] नदाश्रमीं वसली. ॥ ४३
रत्नासनीं बसे धृतराष्ट्र क्षितिपति, तयासमीप सती ।
देवी गांधारसुता झाली मणिमयशुभासनीं बसती. ॥ ४४
बसला युयुत्सु कांचनपीठीं सविनय समीप जनकाच्या[9]; ।
संजयहि आसनावरि बसला होता विशुद्धकनकाच्या. ॥ ४५
धर्मार्थकाममोक्षोपायीं म्हणणार विनवितां 'ओ' ते ।
कविजीवसे[10] सुधर्मा[11] धौम्यें[12] पुरोहित वरासनीं होते. ॥ ४६
अभिषेकाचें आल्या घेउनि साहित्य सर्वही प्रकृती[13], ।
पूर्वांग[14] भगवदुक्तें करिती धौम्यादि सर्व विप्र कृती. ॥ ४७
व्याघ्राजिन वेदीवरि, अंथुरिला पट तयाउपरि धवळ; ।
धौम्यें धर्म बसविला त्याच्या द्रुपदात्मजा सती जवळ. ॥ ४८
केला होम यथाविधि, तृषितज्वलनासि[15] पाजिलें प्राज्य[16] ।
आज्य सुखें यजमानें, बहु निष्कंटक[17] करावया राज्य. ॥ ४९
मग सांठविलें आहे ज्याच्या निःशेष विश्व हें उदरें, ।
कृष्णेसह धर्मातें अभिषेकी देवदेव तो सुदरें[18]. ॥ ५०

---

१. प्राक्+मुख=पूर्वेकडे मुख करून. २. सुवर्णासनावर. ३. तत्+अभिमुख—त्या धर्मराजासमोर. ४. उत्कृष्ट अशा रत्नखचित सुवर्णासनावर. ५. शोभते झाले. ६. हस्तिदंताच्या. ७. कपिलमहामुनींची माता. हिला कपिलांनींच आत्मज्ञानाचा उपदेश दिला दिला. ८. योग=सांख्यदर्शनान्तर्गत योगमार्ग. युग=कालस्वरूप. ह्या दोनही गोष्टी प्राप्त झाल्या आहेत जिला ती=योग–युग–युता. हा उपदेश प्राप्त होण्यापूर्वी देवहूती हिनें अनेक उपभोगांचा अनुभव पतिसहवासांत घेतला होता. पण ह्या उपदेशानें पूर्ण वैराग्य बाणतांच ती आश्रमीच राहिली व तपश्चरणांत तिनें दिवस घालविले; शेवटीं शरीरांतील सप्तधातुरूपी मल नाहींसे झाले आणि तिचें शरीर नदीरूप झालें. ज्या ठिकाणीं देवहूतीला योगसिद्धि प्राप्त झाली तें स्थल हल्लीं सिद्धपुर क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. ९. धृतराष्ट्राच्या. १०. शुक्रबृहस्पतींप्रमाणें. ११. दुर्योधनाचा पुरोहित. १२. पांडवांचा पुरोहित. १३. प्रजा. १४. राज्यारोहणाचें पूर्वकर्म. १५. तृषायुक्त अग्नीला. १६. पुष्कळ. १७. नाहीं (शत्रुरूपी) कांटा ज्यांत असें. १८. सु+दरें=उत्तम शंखानें.

धृतराष्ट्रहि अभिषेक स्वकरें धर्मा दरें[1]करूनि करी, ।
निजमस्तकीं शमाया संताप जसा करें[2]करूनि करी. ॥ ५१
अभिषेचुनि वृद्ध म्हणे, 'दिधलें तुज सर्व राज्य पुत्रा! म्या. ।
जैसें पूर्वीं कश्यपमुनिनें अभिषेक करुनि सुत्राम्या[3]. ॥ ५२
सर्व प्रकृतिहि धर्मा त्याचि कनकभूषिनें दरें वर्षे[4], ।
रामाभिषेकसमयीं जेंवि तसिच त्या महोत्सवीं हर्षे. ॥ ५३
नच वदवे, जें मिळतें जगदीश्वरकृष्णदर्शनीं यश, तें; ।
मग तदभिषिक्त[5] धर्म न होइल कां वर्ण्य[6] दर्शनीय शतें? ॥ ५४
शिशुच्या[7] स्पर्शोनि म्हणे जो 'तव साम्या नयो गया' गाला, ।
दे, देववे सुपदफळ जें कोणाही न योगयागाला; ॥ ५५
त्या पांचजन्यशंखें केला अभिषेक ज्या महाभागा ।
तत्तेज[8] किति वदावें? रविहि म्हणे कविसि, 'हे महाभा गा.' ॥ ५६
धर्म पदीं बैसवितां श्रीमत्कृष्णें अशेषदेवाद्यें[9]. ।
बहु वाजविलीं दुंदुभिवीणापणवानकादि जयवाद्यें. ॥ ५७
दिधलीं युधिष्ठिरानें त्या विप्रांला असंख्य धनदानें, ।
वाटे, वांटाया निधि[10][11] दिधले नवही तयासि धनदानें[12]. ॥ ५८
हृष्ट ब्राह्मण वदले, 'त्वां व्रत हें घेतलें न नव संतें, ।
पूर्वी तसें पुढेंही सुखवावें जग, जसें वन वसंतें. ॥ ५९
[13]तूं पावलासि, होमुनि बहु युद्धमखीं पर, स्वधर्मातें, ।
जें क्षत्रियें मिळविलें रण करुनि नव्हे परस्व धर्मा! तें. ॥ ६०
या प्रळयांतुनि सानुज सुटलासि नसे दुजा असा सुकृती[14]; ।

---

१. सोहळें. २. हस्ती. ३. इंद्रास. ४. अभिषेक करी. त्याचें कर्म 'धर्मा'. ५. तत्+अभिषिक्त=त्या कृष्णानें अभिषेक केला आहे ज्याला असा. ६. वर्णन करण्यास योग्य. ७. शिशुच्या (मूल जो ध्रुव त्याच्या) गाला स्पर्शोनि जो (विष्णूचा पांचजन्य शंख) तव साम्या गया न यो (तूं गयेपेक्षां श्रेष्ठ हो) म्हणे [आणि] जें सुपदफल (ध्रुवपदरूप फल) कोणाही योगयागाला न देववे [तें फल जो] दे, त्या पांचजन्य शंखें ज्या महाभागा (धर्माला) अभिषेक केला, तत्तेज किति वदावें!—असा अन्वय. ध्रुवाचा मोह पांचजन्यस्पर्शानें श्रीविष्णूनें नष्ट केल्याची कथा प्रसिद्ध आहे. ८. मोठें तेज. ९. अशेष+देव+आद्य=सर्व देवांचा आदि (मूळभूत) अशा कृष्णानें. १०. द्रव्याचे ठेवे. ११. महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील व खर्व हे नऊही निधि. १२. कुबेरानें. १३. अन्वयः—युद्धमखीं (समरयागांत) बहु पर (शत्रु) होमुनि, तूं स्वधर्मातें पावलासि; धर्मा! क्षत्रियें जें रण करुनि मेळविलें तें परस्व (परद्रव्य) नव्हे. १४. धन्य.

ज्यांत भीष्मादिही खचला झाले द्रोणादिही असासु कृती. ॥ ६१

विप्रांतें प्रकृतींतें धर्म म्हणे, 'धन्य धन्य मी आजी ।

[3]गुण घेतां जरि, आख्यारीति असी बहु बिलक्षणा माजी. ॥ ६२

झालां प्रसन्न सर्वहि जरि, तरि मजवरि करा प्रसाद असा, ।

होती जी धृतराष्ट्रीं त्या वृत्तीतेंचि वाढवीत असा. ॥ ६३

ज्येष्ठपिता परदैवत पूजावें करुनि यत्न हें माजें ।

याचें प्रियचि करावें अर्पुनि होईल रत्नहेमा जें. ॥ ६४

याचें प्रिय शासन तें माझें, याहूनि अन्य मी नाहीं ।

न्हदवृद्धिनेंचि व्हावें तद्भजन करूनि धन्य मीनांहीं. ॥ ६५

करुनि ज्ञातिवध असा म्यां न वहावाचि काय; परि सांचें ।

यांचें शुश्रूषण मज हित, लोहा जेंवि काय परिसाचें. ॥ ६६

सत्ता वाटे गेली रायास, तशीच वाटवा होती. ।

[13]राजपुरजनपदजन हो! '[14]जी पहिली धडक वाट, वाहो ती. ॥ ६७

किंकर पांचहि आम्ही, राजा धृतराष्ट्र, हे धरा याची; ।

'[15]कथिली वेदाज्ञासी राजाज्ञा हे मनीं धरायाची.' ॥ ६८

सांगुनि सर्वांसि असें, त्या नीतिप्रीतिमतिसुधानिधिनें ।

भीमासि यौवराज्य प्राज्यमहोत्सवें दिलें विधिनें. ॥ ६९

सर्वज्ञा, सकळसुकवितिलका, [18]प्रबळाहिताद्रिच्या भिदुरा, ।

---

१. भीष्माचार्य. २. गतप्राण. ३. अन्वयः—जरि गुण घेतां, तरी ही माजी (माझी) आख्यारीति (कीर्तीचा प्रकार) बहु विलक्षणा. ४. रहा. ५. मोठें दैवत. ६. पूज्य मानावें. अन्वयः—ज्येष्ठपिता हें माजें परदैवत (तुम्ही) यत्न करुनि पुजावें, (व) रत्नहेमा अर्पुनि जें होईल तें याचें प्रियचि करावें. ७. आज्ञा. ८. सरोवराचा आश्रय करून. ही उपमा फार सरस आहे. ९. देह. १०. खरोखर. ११. अन्वयः—याचें शुश्रूषण (सेवा) मज हित; जेंवि काय (जसें कांहीं) परिसाचें (शुश्रूषण) लोहा हित. १२. अन्वयः—रायास सत्ता गेली वाटे; (ती) होती तशीच (रायास) वाटवा (भासवा). या पंक्तीचा असाही अर्थ होईल.—गेली (गेलेली) सत्ता रायास (जशी सुखाची व अभिमानाची) वाटे (वाटत असे), तशीच होती (पुढें होणारी सत्ता) वाटवा. दुर्योधनाच्या वेळची व आतां पुढें होणारी माझ्या कारकीर्दीतील सत्ता रायाला सारखीच सुख देणारी होईल असें करा. आपण परावलंबी झालों असें रायाला न वाटेल असें वर्ता. १३. हस्तिनापुरवासी लोक हो! १४. अन्वयः—जी पहिली वाट (सरळ पद्धति) ती (तशीच) धडक (जोरांत) वाहो (चालू राहो). धृतराष्ट्राचेंच मुख्य मान देण्याचा पहिलाच मार्ग असूं द्या—असा भाव. १५. कथिली (कथिलेली) हे (ही) राजाज्ञा वेदाज्ञासी मनीं धरायाची. १६. सर्व शास्त्रांचा अग्रणी, व्यास. १७. प्रबळ + अहित + अद्रिच्या—अत्यंत प्रबळ शत्रुरूप पर्वताच्या. १८. वज्रा.

षाड्गुण्य, मंत्रनिश्चय यांचा अधिकार धर्म दे विदुरा. ॥ ७०
आयव्यय आणि कृताकृत यांच्या चिंतनीं परिज्ञानीं ।
संजय नियोजिला; कीं भ्रमवी श्री, न भ्रमे परि ज्ञानी. ॥ ७१
सैन्याधिकार नकुळा, ज्याच्या बाहूंसि शक्रपुर गातें; ।
त्या परचक्रवधाचा दिधला अधिकार शुभ्रतुरगातें. ॥ ७२
देता झाला देवब्राह्मणकार्याधिकार धौम्यातें, ।
दे अधिकार स्वनिकट सहदेवातें सुसाधुसौम्यातें. ॥ ७३
कीं निधितें यक्षपसा त्यातें करि तोचि सर्वदा जतन, ।
सहदेव वृत्तिमंतचि, जाणों श्रीधर्मराज तो वतन. ॥ ७४
ज्यां ज्यांसि योग्य जें जें, सांगे त्यां त्यांसि धर्म तें कार्य; ।
सांगे युयुत्सुसंजयविदुरातें प्रार्थुनी असें आर्य. ॥ ७५
'नित्य प्रातःकाळीं संध्याकाळीं पुसोनि आर्यातें ।
बहु अप्रमत्त निरलस होऊनि करा प्रभूक्तकार्यातें.' ॥ ७६

## अध्याय सहावा.

धर्म म्हणे, 'श्रीकृष्णा! वारावे त्वांचि ताप दासाचे, ।
त्वच्चरण हेतु देवा! मज पावायासि या पदा साचे. ॥ १
त्वां उद्धरिली अवनी नवनीरदसुंदरा! अगा! धात्या! ।
किति हे कुंतीसंतति! तरली वानरचमू अगाधा त्या. ॥ २
यश, या संसारांतुनि उद्धरुनि पुन्हाहि पांडुसंतति, घे; ।
स्तविति बहु तुजचि नारद, वाल्मीकि, व्यास, मुख्य संत तिघे. ॥ ३

---

१. संधि, विग्रह, यान, आसन, द्वैध आणि आश्रय असे जे सहा गुण यांचा समूह तें. २. सल्लामसलती कायम करणें. ३. जमा. ४. खर्च. ५. कीं (कारण) श्री भ्रमवी परि ज्ञानी न भ्रमे—असा अन्वय. हें सुभाषित आहे. ६. अर्जुनातें. ७. आत्मसंनिध राहण्याचा अधिकार. ही जागा म्हणजे हल्लीं ज्याला इंग्रजींत 'एडिकांग' म्हणतात त्या अधिकाऱ्याची होय. ८. कुबेराप्रमाणें. ९. धर्मातें. १०. सहदेव. ११. वतनदार. १२. धृतराष्ट्राला. १३. अन्वयः—देवा! मज या पदा पावायासि, त्वच्चरण साचे हेतु. तुझ्या पायाच्या प्रसादानेंच मला हा दिवस दिसला—असा भाव. १४. [दुष्टांच्या हातून] सोडविली. १५. नवमेघाप्रमाणें सुंदर. १६. गंभीर. १७. (रामावतारीं) त्या प्रसिद्ध समुद्राला. १८. या पांडूच्या मुलांना समरार्णवांतून असें तूं एकदां उद्धरलेंस, तसें त्यांना आतां पुन्हां संसारार्णवांतून तार व यश संपाद.

त्वां व्हाया निजकिंकरभाषित विश्वांत साच, हाकेला ।
व्यसनीं पावुनि धन्य प्रन्हाद जसा, तसाच हा केला. ॥ ४
असुनिहि, समर्थ नव्हते पद साधुनि द्यावया सखे, दास, ।
जेंवि ध्रुवा, तसें तुजवांचुनि देवा! मला सखेदास. ॥ ५
झालासि सहाय जसा सुगलाहि, बिभीषणाहि असहाया; ।
साधुनि दिल्हा महेंद्रा अमृतरस तसाचि कीर्तिरस हा यो. ॥ ६
सुकविरसज्ञा करिती जी तुझिया नित्य नवनव स्तुतिला, ।
बा! आढळेल तुजविण वर्णाया गोड नव न वस्तु तिला. ॥ ७
शतजन्में नमनाची मी तुज वाहत असेन लाखोली ।
वांटे व्यसन जसें हें मज, नच दावी असें नला खोली.' ॥ ८
भगवान् स्मित करुनि म्हणे, 'साक्षात् तूं धर्म सन्महित राया! ।
गाति कवि तुझें जैसें रामाचें कर्म जन्महि तराया.' ॥ ९
प्रभुनें बहु हर्षविला धर्म, जसा तृषित नवसुधापानें ।
याणेंचि सुयश लुटिलें, जो मैथिल त्याहि न वसुधापानें. ॥ १०
मग नृप बंधूंसि म्हणे, 'मेळविला विजय अनुभवावा हो! ।
चिंतुनि माद्रीकुंतीसुयश, शिरःकमळ दनु भवा वाहो. ॥ ११
श्रमलां बहु मजकरितां, वनवासाज्ञातवासकष्ट महा, ।

---

१. अन्वयः—निज-किंकर-भाषित विश्वांत साच (खरें) व्हाया, [=आपल्या दासांचें वचन या जगांत सत्य व्हावें म्हणून] व्यसनीं (अडचणींच्या किंवा कठिण प्रसंगीं) हाकेला पावून [धांवा करतांच उडी घालून] जसा त्वां प्रन्हाद धन्य (कृतार्थ) केला, तसाच हा (धन्य) केला. २. अन्वयः—सखे (आणि) दास असुनिहि, देवा! जेंवि ध्रुवा तसें सखेदास (दुःखी झालेल्यास) मला, तुजवांचुनि, पद साधुनि द्यावया समर्थ नव्हते. हे देवा! जरी मजला मित्र व दास होते तरी तुझ्यावांचून हा दिवस दाखविण्यास ते समर्थ नव्हते—असा भाव. ध्रुव=उत्तानपादराजाचा मुलगा असूनही ईशदर्शनावांचून त्यास राज्यप्राप्ति झाली नाहीं. ३. सुग्रीवाला सुद्धां. ४. समुद्र मंथन करून अमृत निघालें तें दैत्य घेऊन बसले तेव्हां परमेश्वरानें मोहिनीरूप घेऊन तें देवांस दिलें—ही कथा अनुसंधेय आहे. ५. मला. ६. उत्तम कवींची जिव्हा. ७. अन्वयः—हें व्यसन (संकट) जसें मज खोली (उग्रस्वरूप) दावी, (तसें) नला (नलराजास) नच असें वाटे. नलास कलीपासून त्रास झाला हें प्रसिद्धच आहे. ८. साधूंनीं स्तविलेला, वर्णिलेला. ९. जन्माच्या फेऱ्यांतून मुक्त व्हावें म्हणून. १०. नूतन अमृताच्या प्राशनानें. ११. मिथिल देशाच्या राजानें, जनकानें. १२. दानवमाता. १३. शंकरास. १४. अर्पण करो. माद्री व कुंती ह्या अतिभाग्यवान् असें वाटून व त्यांचे पुत्र दुष्ट दानवांचा नाश करणारे आहेत हें जाणून दानवमाता शंकरास शिर अर्पण करो. १५. मोठा.

कोणासही न म्हणविल यापरि गुरु शनिहि कुजहि अष्टम हा! ॥ १२
बहु भांडले तुम्हासीं शस्त्रास्त्रें धरुनि, करुनि हठ, राजे; ।
ते म्यां काय वदावे अधिकाधिक कष्ट दिवस अठरा जे?' ॥ १३
दुर्योधनदुःशासनदुर्मर्षणदुर्मुखालयें धर्में ।
भीमप्रमुखांसि दिल्हीं भोगाया सुख सुरोचितें शर्में. ॥ १४
बसले त्या त्या बहुधनकनकनगनिभालयांत वासवसे, ।
प्रियसखधनंजयगृहीं युयुधानासह जगन्निवास वसे. ॥ १५
ज्या गुरुरत्नकनकमय तुळिलें कविनीं सुमेरुशैलासीं, ।
त्या मुख्यप्रासादीं धर्म वसे, धनद जेंवि कैलासीं. ॥ १६
ज्येष्ठकनिष्ठपित्याला गांधारीला निवेदुनी राज्य ।
होय स्वस्थ युधिष्ठिर देउनि धौम्या कृपाधन प्राज्य. ॥ १७
वृद्धांधबाळ जन जो नाहीं कोणीच सोयरा ज्याचा ।
तो तोषविला धर्में वाटे परमाप्त होय राजाचा. ॥ १८
क्रमुनि सुखें रजनीतें प्रातःकृत्यासि करुनि साधु निघे, ।
श्रीकृष्णदर्शनातें, भूसुरसत्कारसुकृत सांधुनि, घे. ॥ १९
प्रभु रत्नकनकभूषितपर्यंकीं स्वस्थ बैसला होता, ।
जो वज्रपात विनतीं जाणोनि म्हणे, 'खचो न पाहोता.' ॥ २०

---

१. मंगळ. गुरु, शनि व मंगळ हे ग्रह अष्टम स्थानीं आले म्हणजे फार त्रास होतो, व मनुष्यास हाय हाय करावें लागतें. समानार्थक गीतिः—धर्म पुसे, 'देवा! कां पावतसे व्यस्त विजय कष्ट महा? । कोणी असुलक्षण कीं म्हणवी गुरु, मंद, भौम, अष्टम 'हा!' ॥' उद्योगपर्व—६—२१. २. हाय. ३. भारतीययुद्ध अठरा दिवस चाललें होतें ते अठरा दिवस. ४. आलय=घर, महाल. ५. देवांला योग्य अशीं. ६. सुखें. ७. बहुधन+कनक+नगनिभ+आलय=धनप्रचुर व सुवर्णमेरुप्रमाणें विशाल आणि कांतिमान् अशा गृहांत. ८. इंद्राप्रमाणें. ९. सात्यकीसह. १०. मोठीं रत्नें आणि सुवर्ण यांनीं भरलेल्या. ११. धृतराष्ट्र आणि विदुर यांना. १२. देऊन, अर्पण करून. १३. कृपाधन=धनदान, द्रव्यरूप नजराणा. १४. ही गीति वाचून शाकुंतलनाटकाच्या ६ अंकांतील दुष्यंतोक्तीची आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं. १५. ब्राह्मणांच्या सत्कारापासून होणारें पुण्य. १६. जोडून. १७. रत्नखचित सुवर्णमंचकावर. १८. अन्वयः—जो विनतीं (=नम्र झालेल्यावर) वज्रपात जाणोनि म्हणे, '(मी) पाहोता (=पाहत असतांना), (तो नम्रदास) न खचो.' भावार्थः—शरण आलेल्यावर अर्थात् आपल्या भक्तावर, कोणी तरी विलक्षण संकटाचा घाला वज्राप्रमाणें आला आहे हें जाणून सचिंतपणें प्रभु विचार करीत होता. पाठभेदः—'खचोनि पाहोता.'

पीतपटीं प्रभु जडिला, शुचिकनकीं इंद्रनीळसा, साजे।
प्रभुचे अर्धोन्मीलित डोळे, करिते कृतार्थ दासा जे. ॥ २१

वक्षःस्थळा सुविपुळा शोभवि कौस्तुभ, जसा नभा सविता; ।
दृष्टांत होय परि हा; वरमणि दिनमणि असा न भास विता. ॥ २२

यत्तेजें पाताळीं न, न भूलोकीं, न मलिन नय नाकीं, ।
त्या प्रभुसि पुसे, 'आली सुखनिद्रा तूज नलिननयना! कीं? ॥ २३

झाली प्रसन्न मति कीं जीस परम लज्जिता वृथा होती? ।
यत्कृत पालन पाहुनि, कवि म्हणती माय परि वृथा हो! ती.' ॥ २४

प्रार्थुनि बोलविला प्रभु, परि कांहीं नच वदे, न वा पाहे, ।
जाणो शिल्पिवरें हरि नीलमय घडुनि मांडिला आहे! ॥ २५

धर्म म्हणे, 'जगदीशा! स्तब्ध विनिश्वास चित्रसें आज ।
कां गमतें? त्वां धरिलें कां ऐसें ध्यान? मानदा! सांग. ॥ २६

ध्यातोसि काय? देवा! दिसतोसि निवातसद्मदीपकसा. ।
आश्चर्य गमे, झाला निश्चळ वितरंग नदनदीप कसा? ॥ २७

---

१. इंद्रनील मण्याप्रमाणें. पीतांबरधारी श्यामसुंदर श्रीकृष्णास सुवर्णकोंदणांत जडलेल्या नील-मण्याची उपमा फारच योग्य आहे. २. अर्ध+उन्मीलित=अर्धे उघडलेले. हें क्रियाविशेषण आहे. ३. मोठ्या, रुंद. ४. अन्वयः-हा दृष्टांत होय; परि वरमणि दिनमणि असा भास (तेज) न विता (उत्पन्न करता). पाठभेदः-'असा न भासविता.' भासविता=प्रकाशित करणारा, प्रकाश देणारा. भावार्थः-पूर्वार्धांत, 'नभा सविता जसा शोभवि तसा कौस्तुभ सुविपुला वक्षःस्थळा शोभवि' असें म्हटलें. त्यांत नभ (आकाश) याचा रंग निळा व तसाच श्यामसुंदर श्रीकृष्णाच्या वक्षःस्थळाचा; तेव्हां दिलेली उपमा योग्य होय. परंतु, पंत उत्तरार्धांत म्हणतात कीं पूर्वार्धांत दिलेला हा केवळ दृष्टांत होय. सूर्य ही अशी प्रभा (अर्थात् कौस्तुभमण्याच्या अंगच्या प्रभेसारखी) न पावता; अर्थात् कौस्तुभतेज रवितेजाहूनही ज्यास्त-असा भाव. ५. अन्वयः-यत्तेजें (श्रीकृष्णतेजें) मलिन नय (नीति) पाताळीं न, भूलोकीं न, नाकीं (स्वर्गलोकीं) न. ६. कमलनेत्रा! ७. अन्वयः-जीस वृथा परमलज्जिता होती [ती तुझी] मति प्रसन्न झाली कीं? यत्कृत (जिनें केलेलें) पालन पाहुनि; हो (=अशी) ती माय परि वृथा; (असें) कवि म्हणति. भावार्थः-श्रीकृष्णानें पांडवरक्षण कुंतीपेक्षांही अधिक केलें या तात्पर्यास धरून पंत म्हणतात-ज्या मतीकडे पाहून कुंतीसही लाजून जावें लागें; व ज्या मतीच्या योगें झालेल्या संरक्षणामुळें पुत्रहित साधणारी माता ही कर्तव्याविषयीं वृथा झाली, ती मति प्रसन्न झाली कां? असा प्रश्न धर्मराजांनीं केला. निद्रा झाल्यानंतर मनुष्याची बुद्धि शांत व प्रसन्न असते हा सर्वानुभव आहेच. ८. चित्राप्रमाणें. ९. निवाततेंत म्हणजे वाऱ्याची स्थिति. १०. बहुमानातें देणारा. ११. राहण्याचें स्थान जें गृह त्यासंबंधीं दिवा. वायुरहित निश्चलत्व व्यक्त होतें. १२. ज्यांतील लाटा नाहींशा झाल्या आहेत असा. १३. नद आणि नद्या यांचा पति; समुद्र.

विश्वध्येया! तुज निज आत्मा ध्याता नसोनि, कां गमला? ।
जरि मी असेन योग्य श्रवणास, ध्यानतत्व सांग मला.' ॥ २८
प्रार्थुनि अत्याश्चर्यें कर जोडुनि धर्म राहिला उगला ।
मग दृष्टि हळुच उघडी प्रभुवर, जो ध्यानसुखभरें फुगला. ॥ २९
देव म्हणे, 'धर्मा! ज्या देवनदी प्रसवली महाभागा, ।
श्रीरामसाच झाला सर्वज्ञ वसिष्ठशिष्य जो बा! गा; ॥ ३०
चापश्रुतिमार्ग बरा भार्गवरामा भजोनि जो जाणे, ।
बाळपणींच जयाच्या शस्त्रास्त्ररहस्य मानसीं बाणे; ॥ ३१
काशिपकन्यात्रय जो सर्वक्षत्रिययशासमेत हॅरी, ।
हरिसा शरभरवें, बहु कांपे ज्याच्या धनुःस्वनेंचि हॅरी; ॥ ३२
ज्या न तरे राम गुरुहि निकरें रण करुनि दिवस तेवीस, ।
गणि रेणुकेसि गंगेहूनि उणें फार त्याहि देवीस; ॥ ३३
जाणे चतुराननसा जो भूतभविष्यवर्तमानातें, ।
सत्कविसभेंत पावे बहु जो अरिहस्तिगर्त मानातें; ॥ ३४
शरतल्पीं प्रेमभरें ध्यातां येऊनि शरण तो मातें, ।

---

१. अवघ्या लोकांनीं ध्यान करण्यास योग्य असा. अन्वयः–हे विश्वध्येया! निज आत्मा ध्याता नसोनि तुज [तसा] कां गमला? तुला ध्येय असें कांहींच नाहीं. २. ध्यानाचें सत्यस्वरूप. ३. स्तब्ध. ४. भीष्मास. ५. भीष्माचार्यास वेदाध्ययनाकरितां गंगेनें वसिष्ठऋषीकडे नेऊन ठेविलें होतें. ६. धनुर्वेदमार्ग. परशुरामाचा जरी कोणाही क्षत्रियास धनुर्वेद शिकवावयाचा नाहीं असा निश्चय होता, तरी भीष्ममाता श्रीगंगा हिची भीड पडल्यावरून त्यांनीं भीष्माचार्यास धनुर्वेदविद्या शिकविली. ७. काशीराजाच्या अंबा, अंबिका व अंबालिका नामक तीन मुली. ८. हरण करी. ९. इंद्र. १०. अन्वयः–गुरु हि राम (=परशुराम) तेवीस दिवस निकरें रण करुनि ज्या न तरे (ज्या भीष्माचा त्यास पराभव करितां आला नाहीं) [आणि म्हणून] (तो परशुराम) रेणुकेसी (स्वमातेस) (व) त्याहि देवीस (अंबेस) फार उणें गणि (मानी). भीष्मपराजय करतां आला नाहीं ह्यावरून स्वमाता रेणुका ही भीष्ममाता गंगा हिजपेक्षां फार कमी असें त्यास वाटलें; व तसेंच, जिच्याकरितां आपण युद्धाचा इतका खटाटोप केला त्या अंबेच्या दुर्दैवामुळें आपणास यश आलें नाहीं असें त्यास वाटून ती फार कमी असें परशुरामास वाटलें–असा भाव. ११. अन्वयः–जो अरि-हस्तिगर्त, (=शत्रुरूप हत्तींना खळग्याप्रमाणें; अर्थात् खळग्यांत पडून ज्याप्रमाणें हत्तीचा नाश होतो त्याप्रमाणें ज्याच्याशीं सामना करितांना शत्रूंची गाळण होई–असा भाव) सत्कविसभेंत (सुज्ञ लोकांत) बहु मानातें पावे. हत्ती धरण्याकरितां खोल खड्डे खणावे लागतात ही गोष्ट पंतांस माहीत होती हें ह्या गीतीवरून दिसतें. १२. शरतल्पीं (बाणाच्या शय्येवर) तो मातें प्रेमभरें शरण येऊनि ध्यातां (ध्यान करीत असतां) इ०.

अनुसरलों होतों मी त्यातें, [1]पाथोधि जेंवि [2]सोमातें. ॥ ३५
देवद्विजगुरुभक्त, व्रतियतिपति, अतिमति, प्रथित लोकीं, ।
सत्यप्रतिज्ञ, पंडितवर, [3]रामा [4]स्वासुहुनि दयित तो कीं. ॥ ३६
गेलों मनेंकरुनि मी धर्मा! भीष्माकडे, कथूं काय? ।
हाय! प्रेम न वदवे; वत्सचि तो साधुराय मी गाय. ॥ ३७
[5]भीष्मत्यक्त अशोभित राज्य, जसें पदकहेम हीरा ज्या ।
टाकी; गतेंदु रजनी गतभीष्मा तसिच हे मही राजा! ॥ ३८
त्या ज्ञानदीपकाला लागो [6]त्वच्छ्रोत्रवृत्ति हे वाती, ।
[7]सर्वार्थदर्शिनी [8]तद्रुचि रविरुचिसीं करील [9]हेवा ती. ॥ ३९
नमुनि पुसायाचें तें त्या भीष्मा सुज्ञनायका पूस; ।
स्वीकारिति लघुसहि गुरु, [10]गौरी मिरवी न काय कापूस? ॥ ४०
ज्ञानें अस्ता जातिल होतां तो भीष्मभानु अस्तमित; ।
दिसतो तसा नव्हे, बा! तेजस्वी सूर्य काय [11]हस्तमित? ॥ ४१
[12]तथ्य [13]प्रभूक्त परिसुनि धर्माचा गहिंवरें गळा दाटे, ।
मागुनि कुठार [14]अजिरज [15]निर्जरतरुराज खंडिला वाटे. ॥ ४२
[16]धर्म म्हणे, 'कथिसि खरें स्तवुनि कुरुपितामहप्रभावास, ।
रविसाचि आमुचा तो होय गुरु पितामह प्रभावास. ॥ ४३

---

१. समुद्र. पाथस्+धि=पाथोधि. २. चंद्राला. ३. परशुरामास. ४. आपल्या प्राणाहून. ५. अन्वयः—ज्या हीरा टाकी, (तें) पदकहेम जसें (अशोभित), (तसें) भीष्मत्यक्त राज्य अशोभित; राजा! (जशी) गतेंदु रजनी तसिच गतभीष्मा हे मही. ६. त्वत्+श्रोत्रवृत्ति=तुझ्या कर्णाची वृत्ति. ७. सर्व+अर्थ+दर्शिनी सर्व अर्थ म्हणजे चारी पुरुषार्थ उघड करून दाखविणारी. अर्थ(श्लिष्ट)=(भीष्मपक्षीं) चारी पुरुषार्थ, (रविपक्षीं) पदार्थ. ८. ज्ञानदीपाची ज्योति किंवा कांति (झळाळी). ९. स्पर्धा. १०. हिंदु स्त्रिया हरितालिकादेवीस (गौरीस) कापसाच्या सुतपुतळ्या करून वाहतात हें प्रसिद्ध आहेच. ११. हातापवढें प्रमाण आहे ज्याचें असा. सूर्यबिंब तळहाताएवढें दिसतें पण तशी वस्तुस्थिति नाहीं. १२. सत्य. १३. श्रीकृष्णांनीं सांगितलेलें. सूर्य दिसतो त्यापेक्षां फार मोठा आहे ही गोष्ट पंतांना माहीत होती हें यावरून स्पष्ट होतें. १४. आंगणांत झालेला. १५. कल्पवृक्ष. भीष्माचा आपण व्यर्थ नाश केला असें धर्माला वाटलें. १६. अन्वयः—धर्म म्हणे, कुरुपितामह-प्रभावास स्तवुनि खरें कथिसि. तो आमुचा गुरु (व) पितामह रविसाचि प्रभावास (प्रभा+वास=तेजाचें स्थान) होय. पाठभेदः—**'गुरुपिता महप्रभावास.'** गुरुपिता=आज महप्रभावास=पराक्रम व तेज यांचें माहेरघर.

[१]जें स्वबळा होउनि दव, करुनि परां दारुकक्ष, तारी, तें ।
रथरत्न सजुनि कळवी साधूंच्या दारुक क्षतारीतें. ॥ ५२

---

## अध्याय सातवा.

श्रीव्यास श्रीनारद, मुनि [२]देवस्थान, [३]वात्स्यनाम मुनी, ।
[४]अश्मक, [५]सुमंतु, [६]जैमिनि व्हावें पतितेंहि धन्य ज्यां नमुनी; ॥ १
[७]मार्कंडेय, [८]विभांडक, [९]धौम्यहि, [१०]शांडिल्य, [११]भास्करी, [१२]पैल, ।
[१३]मैत्रेय, [१४]देवरात, स्मरणें ज्यांच्या जळे [१५]दुरितशैल; ॥ २
[१६]लोमश, [१७]हारीत, [१८]असित, [१९]ऐतरय, वसिष्ठ, [२०]गांधिज, [२१]च्यवन, ।
श्री[२२]दत्त, [२३]शुक्र, [२४]गुरु जो करि [२५]नहुषमहाभयार्तशच्यवन; ॥ ३

---

१. अन्वयः–जें रथरत्न परां (शत्रूंतें) दारुकक्ष (काष्ठ आणि तृण) करुनि, [आणि स्वतः] दव (दवाग्नि) होउनि स्वबळा तारी, तें सजुनि (सज्ज करूनि) साधूंच्या क्षतारीतें (नाहींसे केले आहेत शत्रू ज्यानें अशा–कृष्णाला) दारुक कळवी. सर्वसंग्रहकारांनीं 'क्षतारीतें=क्षतांच्या अरीतें, जखमाच्या शत्रूतें' असा अर्थ केला आहे. २. एक ब्रह्मर्षि. ३. एक ब्रह्मर्षि. हा जनमेजय सर्पसत्रांत सदस्य होता. ४. एक ब्राह्मण. याचें जनकराजाशीं सुखदुःखनिवृत्तिसंबंधानें भाषण झालें होतें. ५. कृष्णद्वैपायन व्यासाच्या चार शिष्यांपैकीं अथर्वण वेद पढणारा. ६. कृष्णद्वैपायन व्यासाचा सामवेद पढणारा शिष्य व सुमंतूचा सहाध्यायी. ७. एक ब्रह्मर्षि. यानें परमेश्वराच्या वरानें माया पाहिली होती. ८. ऋष्यशृंग ऋषीचा पिता. ९. हा पांडवांचा पुरोहित व देवल ऋषीचा कनिष्ठ भ्राता असावा. १०. द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि. याचीं सगुण उपासनेविषयीं शांडिल्य नांवाचीं सूत्रें आहेत. ११. भास्करि नांवाचा एक ब्रह्मर्षि. १२. कृष्णद्वैपायन व्यासाचा ऋक्शाखाध्ययन करणारा व पांडवांच्या राजसूय यज्ञांत असणारा शिष्य. १३. हा पराशर ऋषीचा शिष्य. पांडवांशीं वैर करूं नको असा यानें एकदां दुर्योधनास उपदेश केला. पण दुर्योधनानें त्याबद्दल तिरस्कार दाखवून त्याच्यापुढें आपली मांडी थोपटली, तेव्हां भीमाची गदा तुझ्या मांडीवर बसून तूं मरशील असा यानें शाप दिला होता. १४. देवरत (?) नांवाचा एक ब्रह्मर्षि. १५. पापपर्वत. १६. एक ब्रह्मर्षि. यानें वनपर्वात सांगितल्याप्रमाणें काम्यकवनांतून पांडवांना तीर्थयात्रेस नेऊन सर्व तीर्थें दाखविलीं होतीं. १७. अंगिराकुलोत्पन्न ऋषि. १८. जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य ऋषि. १९. ऋक्शाखीय एक ऋषि. याचें एक ब्राह्मण आहे. २०. विश्वामित्र. २१. वारुणि भृगूच्या सात पुत्रांपैकीं एक. २२. हा परम ब्रह्मनिष्ठ प्रल्हाद, यदु, सहस्रार्जुन इत्यादिकांचा ब्रह्मविद्येसंबंधाचा गुरु कीं काय? २३. हा देवयानीचा पिता. २४. देवगुरु बृहस्पति. २५. नहुष+महाभय+आर्त+शची+अवन=नहुष राजाच्या भयानें त्रासलेल्या इंद्राणीचें रक्षण. याची कथा अशी आहे कीं वृत्रासुराच्या हत्येच्या पातकामुळें इंद्र

कुरु, [2]तुंबुरु, [3]वाल्मीकि, श्री[4]कपिल, [5]सनत्कुमार, [6]तृणबिंदु, ।
मौ[7]द्गल्य, राम भार्गव, जो शिष्यचकोरमंडळीं इंदु; ॥ ४

[8]संवर्त, पिप्पलाद, क्रतु, पुलह, पुलस्त्य, वायु, कंच, [12]दक्ष, ।
[13]कश्यप, [14]काश्य, [15]पराशर, जेणें [16]कुणपाश जाळिले लक्ष. ॥ ५

[17]मांडव्य, धौम्र[18], गौतम[19], गालव[20], [21]कृष्णानुभौतिक, [22]मरीची, ।
ऋषि [22]अंगिरा, [23]उलूक, श्री[24]पूरणमुनि, विभूति, [25]एरीची, ॥ ६

---

पीडित झाला असतां, सर्व देव आणि ऋषि यांनीं नहुषास कांहीं दिवस इंद्रपदावर बसविलें. तेव्हां इंद्राणीचा उपभोग घ्यावा ह्या हेतूनें त्यानें इंद्राणीस पाचारण केलें. तेव्हां शतक्रतु केलेल्या इंद्राशिवाय इतरांची असली आज्ञा कशी मान्य करावी याचें तिला मोठें संकट पडलें. त्यांतून मुक्त होण्याकरितां ती बृहस्पतीकडे गेली. तेव्हां अपूर्वयानांतून आपण मजकडे याल तर आपली इच्छा पूर्ण होईल, असा निरोप नहुषास पाठीव, अशी युक्ति त्यानें तिला सांगितली. त्यावरून सप्तर्षींस वाहनास जोडून नहुष इंद्राणीकडे जात असतां वाटेंत त्वरा करण्याकरितां ऋषीच्या मस्तकांस पदस्पर्श करून 'सर्प सर्प' (लवकर चला, लवकर चला) असें तो त्यांस ह्मणाला. तेव्हां तूंच सर्प होऊन पृथ्वीवर. पड असा अगस्तीनें त्यास शाप दिला. त्याप्रमाणें तो सर्प होऊन पृथ्वीवर पडला. इकडे इंद्राचें ब्रह्महत्येचें पातक वृक्ष, नद्या, पर्वत, पृथ्वी आणि स्त्रिया यांनीं विभागून घेतल्यामुळें इंद्रही शुद्ध होऊन पूर्वपदारूढ झाला. याप्रमाणें गुरूच्या युक्तीनें इंद्राणीची संकटापासून मुक्ति झाली.

१. एक ऋषि. २. एक ऋषि. प्रसिद्ध गंधर्वपुत्र नव्हे. ३. प्रचेतस ऋषीचा पुत्र व रामायणाचा कर्ता. ४. सांख्यशास्त्रप्रणेता. ५. सर्व महर्षींपूर्वीं ब्रह्मदेवानें जे चार मानसपुत्र निर्माण केले त्यांपैकीं एक. हे सर्वच परम ब्रह्मनिष्ठ होते. ६. पूर्वी पांडवांबरोबर द्वैतवनांत असणारा ऋषि. ७. एक ऋषि. हा पुढें जनमेजयाच्या सर्पसत्रांत एक सदस्य झाला. ८. अंगिरा ऋषीचा पुत्र व बृहस्पतीचा भाऊ. ९. एक ब्रह्मनिष्ठ ऋषि. १०. सप्तर्षींपैकीं एक. ११. एक ब्रह्मर्षि. १२. स्वायंभु मन्वंतरांत ब्रह्मदेवानें जे दशमानसपुत्र निर्माण केले त्यांपैकीं एक. १३. ब्रह्मपुत्र मरीचीचा पुत्र. १४. एक ऋषि. सांदीपनीचा पिता (?). १५. मैत्रावरुणि वसिष्ठाचा पौत्र व शक्ति ऋषीचा पुत्र. हा लहान असतांच याच्या पित्यास एका राक्षसानें भक्षिलें होतें. ही कथा मोठेपणीं आईकडून कळतांच यानें राक्षससत्र आरंभून सहस्रावधि राक्षस जाळून टाकिले. पुढें वसिष्ठानें याचा राग शांत केला. १६. मांसभक्षक, राक्षस. १७. एक ब्रह्मर्षि. हा मोठा तपस्वी असे. पण यानें पूर्वजन्मीं बालपणीं एका किड्यास कांट्यानें वेधिलें होतें, म्हणून त्या दोषामुळें या जन्मीं त्याजवर चोरीचा आरोप येऊन राजानें यास सुळावर चढवून ठेविलें. पण पुढें चोर सांपडल्यामुळें यास सोडून दिलें. १८. हा कोण? भारती पोथींत 'धौम्र' आहे. १९. अहल्येचा पति (?). २०. विश्वामित्राचा शिष्य. २१. एक ऋषि. आमच्या जवळच्या भारती पोथींत 'कृष्णाजभौतिक' आहे. यासच कृष्ण असें अन्य नाम आहे. २२. एक ब्रह्ममानसपुत्र. २३. विश्वामित्राच्या पुत्रांपैकीं एक. २४. पूरण नांवाचा एक ऋषि. २५. हा कोण?

ऐसे महानुभाव ब्रह्मज्ञ श्रेष्ठ वर्णिले धन्य ।
भीष्मासमीप होते, [1]सूतादिक बहु [2]अनुक्तही अन्य. ॥ ७
श्रीभीष्म श्रीकृष्णप्रभुचा स्तव आदरें करी, राजा! ।
[3]केसरशिखाचि मानी रुतल्या खरशरशिखा शरीरा ज्या. ॥ ८
'[4]स्तवराज' असें म्हणती त्या, जें भगवन्मनोवशीकरण; ।
[5]प्रेमा भीष्मा भगवत्स्तवन म्हणे, जेंवि राम शीक रण. ॥ ९
होय प्रसन्न देव स्तवराजें; त्यासि भेटला [6]योगें. ।
दिव्यज्ञानामृत दे [7]जोडाया कर [8]भवें [9]महारोगें. ॥ १०
होते समीप योगी ज्ञानी श्रीव्यासनारदासम जे, ।
त्यां सर्वांस प्रभुनें भीष्मीं केला [10]प्रसाद तो समजे. ॥ ११
त्या अतुलचमत्कारें वाल्मीकिपराशरादि [11]गहिवरले, ।
[12]प्रेमाश्रुबिंदु इंदुस्तुत ज्यांचे हरिति ताप महिवरले. ॥ १२
ते बोलिले, 'उघडिली हे स्तुति [13]पुरुषार्थसुखनि शांतनवें, ।
[14]हें स्तवनसें न देइल चिंतामणिचेंहि सुख निशांत नवें. ॥ १३

---

१. पुराण सांगणारा लोमहर्षण तोच. २. ज्यांचीं नांवें सांगितलीं नाहींत असे. ३. अन्वयः– ज्या खर–शर–शिखा (तीव्रबाणांचीं टोंकें) शरीरा रुतल्या (त्या) केसरशिखाचि (पुष्पपरागांचीं टोंकें) मानी. शरशय्या पुष्पशय्याच आहे असें मानी–असा भाव. ४. अन्वयः–जें भगवन्मनोवशीकरण (भगवंताच्या अंतःकरणाला वश करणारें प्रभुस्तवन) त्या स्तवराज असें म्हणती. मुळांतील लांबलचक स्तवास येथें फांटा दिला आहे. ५. अन्वयः–भीष्मा जेंवि राम (परशुराम) रण शीक म्हणे, (तेंवि) प्रेमा भगवत्स्तवन (शीक म्हणे). भीष्माचार्यांचे गुरु परशुराम होते व त्यांनीं त्यास युद्धकला शिकविली; त्याप्रमाणें परमेश्वराच्या ठायीं असणाऱ्या प्रेमानेंच भीष्मास भगवंताची स्तुति कशी करावी हें शिकविलें; अर्थात् प्रेमातिशयामुळेंच स्तुतिस्फूर्ति भीष्मास झाली–असा भाव. ६. योगमार्गानें. ७. जोडावे म्हणून. ८. संसारानें. इहलोकींच्या वस्तीनें. ९. भवें महारोगें=संसाररूपी दुर्धर रोगानें. १०. अनुग्रह. प्रभुनें भीष्मीं केला (=केलेला) तो प्रसाद त्यां सर्वांस समजे–असा अन्वय करावा. ११.सद्गदित झाले. १२. अन्वयः–ज्यांचे इंदुस्तुत (चंद्रासही मान्य) प्रेमाश्रुबिंदु महिवरले ताप हरिति. चंद्रकिरण शीतळ आहेत व त्यानें संताप दूर होऊन आल्हाद होतो; आतां, हे प्रेमाश्रुबिंदु 'इंदुस्तुत' म्हणजे चंद्रानें प्रशंसा केलेले होते, तेव्हां ते ताप निश्चयेंकरून हरण करतील–असा भाव. १३. पुरुषार्थांची उत्कृष्ट खाण. १४. अन्वयः–हें (=ह्या) स्तवनसें (स्तुतिप्रमाणें) चिंतामणिचेंही नवें निशांत (=घर) सुख न देइल. 'चिंतामणि तेंही' असा अन्य पाठ,

[1]विश्रांत जन्हुकन्या धन्या प्रसवुनि तुलाचि शांतनवा! ।
झाला न, नसे सांप्रत, होइल न त्वत्समान शांत नवा. ॥ १४

करुनि प्रसाद भीष्मीं, यो[2]गेश्वर [3]शक्रसूनुच्या गेहीं, ।
[4]शयनस्थानीं जाउनि शिरला जों काय आपुल्या देहीं, ॥ १५

[5]तों प्रार्थुनि प्रमोदित पार्थें प्रभु वृष्णिपाळ हा केला, ।
[6]उठवी प्रभूसि जैसा देउनि पानार्थिबाळ हाकेला. ॥ १६

मग [7]वैदर्भीवल्लभ बसला सात्यकिसमेत निजयानीं, ।
[8]स्वर्णस्यंदन एकचि भूषविला धर्मराजविजयांनीं. ॥ १७

एकरथीं तेजस्वी भीम बसे [9]संयम, तो जना सत्य ।
भासे भगवान् [10]भव्यप्रभ साक्षात् भानुमान् [11]सनासत्य. ॥ १८

नगराकाररथावरि बसले संजय, युयुत्सु, कृप, [12]सौ हे ।
स्यंदन शीघ्र निघाले, ज्यांच्या तेजा न शत्रुनृप साहे. ॥ १९

धर्मासि कुरुक्षेत्रीं [13]ह्रद दाखवुनि, प्रताप रामाचा, ।
[14]कथिला सविस्तर पर्थीं श्रीकृष्णें क्षत्रकुळविरामाचा. ॥ २०

---

१. अन्वयः–(हे) शांतनवा! तुलाचि प्रसवुनि जन्हुकन्या (गंगानदी) विश्वांत धन्या [झाली.] त्वत्समान नवा (दुसरा) शांत (जितेंद्रिय) झाला न, सांप्रत नसे, न होइल. २. श्रीकृष्ण. ३. अर्जुनाच्या. ४. हें गीत्यर्ध पुढील गीतीच्या पूर्वार्धास जोडून घ्यावें. अध्याय ६, गीति २६,२७,३५ यांमध्यें प्रभु भीष्माकडे मनानें गेले असून देहमात्र शय्यामंदिरांत होता असें वर्णिलें आहे, त्यास अनुसरूनच या गीतींत 'आपुल्या देहीं शिरला' असें म्हटलें आहे. जों काय=ज्या सुमारास. ५. अन्वयः.–तों हा वृष्णिपाळ (श्रीकृष्ण) प्रभु पार्थें प्रार्थुनि प्रमोदित केला. पार्थें=धर्मानें. ६. जैसा पानार्थि (स्तनपान करूं इच्छिणारा) बाळ, (तैसा) हाकेला देउनि (तो=पार्थ) प्रभूसि उठवी. ७. रुक्मिणीपति, श्रीकृष्ण. ८. सोन्याचा रथ. धर्मराज आणि अर्जुन एकाच सोन्याच्या रथांत बसले. ९. नकुलसहदेवांसह. १०. कल्याणरूपी तेज आहे ज्याचें असा. ११. अश्विनीकुमारांसहित. १२. सहा. कृष्ण व सात्यकी यांचा एक, धर्म व अर्जुन यांचा एक, भीम व नकुलसहदेव यांचा एक आणि संजय, युयुत्सु (धृतराष्ट्राचे दासीपुत्र) व कृप यांचे तीन मिळून सहा रथ. १३. (रक्ताचे) डोह. कथासंदर्भः–'वधुनि खळ कुरुक्षेत्रीं रक्तें ऱ्हद नव भरी महावेशें; । रामींच वीररस या! हा सोडुनि अन्य कां पहावे शें! ॥' मंत्रभागवत–स्कं० ९ गी० २४७. १४. पूर्वार्धासह अन्वयः–कुरुक्षेत्रीं धर्मासि ऱ्हद दाखवुनि, पर्थीं श्रीकृष्णें क्षत्रकुळविरामाचा (क्षत्र+कुळ+विराम=क्षत्रियकुळांचा नाश केला आहे ज्यानें त्याचा) रामाचा (परशुरामाचा) सविस्तर प्रताप कथिला. येथें मुळांतील परशुरामाच्या लांबलचक कथेस फांटा दिला आहे.

परम भयंकर युद्धस्थानें तीं तीं मनांत आणीत, ।
वाणीत प्रेमभरें, नच येऊं देत विकृति वाणींत. ॥ २१
गेले ते, जेथें तो ओघवतीच्या तटींच शरतल्पीं ।
पडला होता भीष्म प्रभु, जेंवि रथावरूनि रवि कल्पीं. ॥ २२
सर्व श्रीकृष्णादि स्वस्वशुभस्यंदनासि सोडून, ।
प्रथम सविनय व्यासप्रमुखमुनिजनासि हात जोडून, ॥ २३
करुनि प्रदक्षिण, नमुनि भीष्माभंवते उगेचि ते बसले, ।
धर्ममनीं, तेंवि नदीसुतदेहीं शरसहस्र तें न सले. ॥ २४
त्या शरतल्पीं भीष्म क्षीणस्नेह प्रदीपसा वाटे, ।
किंचित् दीनमना प्रभु होय, गमे गहिंवरें गळा दाटे. ॥ २५
मग हळुहळु भीष्मातें श्रीकृष्ण म्हणे, 'प्रभो! तव ज्ञानें, ।
आहेत कीं प्रसन्नें, मोह निरखिला जिहीं अवज्ञानें. ॥ २६
बा! झाली नाहीं कीं राजा! भरताचिया कुलाधारा! ।
कांया शराभिघातें, वातें बहु जेंवि ओकुला धारा? ॥ २७
सांग महाराजा! शरशयनीं तव गात्र हें कसें दुखतें? ।
यांतुनि एकेंचि इतर होता तत्काल बा! परासु खतें. ॥ २८
तूं [17]छंदमृत्यु शंतनुवरदानेंचि प्रभो! महाभागा! ।
हें छंदमृत्युकारण [19]पितृतोषण मजहि न घडलें बा! गा! ॥ २९
सूक्ष्महि शल्य सुदुःसह, तूं [20]तों शरपंजरांत खिळिलास ।
काळें [21]वरवज्रकवचसंवृततनु म्हणुनि बा! न गिळिलास. ॥ ३०
द्याव्या [22]तुहिननगाला निववाया मेळवूनि गारा ज्या, ।
त्या जेंवि, तुज कथाव्या [23]भूतोद्भवलयकथा अगा राजा! ॥ ३१

---

१. कमीपणा. पाठांतर:—'विकृति घाणींत'. २. शरशय्येवर. ३. प्रळयीं. ४. अन्वय:—ते शरसहस्र (जेंवि) धर्ममनीं, तेंवि नदीसुतदेहीं (भीष्माचार्यांच्या अंगास) न सले. ५. संपलें आहे तेल ज्यांतील असा. ६. कष्टी. ७. स्वच्छ, निर्मल. 'कीं' हें प्रश्नार्थक अव्यय. ८. तिरस्कारानें, बेपर्वाईनें. अवज्ञान=तिरस्कार. ९. भरताचिया=भरताच्या. १०. कुलस्तंभा, कुलदीपका. ११. शर+अभिघातें=बाणाच्या टोंचण्यांनीं. पाठांतर:—'या खरशराभिघातें'. १२. कमजोर. १३. पावसाची सर. १४. दुसरा कोणी. १५. गतप्राण. १६. क्षतें. १७. इच्छामरणी. १८. इच्छामरणाचें बीज. १९. पित्याच्या इच्छेची तृप्ति करणें. २०. तर. २१. वर+वज्र+कवच+संवृत+तनु=उत्कृष्ट अशा अभेद्य कवचानें झांकलेलें आहे शरीर ज्याचें असा. २२. हिमाचलाला. २३. भूत+उद्भव+लय+कथा=प्राण्यांच्या जननसंहाराच्या कथा. अन्वय:—

[1]कीं तूं उपदेशाया देवासहि योग्य बा! जसा [2]जीव, ।
[3]या सुयशें लोकांतें, देउनि चंद्रास लाज, साजीव. ॥ ३२
सर्वज्ञत्व वसे तव हृदयीं बा! [4]करतळीं जसें [5]बदर, ।
न [6]दर स्पर्शों दे, तुजवरि विद्येचा सदा वसे [7]पदर. ॥ ३३
[8]हा [9]स्त्रीसहस्रपरिवृत अतिरम्य अरोग काय होता; तें ।
[10]दिसतें इतरें शंतनुयश मेळविजेल काय हो! तातें. ॥ ३४
सत्यप्रतिपालक तूं, नांदे त्वन्मानसींच भूतदया, ।
झालासि धन्य; [11]कीं जो सत्पति चिंती सदैव भू तदया. ॥ ३५
आम्हीं लोकीं ऐसा शुद्धा सुगुणा न आयकों देहा, ।
विपुलं [12]सुयश:प्रसरें या ब्रह्मांडांत [13]काय [14]कोंदे हा. ॥ ३६

---

तुहिननगाला निववाया (थंड करण्याकरितां) ज्या गारा मेळवूनि (जमा करून) दाव्या, त्या जेंवि, (तेंवि) भूतोद्भवलयकथा अगा राया! तुज कथाव्या. हिमालयास थंड करण्याकरितां गारा जमा करून देणें व तुजला सृष्टिसंहारकथा सांगणें, ह्या दोनही गोष्टी सारख्याच होत; म्हणजे अर्थात् व्यर्थ होत. कारण हिमाचल मूळचाच थंड तेव्हां गारांच्या योगें त्यास थंड करणें ही वेडगळ समजूत होय; त्याचप्रमाणें तूं ज्ञानी आहेस, तर तुला सृष्टिसंहाराच्या गोष्टी सांगणें म्हणजे साखरेंत साखर मिसळून गोडी वाढविण्याचा प्रयत्न करणें होय—असा भाव. ह्याचें समर्थन पुढील गीतींत आहे. 'वाया तुहिननगाला' असा अन्य पाठ.

१. कारण. २. बृहस्पति. ३. अन्वय:—या सुयशें चंद्रास लाज देउनि लोकांतें साजीव. यशाचा रंग पांढरा आहे असा कविसंकेत आहे. हे भीष्मा! तूं देवादिकांसही उपदेश करण्यास बृहस्पतिप्रमाणें समर्थ आहेस; तेव्हां हा उपदेश (तत्वज्ञानबोध) सामान्य जनास करून त्यायोगें तुजला जें उत्कृष्ट यश प्राप्त होईल, त्यापुढें चंद्र फिका पडेल व तें अनुरूपच होईल [पहा—शांतिपर्व—अ० ७ गी० ४० पूर्वार्ध व १०४]. ४. तळहाताचे ठायीं. ५. बोर. संस्कृतांत करतलामलक (तळहातावरील आंवळा) असा प्रयोग आहे. ६. भीति. ७. स्त्रिया मुलांस पाजते वेळीं त्याजवर पदर घालतात, ही गोष्ट प्रसिद्ध आहेच. ह्या ठिकाणीं पंतांनीं 'पदर वसे' असा प्रयोग घालून विद्या व भीष्माचार्य ह्यांचा संबंध मातापुत्राचा आहे असें मोठ्या खुबीनें ध्वनित केलें आहे. ८. हा काय=भीष्माचा देह. ९. स्त्री+सहस्र+परिवृत=सहस्र स्त्रियांनीं वेष्टित. १०. अन्वय:—हो! इतरें तातें शंतनुयश काय मेळविजेल तें दिसतें. अर्थात् अशी यश:प्राप्ति कोणत्याही बापाला पुत्रापासून होणार नाहीं हें निर्विवाद आहे. भीष्माचार्यांनीं पितृतोषणार्थ आपण आजन्म ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा केली, व पित्यानेंही त्यास इच्छामरण दिलें—ह्या गोष्टीस अनुसरून ही गीति आहे. ११. अन्वय:—कीं (कारण) जो सत्पति तदया (तत्+अया=त्याच्या भाग्यास) भू (पृथ्वी) सदैव चिंती. १२. सु+यश:+प्रसरें=उत्कृष्ट कीर्तीच्या विस्तारानें. १३. देह. १४. भरून राहतो.

एक रथें जिंकाया लोकत्रय तूं [2]समर्थ, मी जाणें; ।
[1]गाणें, जेंवि शिवाच्या, देवांला शिकविलें तुझे बाणें. ॥ ३७

तूं शक्त स्वतपें या विश्वा विश्वेशसाचि [3]निर्मावया, ।
मग कां अत्युत्तमनिजलोकासि न निर्मिशील? [4]निर्मोया! ॥ ३८

धर्मज्ञानार्णव तूं होतासि जरिहि लहान शांतनवा! ।
साधु म्हणति, 'शांत [5]प्रभुसत्तम पहिलाच हा, न शांत नवा.' ॥ ३९

यास्तव [6]अमृतकरातें, धर्माचा हरुनि ताप, लाजीव. ।
सर्व तुम्हां साधूंच्या बोधें निवतोचि तापला [7]जीव. ॥ ४०

ज्ञातिविनाशें [8]झाल्या [9]योंच्या शोकासि तूं [10]शमिव राजा! ।
आहेत [11]युक्ति विदिता तुज त्या, [12]दत्तादिकां [13]शमिवरां ज्या. ॥ ४१

[14]कुरुकुळगगनघना! या पार्थमयूरें निवोनि हर्षावें, ।
त्वां [15]वर्णाश्रमधर्मज्ञानामृत बा! [16]यथेष्ट वर्षावें.' ॥ ४२

भीष्म म्हणे, 'दास तुवां दर्शन देऊनि धन्य हा केला, ।
त्या पावला गजाच्या तुजवांचुनि कोण अन्य [17]हाकेला? ॥ ४३

व्यापिलि असे शिरें [18]द्यौः, [19]क्षिति चरणांहीं, दिशा तव भुजांहीं. ।
दिसति [20]सनातनरूपीं [21]शक्रादिक दैवतें मज तुझ्या हीं. ॥ ४४

हें सुकविमंडळीचें दिव्य सदा नव्य भव्य [22]माहेर; ।

---

१. अन्वयः–जैवि शिवाच्या (बाणें),(तेंवि) तुझे बाणें देवांला गाणें शिकविलें. २. समर्थ. ३. उत्पन्न करावयास. ४. हे मोहरहिता! अत्युत्तम निजलोकासी=सर्वश्रेष्ठ अशा मोक्षपदाला. ५. प्रभुश्रेष्ठ. अन्वयः–हा शांत प्रभुसत्तम पहिलाच (=प्रथमपासूनच) शांत, नवा न, असें साधु म्हणति. कांहीं माणसें पूर्ववयांत फार उच्छृंखल असतात व पुढें निवळतात तशी स्थिति भीष्माचार्यांची नव्हती; लहानपणापासूनच ते शांत होते, व हा शांतपणा नवीन आलेला नव्हे असें सज्जन म्हणती–असा भाव. ६. चंद्रातें. ७. प्राणी. या एकवचनावरून जाति व्यक्त होते. ८. झालेल्या. ९. धर्मांच्या. १०. निवीव. ११. उपाय. १२. दत्तप्रमुखां. १३. योगिश्रेष्ठांस. १४. कुरु+कुळ+गगन+घना=कौरवकुळरूपा आकाशांतील मेघा! १५. वर्ण+आश्रम+धर्म+ज्ञान+अमृत=ब्राह्मणक्षत्रियादि चतुर्वर्णांच्या कर्तव्याचें ज्ञान हेंच अमृत. १६. पाहिजे तितकें. १७. धांव्यास. गजेंद्रमोक्षास अनुलक्षून ही उक्ति आहे. १८. आकाश. संस्कृतांत 'द्यो' असा स्त्रीलिंगी शब्द असून त्याचें प्रथमेचें एकवचनीं रूप 'द्यौः' असें होतें; व पंतांनीं तें तसेंच योजिलें आहे. १९. पृथ्वी. २०. अक्षय्य रूपांत. २१. इंद्रादिक. २२. या पूर्वार्धांत, 'माहेर' शब्द व 'नव्य' आणि 'भव्य' हीं विशेषणें योजून पंतांनीं फार बहार केली. मुलगी माहेरीं कितीदांही आली व केव्हांही आली तरी तिची अपूर्वाई व्हावयाचीच, पण तें 'माहेर' 'भव्य'=(सुखकर) अर्थात्

आहे रम्य तमभ्रमहर[1] भरलें रूप आंतबाहेर. ॥ ४५

देव म्हणे, 'माझा तूं भीष्मा! ऋजु[2] शांत भक्त, यास्तव न ।
त्वदधिक किमपि, असे हा हरि हरिणचि, [3]होय गीत या स्तवन. ॥ ४६

शुचि[4] योग्य तूं म्हणुनि हें म्यां दाखविलें स्वरूप तुज राया! ।
मी भक्तिवश न चुकलों त्या कुब्जेच्याहि वपुसि उजराया[5]. ॥ ४७

अठ्ठावीस क्रमिले दिवस, क्रमिशील हे दिवस तीस, ।
मग निज[6] गतीस वरिशिल तूं त्या पहिल्या, जसा शिव सतीस. ॥ ४८

तूं गेल्यावरि लोकीं नाशातें पावतील सुज्ञानें, ।
धर्मासि करावा त्वां यास्तव धर्मोपदेश सुज्ञानें[7]. ॥ ४९

हा मोहीं न बुडो, दे बोध[8]सुभुज सुज्ञनायका! यास[9]. ।
आले आहेत मुनी बहु धर्मरहस्य आयकायास.' ॥ ५०

कर जोडुनि भीष्म म्हणे, 'कृष्णा! नारायणा! महादेवा! ।
बहु हर्षित रोमांचित झालों या त्वद्वचें पहा, देवा! ॥ ५१

त्रिभुवनगुरो! तुजपुढें मी या धर्मास काय शिकवावें? ।
वद सदया! अमृतघनें कीं जलदें प्रांज्य[10] पीक पिकवावें, ॥ ५२

स्वोचित[11] सुकार्य कथिसी करुनि दया बा दयाकरा[12]! याला, ।
परि तवसमक्ष अक्षम लक्षमतें[13] हा दया करायाला. ॥ ५३

---

खरें मातृगृह पाहिजे, म्हणजेच तें 'सदा नव्य' असें होणार, त्याचप्रमाणें परमेश्वराचें सनातन स्वरूप ज्ञानी लोकांस सदा नव्य असें माहेर आहे व तेथें त्यांची सर्वदा चहा व्हावयाची. दिव्य= पारलौकिक.

१. तम+भ्रम+हर=अज्ञान व मोह यांतें दूर करणारें. २. सरळ. ३. या स्तवन गीत होय. हरिण गीतलुब्ध आहे व हा हरिहरिण (परमेश्वररूप हरिण) स्तवनलुब्ध आहे-असा भाव. समानार्थक गीतिः-'किंवा नारद आला आलापीत स्वकीय सच्चरितें, । प्रेमळ गीत तुम्हांला हरि! हरिणापरिस बहुत वश करितें. ॥' (संशयरत्नमाला). ४. शुद्ध. योग्य=अधिकारी, पात्र. ५. सरळ करावयास. ६. अष्टवसूंस शाप होऊन त्यांनीं गंगेच्या उदरीं जन्म घेतलें, त्यांपैकीं भीष्माचार्य हे शेवटचे. पहिले सातही पुत्र गंगेनें पाण्यांत बुडविले व हा आठवा शंतनूच्या आग्रहावरून राहूं दिला. तेव्हां 'पहिल्या निजगतीस' अष्टवसूंच्या स्थितीस. पहिल्या सतीस=पार्वतीस. ७. ज्ञानानें. ८. बोधरूपी बळकट हात. ९. अन्वयः-हा मोहीं न बुडो, (हे) सुज्ञनायका! यास बोधसुभुज दे. १०. पुष्कळ. ११. स्व+उचित=आपल्या स्वतःस योग्य. १२. दया+आकर=दयेची खाण अशा हे कृष्णा! १३. लाखों लोकांच्या दृष्टीनें; सर्व जगाच्या मतानें.

स्नेहें शिशुला देइल मातेहुनि अधिक काय सुख दायी? ।
चंद्रापुढें चकोरा ग्रह होइल कोण अन्य सुखदायी? ॥ ५४
जगदुत्पादक विधि तव शिष्य, तुझा वेदराशि निःश्वास, ।
विश्वास ज्ञानद तूं, साधूंचा त्वत्पदींच विश्वास. ॥ ५५
धर्मासि तुजपुढें मी उपदेश करूं विभो! कैसा काय? ।
बा! पद्मपत्रनेत्रा! पडलासे विकल हा असा काय. ॥ ५६
कथमपि वृद्ध सहातो देवा! तापापहा! कैसाल्याला, ।
शंललें शल्य, तसा हीं सायक बापा! पहा कसा त्याला. ॥ ५७
न तसी अतसीकुसुमश्यामा! मति, कीं तनूस हाडांस ।
भेदुनि शिरले शर हे म्हणविति अहिचे जसेचि 'हा!' डांस. ॥ ५८
स्वल्पींहि भाषणीं मन रसनेतें भ्रमुनि न शिरवि; प्रतिभा ।
गेली मातें सोडुनि, जाती ग्रहणांत जशि रविप्रति भा. ॥ ५९
भू, गगन, दिशा, विदिशा नेणें मी व्याकुलें अशा देहें; ।
'मा वद किमपि' असें वरदान मला बा! महायशा! दे हें. ॥ ६०
वेदांतांचि त्वत्तेजें वाक्य महीं तुजपुढें गडबडेल; ।
स्तंभित होइल किंवा भलतेंचि प्रभुवरा! बडबडेल. ॥ ६१
मधुसूदना! मुकुंदा! त्वद्ध्यानबळेंचि या जडा वाहें. ।
केवळें अशक्य आतां कथिसी 'व्यवहार हा घडावा' हें. ॥ ६२

---

१. सुख देणारा. अर्थात् नाहीं—असा भाव. २. ब्रह्मदेव. ३. वेदचतुष्टय. ४. जगास. ५. 'कसा [आणि] काय' हें विशेषण उपदेशाचें. ६. देह. ७. कसा तरी. ८. ताप+अपहा=दुःखातें दूर करणाऱ्या! ९. श्रमाला. १०. साळींद्र पक्ष्यानें. ही उपमा फारच योग्य आहे. ११. अणकुचीचें पीस. १२. यानें धारण केला. १३. उपदेश करण्यास समर्थ अशी. १४. अतसी+कुसुम+श्यामा=तागाच्या फुलाप्रमाणें कृष्ण आहे कांति ज्याची अशा! श्यामसुंदरा! १५. कारण. १६. अन्वयः—जसेचि अहिचे सर्पांचे डांस (चावे) [हा! (हाय!) म्हणविति], [तसेचि] तनूस हाडांस भेदुनि शिरले (शिरलेले) शर हा! (हाय!) म्हणविति. १७. अन्वयः—मन [स्वयें] भ्रमुनि रसनेतें (जिव्हेतें) स्वल्पींहि भाषणीं न शिरवि. मन बहकून गेल्यामुळें थोडेंसेंही बोलण्यास जिव्हा चालूं देत नाहीं—असा भाव. १८. स्फूर्ति, बुद्धि. १९. तेज. ह्या गीतींतील उपमा फार बहारीची आहे. २०. आग्नेय, नैर्ऋत्य इ० उपदिशा. २१. मा वद किमपि=कांहींही बोलूं नको. २२. अन्वयः—हे प्रभुवरा! तुज पुढें [हा] वाक्य वदतां, त्वत्तेजें महीं गडबडेल, स्तंभित होइल किंवा भलतेंचि बडबडेल. २३. शरीरा. २४. धारण करतों. २५. अन्वयः—'हा व्यवहार (उपदेश करणें) घडावा' हें आतां केवळ अशक्य कथिसी.

सांग स्वयेंचि देवा! धर्मासि असेल काय जें [1]विहित. ।
मजपरिस तूं कराया, दाईहुनि मायबाप जेंवि हित. ॥ ६३
श्रीगुरुसमक्ष [2]धर्मव्याख्या शिष्यांस [3]तों नसे उचिता; ।
स्मरणचि घडो, असे [4]जों दक्षिण रवि, देह तों न सेउ चिता.' ॥ ६४
श्रीकृष्ण म्हणे, 'भीष्मा! राजा [5]कौरवधुरंधरा! [6]उक्त ।
[7]हें सर्वज्ञास तुला [8]अतुलाखिलसद्गुणाकरा! युक्त. ॥ ६५
शुचि पुरुषरत्न सादर गुरुगेहीं जें [9]विशंक [10]रांबेल, ।
बहुमत [11]तदुक्त सर्वां, सर्वज्ञा! जेंवि शंकरा बेल. ॥ ६६
देतों प्रसन्न होउनि घे वर [12]शरघातवेदनाशमना; ।
[13]तव बोधनाश मोहू न जगाच्या, जेंवि वेदनाश, मना. ॥ ६७
[14]ग्लानि स्वल्पाहि नसो सन्मणिदीपीं तशी तुझ्या देहीं; ।
मूर्च्छा न शिरो हृदयीं, [15]असती स्त्री जेंवि साधुच्या गेहीं. ॥ ६८
[16]गंगांककल्प [17]हो [18]शरतल्प तुला [19]सुकृतसिंधुयादा! हें, ।
[20]तूं सोडावा शरजें, गरजें हर जेंवि, तेंवि या दाहें. ॥ ६९

---

१. उचित. या गीतीच्या उत्तरार्धाचें वरील ५४ व्या गीतीच्या पूर्वार्धाशीं निकट साम्य आहे. २. धर्म+व्याख्या=धर्मांचें विवरण. ३. तर. ४. तुझें स्मरण घडो [आणि] जोंपर्यंत दक्षिणायन आहे, तोंपर्यंत हा देह चितेवर न जावो. ५. कौरवश्रेष्ठा! ६. बोलणें. ७. हें दर्शकसर्वनाम. पूर्वार्धांतील 'उक्त' या नामाकडे त्याचा संबंध. ८. अतुल+अखिल+सद्गुण+आकरा=तुलनारहित जे सर्व गुण त्यांची खाण अशा हे भीष्मा! ९. बिनदिक्कत. १०. सेवेंत दिवस काढील. ११. तत्+उक्त=त्याचें बोलणें. १२. शर+घात+वेदना+शमना=बाणांच्या टोंचण्यांनी होणारें दुःख नाहींसें व्हावें म्हणून. १३. अन्वयः-जेंवि वेदनाश (चारी वेदांचें नाहींसें होणें), (तेंवि) तव बोधनाश (=तूं जो करणार आहेस त्या उपदेशाचा नाश). जगाच्या मना न मोहू (अज्ञानानें व्याप्त न करू). चारही वेद लुप्त होऊन जग अज्ञानांधकारांत पडणें असें इष्ट नाहीं, तसेंच तुझी बुद्धि नष्ट होऊनि जग अज्ञानी राहावें हें इष्ट नाहीं. अर्थात् तुझ्या उपदेशाची योग्यता वेदचतुष्टयाच्या बरोबरीची आहे व म्हणून तिचा लोप झाल्यास जग हें अज्ञानांत राहील, तेव्हां तसें न होवो—असा भाव. १४. थकवा; पक्षीं तेजोऱ्हास. १५. जारिणी. १६. गंगा+अंक+कल्प=गंगेच्या मांडीप्रमाणें. १७. होवो. १८. वाणशय्या. १९. सुकृत+सिंधु+यादा=पुण्यरूप समुद्रांतील जलचरा, पुण्यवंता! २०. अन्वयः— जेंवि गरजें (विषापासून उत्पन्न होणाऱ्या) [दाहें] हर (शंकर), तेंवि या शरजें (बाणापासून होणाऱ्या) दाहें (त्रासानें) तूं सोडावा. शंकरास जशी कालकूटविषबाधा झाली नाहीं

लागेल न क्षुधा तुज, न तृषाही भारता! [1]बुधाधारा! ।
वाणी निघेल वदनांतुनि, चंद्रांतुनि जसी सुधाधारा. ॥ ७०
कुंठित बुद्धि न होइल, जें जें त्वां [2]चिंतिजेल [3]सत्वरतें, ।
[4]स्वर्गाश्रितकामितसें समयीं सर्व स्फुरेल सत्वर तें. ॥ ७१
तूं ज्ञानचक्षु उघडुनि ईश्वरसा सर्वही पहाशील, ।
स्वाधीनमरण [5]यावत् [6]वांछा [7]तावत् सुखें रहाशील.' ॥ ७२
भीष्मीं प्रसाद होतां द्विज जयजयकार करिति हर्षोनी, ।
अमृतघनें वांचविला जाणो [8]नग [9]खेगनिवास वर्षोनी. ॥ ७३
प्रभु, भीष्म, धर्म, यांवरि केली बहु पुष्पवृष्टि [10]अंजरांनीं; ।
भरिलें [11]स्तोत्रैचतुर्विधवाद्यांच्या सर्व गगन गजरांनीं. ॥ ७४
गंधर्वांच्या [12]वृंदा न उरों दे देहभान यशगाल्या, ।
नाचत होत्या होउनि गानास [13]वैरोप्सराहि [14]वैशगा त्या. ॥ ७५
तैं धन्य आपणाला आपण मानूनि घे, वदे वसुधा, ।
'काय स्वर्ग मजपुढें? [15]सोडुनि [15]बैसेल [15]घेवदेव सुधा.' ॥ ७६
वाहुनि सुगंध शीतल [16]मंथर [17]शर्म दे वायू; ।
वाटे कवीस विफल, न घडतां [18]भीष्मोक्त धर्म, [19]देवायू. ॥ ७७
[20]गमला तेजस्वित्वें भीष्मस्तव तो स्व अस्तव नवासा, ।
जाणों जावूं लागे रवि सोडुनि लोक अस्तवनवासा. ॥ ७८

---

त्याप्रमाणें तुलाही शरशय्येची न होवो–असा भाव. द्वितीयपुरुषी कर्म असतां, योजिलेला कर्मणिप्रयोग चिंत्य आहे.

१. बुध+आधारा=ज्ञात्यांचा आधार अशा! २. हा कर्मकर्तरिप्रयोग आहे. (पद्य. गीति १४). ३. सत्याचे ठायीं बुद्धि आहे ज्याची अशा त्वां. ४. स्वर्ग+आश्रित+कामित+सें=स्वर्गी राहणाऱ्यांच्या इच्छिताप्रमाणें. ५. जोंपर्यंत. ६. इच्छा. ७. तोंपर्यंत. ८. वृक्ष. ९. पक्षी राहाण्याचें स्थान असा. हा 'नग'शब्दाचा उद्देश. १०. देवांनीं. ११. स्तुति व चार प्रकारचीं वाद्यें यांच्या. वाद्याचे प्रकार चारः–(१) कातड्यानें मढविलेलीं. उ० मृदंग. (२) तारा लाविलेलीं. उ० वीणा. (३) धातूंचीं. उ० टाळ, झांज. (४) तोंडानें वाजविणेचीं. उ० सनई, पावा. १२. समुदायास. १३. श्रेष्ठ अप्सरा. १४. लुब्ध. १५. सर्व व्यवहार सोडून उद्विग्न होऊन बसेल. सर्वसंग्रहाचा पूर्वार्धात 'मानुनि निघे' असा पाठ आहे. १६. मंद. १७. सुख. १८. भीष्मानें सांगितलेला. १९. देवाचें आयुष्य. भीष्मानें सांगितल्याप्रमाणें धर्माचरण न झाल्यास, देवाचेंही आयुष्य फुकट गेलें असें सुज्ञास वाटे. २०. अन्वयः–तो भीष्मस्तव तेजस्वित्वें [रविला] स्व नवासा (=अपरिचित असा व म्हणून असह्य) अस्तव–(=निंदा) गमला. [म्हणून]

[1]दिवसविरामीं ते मुनि म्हणति श्रीकृष्णभीष्मधर्मातें, ।
'येतों सकलहि धर्मश्रवणें व्हाया सुपात्र [2]शेर्मातें.' ॥ ७९

[3]ब्रैह्मण्य देव, पांडव, सात्यकि, संजय, युयुत्सु [4]बोळविती ।
त्यां सुमुनीतें; आधीं मस्तक तत्पदरजांत लोळविती. ॥ ८०

विनयें पुसोनि उजवे घालुनि तैं त्या [5]सुरापगातनया, ।
[6]श्रीकृष्ण निघे पांडवसह, त्याच्या तो दुराप गात नया. ॥ ८१

जाउनि पुरींत निजले ते [7]पुरुषप्रवर आपुल्या सद्मीं, ।
येऊनि सत्यलोकाहूनि, जसे हंस [8]मानसीं [9]पद्मीं. ॥ ८२

जपविप्रपूजनादि प्रभुवर उरकोनि घे [10]प्रथमयामीं, ।
रथ आणवी, म्हणे जो 'शिल्पाचा शिकविता [11]पंथ [12]मया मीं.' ॥ ८३

भीष्मयशें धवलाया [13]जगदाद्यविशुद्धसत्वराशि कवी ।
प्रेषुनियां सात्यकितें त्वरिताही नृपतिस त्वरा शिकवी. ॥ ८४

निघतां धर्म नृप म्हणे, 'विजया! बहु आजि हा जन कशाला? ।
[14]साधूचितप्रवेशा ती रणभू जेंवि बा! [15]जनकशाला. ॥ ८५

कथिल [16]कुलकमलरवि कविवर, परमरहस्य आजि जें शुचि, तें; ।
उचितें जनेंचि सादर सेवावें वाढवूनियां रुचितें. ॥ ८६

बहु हित व्हाया तुमची शुद्ध मनोवृत्ति आजपासून. ।

जाणों रवि लोक सोडुनि अस्त–वनवासा (अस्तपर्वतावर अरण्यवासार्थ) जावूं लागे, अस्तमान-वेळा झाली–असा भाव.

१. दिवसाच्या समाप्तिसमयीं. २. कल्याणातें. ३. ब्राह्मणाविषयीं आदर दाखविणारा. हें देवाचें (कृष्णाचें) विशेषण. ४. (शिष्टाचारानुरूप चार पावलें ऋषींबरोबर जाऊन निरोप देते झाले. ५. देवनदी जी भागीरथी तिच्या पुत्राला (भीष्माला). ६. अन्वयः–तो दुराप (मिळविण्यास फार कठीण) श्रीकृष्ण त्याच्या (भीष्माचार्यांच्या) नया गात (वर्णन करीत) पांडवांसह निघे. ७. पुरुषश्रेष्ठ. ८. मानससरोवरांत. ९. कमलांमध्यें. १०. पहिल्या प्रहरीं. ११. मार्ग. १२. मयासुराला. उत्तरार्धान्वयः–(प्रभुवर) रथ आणवी, जो (रथ) म्हणे, 'शिल्पाचा पथ (=शिल्पकलेचा मार्ग) मया (=दानवांच्या शिल्पकाराला) शिकविता (=शिकविणारा) मी. त्या रथाच्या रचनेंत इतकें कांहीं अजब कसब होतें, कीं तें कमवायाला मयासुराला सुद्धां त्या रथाचा अभ्यासच करावा लागला असता–हा भाव. १३. जगत्+आद्य+विशुद्ध+सत्व+राशि=जगतांतील श्रेष्ठ जें अविकृतसत्व त्याचा समुदाय. श्रेष्ठशुद्धसत्वमय असा. १४. साधूंनीं प्रवेश करण्यास योग्य अशा. १५. जनकाचें सभागृह. १६. या भरतकुलरूप कमलाचा रवि.

[1]म्हणु कर्णातें, कुलजा जेंवि म्हणे करुनि 'आ' जपा सून. ॥ ८७

[2]कथिलें करुनि, [3]किरीटी 'सिद्ध स्यंदन असे' असें कळवी, ।
धर्म निघे सात्यकिसह बसुनि रथीं, प्रभुहि [4]भानुभा मळवी. ॥ ८८

मानससरोवराप्रति हंस जसे पावले ऋषि तसेच, ।
गांगेयाप्रति पांडव सजनार्दन धांवले [5]तृषितसेच. ॥ ८९

[6]नमुनि मुनिजना, वेष्टुनि बसले उगलेचि पांडुसुत राजा, ।
तोहि प्रभु होते भववैतरणी चिंतितांचि सुतरा ज्या. ॥ ९०

नारद म्हणे, 'पुसा हो! भीष्म प्रभु सर्व धर्म बोधील? ।
[7]रविमागें तम नाशुनि कोण ब्रह्मांडगर्भ शोधील?' ॥ ९१

अन्योन्य 'पुसा' म्हणतां सर्वांच्याही मुखास आला [8]न, ।
जाणों ते गजचि, तयां झालें गुरुभीष्मतेज [9]आलान. ॥ ९२

धर्म म्हणे, 'मी भ्यालों तूंचि [10]विभो! [11]भरतनायका पूस, ।
वन्हिपुढें, वायुपुढें धृति धरुनि टिकेल काय कापूस? ॥ ९३

भीष्माहि हर्षवाया, वदवाया तूंचि एक बा! [12]विदू; ।
सर्व ग्रहांत एकचि आल्हादप्रद पयोधिला इंदू.' ॥ ९४

[13]जेंवि हरें, केला ज्या योगींद्रें विमद मत्त मार जनीं, ।
त्या प्रभु म्हणे, 'सुखें त्वां क्रमिली कीं राजसत्तमा! रजनी?॥ ९५

ज्ञान प्रकाशलें कीं हृदयांत [14]नभोंगणांत जेंवि रवी, ।
वदतां [15]वरा सभेंत श्रोत्यांच्या संशयासि जें [16]विरवी? ॥ ९६

---

१. अन्वयः– जेंवि कुलजा (उत्तम कुलांत जन्मलेली) सून, बहु हित व्हाया कर्णातें (कानातें) आ करुनि (उघडे राहून, लक्ष देऊन) [वडील माणसांच्या उपदेशास] जपा म्हणे, तेंवि आजपासून तुमची शुद्ध मनोवृत्ति [कर्णातें] म्हणु (म्हणो). भीष्मवाक्य फार काळजीपूर्वक ऐका–असा भाव. २. सांगितलेलें काम. ३. अर्जुन. ४. सूर्यतेज. ५. तहानेल्याप्रमाणें. ६. अन्वयः–मुनिजना नमुनि [आणि] राजा वेष्टुनि पांडुसुत उगलेचि (स्तब्ध) बसले; ज्या चिंतितांचि भववैतरणी (संसाररूप वैतरणीनदी) सुतरा (तरून जाण्यास सुलभ) होते, तोहि प्रभु [उगला बैसला]. राजा=भीष्म राजास. ७. सूर्याच्या पश्चात्. ८. नकार. ९. अंदु (गजबंधन). भीष्माचार्यांच्या महातेजापुढें कोणासहि बोलवेना–असा भाव. १०. सर्वव्यापी भगवंता! ११. भरतकुलश्रेष्ठास, भीष्मास. १२. ज्ञाता. १३. अन्वयः–जेंवि हरें (शंकरानें) [तेंवि] ज्या योगींद्रें (ज्या योगिश्रेष्ठानें) जनीं मत्त (गर्वानें चढलेला) मार (मदन) विमद (गतगर्व) केला, त्या (भीष्मातें) प्रभु म्हणे, 'राजसत्तमा! त्वां सुखें रजनी क्रमिली कीं?' १४. आकाशरूप अंगणांत. १५. श्रेष्ठ. ह्याचा संबंध 'सभे'कडे. १६. नाहींसें करी.

स्वस्थ असिसि कीं राजा! ग्लानि नसे कीं तुझ्या मनीं कांहीं? ।
शल्यांनीं न दिल्हा कीं मोह परांच्या जसा अनीकांहीं[1]? ॥ ९७
आर्या! महाव्रता! तूं विकल न झालासि वेदनांहीं[2] कीं? ।
म्यां प्रियसख गोप तसे मोकलिले[3] त्वांहि वेद नाहीं कीं?' ॥ ९८
भीष्म म्हणे, 'गोविंदा! गेल्या सोडूनि वेदना मातें; ।
झालों स्वस्थ; खरें[4] जें 'अमृत' तुझ्या म्हणति वेद नामातें. ॥ ९९
कश्मलजडत्व[5] गेलें, आलें सर्वज्ञपण तुझ्याच वरें; ।
करुनि प्रसाद लाविशि रंकावरिही उडावया चवरें[6]. ॥ १००
तुजवांचुनि कोण असे अन्य त्रिजगीं गुरुत्वसुपदेश[7]? ।
करुनि दया, न करिशि कां या धर्मासि स्वयेंचि उपदेश?' ॥ १०१
कृष्ण म्हणे, 'ब्रह्मांडीं माझी तों कीर्ति कोंदली[8] आहे. ।
धावें[9] तुझ्याहि सुयशें बसले सत्कर्ण करुनि जे 'आ' हे. ॥ १०२
शीतांशु चंद्र म्हणतां, विस्मय जैसा मनीं नसे कांहीं, ।
तैसाचि यशस्वित्वें विस्मय माझ्याहि भारता! नाहीं. ॥ १०३
क्षीरधिला, चंद्राला, त्याही तुहिनाभिधा[10] अंगा[11] धवलें ।
स्वयशें लुप्त करावें, बोधुनि धर्मा तुवां अगाधबळें[12]. ॥ १०४
होइल आकल्प[13] तुझ्या बोधासि, जसाचि मान वेदास, ।
तुज मानवेल कविजन, मज माझा जेंवि मानवे[14] दास. ॥ १०५
तुजे[15] सुमति दिल्ही, धाया वाढवुनि तुला यशा असीमा गा! ।
हे जसि अर्थिजनातें, न म्हणेलचि सुरभिही असी 'मागा.' ॥ १०६
तूं वृद्ध शुद्ध सद्गुण उपदेश करावयासि योग्य नृपा! ।
सांग प्रसन्न होउनि, जेंवि पिता हित कथी करूनि कृपा.' ॥ १०७

---

१. सैन्यांनीं. २. तीव्रदुःखामुळें. ३. निराश्रय सोडून दिले. ४. अन्वयः—तुझ्या नामातें वेद जें 'अमृत' म्हणती तें खरें. ५. मोहामुळें किंवा मूर्च्छेमुळें आलेलें जडत्व. ६. चामरें. अंगावर चामरें ढळणें, हें एक राजचिन्ह आहे. ७. गुरुत्व+सुपद+ईश=गुरुत्वाच्या उत्तम पदाचा स्वामी. ८. गच्च भरलेली आहे. ९. तृप्त व्हावें. १०. तुहिन+अभिधा=हिम असें नांव आहे ज्याला अशा. ११. पर्वता. (हिमालयास.) १२. अपार आहे शक्ति ज्याची अशा त्वां. १३. जगाच्या संहारापर्यंत. १४. भाळतो, मोहित होऊन मान देतो. १५. अन्वयः—गा! तुला वाढवुनि (=तुझी योग्यता अधिक करून) असीमा यशा धाया, तुज सुमति दिल्ही; हे अर्थिजनातें (=याचकांना) असी 'मागा' (=मागा, मी देण्यास तयार आहें) म्हणे, असी सुरभिही (कामधेनु सुद्धां) ['मागा'] न म्हणेलचि. ही सुरभीपेक्षांही उदार आहे—हा भाव.

भीष्म म्हणे, 'जरि म्हणसी निजकार्य करावयासि [1]योजीन, ।
तरि हा तव प्रसादें [2]वेणु[3]ध्रुवसुपदवीस [4]यो [5]जीन. ॥ १०८
देवद्विजगुरुभक्त स्वच्छाखिलगुणसमुद्र हा [6]धर्म, ।
[7]जे काय पुसायाचे, तेते मजला पुसो स्वयें धर्म.' ॥ १०९
[8]श्रीकांत म्हणे, 'राजा! बहुलोकांचें करूनियां [9]कंदन, ।
[10]अपवादास्तव लाजे धर्म तुला दाखवावया वदन. ॥ ११०
जाणोनि पाप, नेत्रें झांकुनि, प्याले यथेष्ट [11]हाला जे, ।
ते शिष्टाचारातें लाजति जैसे, तसाचि [12]हा लाजे. ॥ १११
केले [13]अपकार रणीं अनुचित तुझियाहि या वयाला जे, ।
गुरुभक्त मान्य मारुनि, धर्म तुजसमोर यावया लाजे.' ॥ ११२
भीष्म म्हणे, 'विप्रांचा दानतपोध्ययन मुख्य हा धर्म, ।
[14]यावज्जीवानुष्ठित देतो बहु [15]इहपरत्र यश, [16]शर्म. ॥ ११३
मुख्य तसाचि क्षत्रियधर्महि युद्धांत देहपातन हा, ।
[17]म्हणुनि म्हणावें वत्सा! त्वां, बहु मानूनि लोकघात, न 'हा!' ॥ ११४
[18]हो गुरु, पिता, पितामह, पुत्र, सखा, बंधु, सोयरा, ज्याचा ।
[19]व्यवहार दुष्ट, तद्वध मुख्यचि हा धर्म होय राजाचा. ॥ ११५
[20]शांतारिरक्तगंधें जो क्षत्रिय मत्त मानला, जावें ।
भय, यावें जवळ तुवां वत्सा! कुरुसत्तमा! न लाजावें.' ॥ ११६

---

१. लावीन. २. मुरली. ३. उत्तानपाद राजाचा मुलगा. ४. येवो. ५. वृद्ध. अन्वयः–हा जीन तव प्रसादें वेणुध्रुवसुपदवीस यो. कृष्णा! तुझा प्रसाद घडल्यामुळें गोकुळांत मुरली जसे सुस्वर काढूं लागली व तुझ्या शंखाचा स्पर्श गालास झाल्यामुळें बालवयी ध्रुव सुद्धां जसा भगवत्स्तुति गाऊं शकला, तद्वत् मीही तुझ्याच प्रसादानें धर्मबोधाचें कार्य उरकीन–हा भाव. ६. धर्मराज. ७.अन्वय–जे काय धर्म पुसायाचे, ते ते हा धर्म मजला स्वयें पुसो. ८.लक्ष्मीपति. ९. संहार; नाश. १०. तूं दोष देशील म्हणून. ११. मद्य. १२. हा=धर्मराज. ह्या गीतींत सामाजिक आचारांचें केवढें प्राबल्य आहे, तें दाखविलें आहे. १३. अपराध; तुझ्या वयाकडे तरी धर्मानें पहावयाचें पण तसेंही केलें नाहीं. १४. यावत्+जीव+अनुष्ठित=जोंपर्यंत जीव आहे तोंपर्यंत आचरलेला. १५. इहपरलोकीं. १६. कल्याण. १७. अन्वयः–म्हणुनि (यास्तव) वत्सा! त्वां लोकघात (लोकांचा झालेला संहार) बहु मानूनि (मनास लाऊन घेऊन) हा! (हाय!) न म्हणावें. १८. असो. १९. अर्थ. २०. अन्वयः–जो क्षत्रिय शांतारिरक्तगंधें (मारलेल्या शत्रूच्या रक्ताच्या उग्रवासानें) मत्त [होतो,] [तो] मानला (मानवला.) (त्याचा कांहीं मला राग येणार नाहीं, कारण तें कृत्य क्षात्रकर्माला उचितच आहे.) [तुझें] भय जावें; कुरुसत्तमा वत्सा! तुवां जवळ यावें, न लाजावें. पाठांतरः– 'शांतासि रक्तगंधें.'

[1]भक्तांचि प्रीति बहु प्रभुला, जीवासि जेंवि देहाची. ॥ ३२
[2]शतमुख एक महासुर [3]करि शतवर्षें [3]स्वमांसहोमातें, ।
तो [4]उग्रप्रकृति म्हणे '[5]भगवान् उग्र प्रसन्न हो [6]मातें.' ॥ ३३

होय प्रसन्न ईश्वर, 'वर माग' म्हणे तयासि, तो याची, ।
'दे योगशक्ति, जीणें [7]ग्रहघनभूम्यादिसृष्टि [8]होयाची. ॥ ३४

[9]दे ब्रह्मज्ञानोद्भव बळ शाश्वत' हें अगा! रमागेहा! ।
ऐसें प्रभुला, होउनि वर प्रसादा अगार, मागे हा. ॥ ३५

[10]ऋतुहि शतत्रयवर्षें [11]सूत्रात्मध्यान धरुनियां भजला, ।
तो जाउनि शरण म्हणे 'शंभो दशशत सुपुत्र दे मजला.' ॥ ३६

[12]भेटुनि 'वर माग' असें, प्रथम अभय दे, वदे वच ऋतुला, ।
पुत्रसहस्र सुदर्शन दे, जैसें देवदेव चक्र तुला. ॥ ३७

[13]जेणें मुक्त करावे नत, मदवायसलुलाय शापावे, ।
तो याज्ञवल्क्य मुनिवर शिवभजनें [14]गततुला यश पावे. ॥ ३८
व्यासहि महेश्वरातें आराधुनि पावला यश [14]अतुला, ।
[15]कथितों भक्तिप्रेमें, बा! विदित रहस्य काय गा! न तुला? ॥ ३९

---

१. या गीत्यर्थांत ईश्वराचें भक्तांवर किती अलोट प्रेम असतें, तें एकाच उपमेनें पण पूर्णपणें व्यक्तलेलें आहे. २. नामविशेष. ३. आपल्या आंगाच्या मांसानें यज्ञ करता झाला. ४. तामस-वृत्ति आहे ज्याची असा. ५. भगवान् शंकर. उग्र=शंकर. ६. मजला. हो=होवो. कदाचित् येथें 'भगवन्नुग्र! प्रसन्न हो मातें' ['=हे भगवंता! शंकरा! मला प्रसन्न हो.] असा मूळपाठ असावा. ७. ग्रह (=सूर्यचंद्रादि), घन (=मेघ), पृथ्वी वगैरे, वस्तुजात. ८. व्हावयाची, सहज उत्पन्न करितां येईल. ९. अन्वयः—'ब्रह्मज्ञानोद्भव (ब्रह्मज्ञानापासून उत्पन्न होणारें) शाश्वत बळ [मज] दे,' हें ऐसें, अगा! रमागेहा! (=कृष्णा!), हा (=शतमुख) वरप्रसादा (वराच्या अनुग्रहाला, वर-दानाला) अगार (स्थान) होऊनि प्रभुला (शंकरातें) मागे. १०. नामविशेष दैत्य. ११. सूत्रात्मन्+ध्यान=आत्मविचार. ध्यान धरणें=एकाग्रतेनें विचार करणें. सूत्रात्मन्=आत्मा. १२. अन्वय—ऋतुला प्रथम भेटुनि अभय दे [व] 'वर माग' असें वच वदे. देवदेव (महादेव) जैसें तुला सुदर्शन चक्र दे [मागें गीति २८.] [तैसें ऋतुला] सुदर्शन (सुंदर) पुत्रसहस्र दे. १३. अन्वयार्थः—जेणें नत (शरण आलेले) [जन] मुक्त करावे, [व] मदवायसलुलाय (=कावळ्याप्रमाणें किंवा टोणग्याप्रमाणें माजलेले दुर्जन) शापावे, तो याज्ञवल्क्य इ०. १४. ज्याला तुलना नाहीं असा; अलौकिक, अप्रतिम. १५. अन्वयः—बा! भक्तिप्रेमें (भक्तीच्या आनंदभरांत) कथितों; गा (अगा)! तुल (श्रीकृष्णाला) काय (=कोणतें) रहस्य (गुह्य) विदित न? (माहीत नाहीं?) अर्थात् तुला सर्व माहीत आहे पण मी भक्तीच्या आनंदभरांत सांगतों, असा भाव.

अवमानिले बळमदें पूर्वी मुनि वालखिल्य[1] जे शक्रें, ।
ते वदले 'हा शंभो! केला अमृतोपहास[2] कीं तक्रें.' ॥ ४०
कृष्णा! प्रमाण, ज्यांच्या अल्पत्वें, होय आंगठा कायां[3]; ।
ते[4] प्रभुचरणासि करुनि देती पदपीठ आंग ठाकाया. ॥ ४१
समजुनि[5] सुधा शिवाच्या, इतरांच्या फार सपक रीतीतें, ।
काय कथूं, ते देहें अल्प परि अनल्प तप करीती, तें? ॥ ४२
दे[6] अमृतहरखगेंद्रोत्पादनवर देव वालखिल्यांतें, ।
'कर्मासि' म्हणे, 'भज कां जरि अंतर देववाल खिल्यांतें?' ॥ ४३
पूर्वी महेश्वराचीं रोषें होतांचि लोचनें कैलिलें[7], ।
सर्वत्रही विनष्टें झालीं तत्काळ सर्वही सलिलें. ॥ ४४
सप्तकपाळें[8] यजितां देवांहीं सुप्रसन्न शिव होय, ।
तो यज्ञभाग भोगुनि मग सर्वत्र प्रवर्तवी[9] तोय. ॥ ४५

---

१. **वालखिल्यः**–या ऋषींचे देह आंगठ्याएवढेच उंच होते. यांची संख्या ६०,००० असून, ते सर्व ब्रह्मदेवाच्या शरीरापासून उत्पन्न झाले. ते सूर्याच्या रथाला वेढून असतात असें रघुवंशांत वर्णन आहे (रघुवंश, सर्ग १५ श्लोक १०). यांचा इंद्रानें अपमान केल्याची कथा अशी आहे:–'सौती म्हणे 'हो! जी! ऐका। कश्यप सृष्टीचिया जनका । संततिकामनेस्तव देखा । याग करितां पुत्रेष्टी,॥ शक्त्यनुसारसामग्रीसी । साह्य झालें देव ऋषी। शक्रें पर्वततुल्य राशी । समिधांचिया आणिल्या. ॥ देखोनी अंगुष्ठप्राय ऋषी । साठी सहस्र वैखानसी । वितस्तिमात्र एक सायासीं । पलाशसमिधा तोडिली. ॥ खांदीं वाहून समस्तीं । शनैः शनैः आणितां पथीं । गोष्पदप्राय अपांपती । तैसा पुढें भासला. ॥ पाय निसरोनी अवचितें । अवघे पडले त्या आंतौतें । गुचकळ्या खात एकमेकांतें । कवळूनियां झोंबती. ॥ हें देखोनि तये काळीं । इंद्र हासे पिटोनि टाळी । 'पहा चोज गोष्पदजळीं । ब्राह्मण कैसे बुडाले! ॥ ऐसें जीव जे देखती । त्यांसी हासावयाचे अर्थीं । ब्रह्मयानें निर्मिलें निश्चितीं । विनोदार्थ जगातें.' ॥ (मुक्तेश्वरकृत आदिपर्व, ६।१५-२१). २. अमृताची थट्टा. ३. शरीराला. ४. अन्वयः–ते प्रभुचरणासि (शिवाच्या पायास) ठाकाया (टेंकण्यास्तव) आंग (स्वदेह) पादपीठ (पाय ठेवण्याची तिवई वगैरे) करुनि देती. ५. अन्वयः–शिवाच्या रीतीनें सुधा (अमृत) समजुनि [आणि] इतरांच्या (इतर देवांच्या) रीतीनें सपक (स्वादरहित, बेचव) समजुनि, ते, (=वालखिल्य) देहें अल्प परि (परंतु) जें अनल्प (मोठें) तप करिती, तें काय कथूं? (=तें किती वर्णूं?). ६. सार्थान्वयः–वालखिल्यांतें अमृतहरखगेंद्रोत्पादनवर (अमृत हरण करणारा गरुड उत्पन्न करण्याचा वर) देव (शंकर) दे, [व] म्हणे जरि खिल्यांतें (=निष्फळ गोष्टींना, व्यर्थ व्यापारांना) अंतर देववाल (=दूर करूं इच्छीत असाल) [तरि] कर्मासि (=यज्ञयागादि कर्मकांडास) कां भज (=कशाला भजावें)? [मला नुसतें शरण आल्यानेंच, माझी सेवा केल्यानेंच सर्व इच्छा पूर्ण होतील, हा भाव.] पाठभेदः–'भजकां.' ७. मिश्रित, युक्त. ८. सप्तकपालनामक यज्ञानें. ९. निर्माण करता झाला.

शौरे[1]! अत्रिवरि भरे अनुसूया ब्रह्मवादिनी[2] रागें, ।
जें न कधींहि घडावें, घडलें दैवें[3] तसेंहि तें मागें. ॥ ४६
दुरितक्षयार्थ[4] सत्कवि त्या साध्वीचें पवित्र यश गाती, ।
क्षोभोनि म्हणे 'यांवरि[5] होइन न कदापि अत्रिवशगा[6]' ती. ॥ ४७
त्यजिती साध्वी कां, जरि न[7] त्यजितां श्रीमदत्रि नयनातें? ।
जाय[8] शरण, कीं नाहीं लवहि तपःश्रीमद त्रिनयनातें. ॥ ४८
निजलि शतत्रयवर्षें[9] रचुनि करें काष्ठकीलशयनातें[10], ।
करि सुप्रसन्न शर्वा[11] तप तीचें पुंडरीकनयना[12]! तें. ॥ ४९
अनुसूयेतें देव स्मित करुनि म्हणे 'पतिव्रते! रुचलें[13], ।
आलिस मज त्रिलोकी पतिस शरण, हें भलें तुला सुचलें. ॥ ५०
होईल[14] तुज पुत्र, वदे हा मिथ्या न वच रुद्र; वापी हो ।
अमृताची कीर्ति तुझी; स्मरुनि मला नवचरुद्रवा पी हो! ॥ ५१
विख्यात तुझ्या नामें होइल तव पुत्र मान्य विश्वास[15]; ।
अनुसूय त्यासि म्हणतिल सुकवि, असोंदे मदुक्ति विश्वास[16].' ॥ ५२
शाकल्य[17] मनोयज्ञें[18] नववर्षशतें[19] शिवासि आराधी, ।
'हो ग्रंथकार' त्यातें देव म्हणे, देउनि स्वंसारा[20] धी. ॥ ५३
'लोकत्रयांत[21] तव यश अक्षय हो, पुत्र सूत्रकर्ता हो,' ।
झाला प्रसन्न ऐसा शाकल्यास त्रिलोकभर्ता[22] हो! ॥ ५४

---

१. हे श्रीकृष्णा! २. वेदान्तमतानुयायी. ३. दुर्दैवानें. ४. पापक्षालनार्थ. ५. ह्यापुढें. ६. अत्रिऋषींची अंकित. ७. नीतीचें उल्लंघन न करितां. ८. अन्वयः–[ती अनुसूया अत्रीला सोडून मग] त्रिनयनातें (शंकरातें) शरण जाय; कीं, (कारण) शंकराचे ठायीं [उन्मत्त अत्री-प्रमाणें] तपःश्रीमदलवही नाहीं. ९. तीनशें वर्षें. १०. लांकडी खिळ्यांच्या किंवा सुळ्यांच्या शय्येला. ११. शंकरातें. १२. पद्मनेत्रा श्रीकृष्णा! १३. मानवलें. १४. अन्वयः–तुज पुत्र होईल; हा रुद्र मिथ्यावच न वदे; [तुझी] कीर्ति अमृताची वापी हो (होवो); मला स्मरुनि नव–चरु–द्रवा (नूतन पुरोडाशाच्या रसातें) पीहो (पी बरें). 'पी हो' ह्या प्रयोगावरून विशेष कळकळ व्यक्त होते. १५. जगास. १६. भरंवसा. १७. एक ब्रह्मर्षि होता. हा नउशें वर्षें शिवाराधन करून मोठा ग्रंथकार व सूत्रकार झाला. १८. मनोभावानें अर्थात् एकाग्र भक्तिमार्गानें. १९. नउशें वर्षें. २०. आपला अंश आहे जीमध्यें अशी. हें 'धी' (बुद्धि) ह्या शब्दाचें विशेषण. २१. अन्वयः–तव यश लोकत्रयांत अक्षय हो, [आणि] तव पुत्र सूत्रकर्ता हो (=होवो). टीपः–सूत्रशब्दाची व्याख्याः–'स्वल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखम् । अस्तोममनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ॥' याचा मराठींत मतलबः–जें स्वल्पाक्षर, ज्याचा भाव असे स्पष्ट, अर्थ बहु खोल, । व्यापक जें, निर्दूषण, वाग्डंबरहीन, '**सूत्र**' तें बोल. ॥ २२. जगत्पति.

करि षट्[1]सहस्र वर्षें तप, उग्रा [2]प्रभुसि [3]भाटसा वर्णी, ।
[4]तो ग्रंथकृदजरामर केला थापटुनि पाठ सावर्णी. ॥ ५५
[5]वाराणसींत आहुति विधिनें अग्नींत दे [6]वराज्याच्या, ।
[7]झाला शिवप्रसादें शक्र पदा योग्य देवराज्याच्या. ॥ ५६
तो जाणे [8]सार किमपि शिवभजनाहूनि [9]आन नारद न, ।
ज्याचे गुण शोभविती [10]सद्वृंदा, जेंवि आनना [11]रदन. ॥ ५७
न [12]विचिंतुनि दाराधन, आराधन शंभुचें करी नमुनी; ।
होय [13]कृपास्पद होउनि [14]चरणार्पितवाङ्मनःशरीर मुनी. ॥ ५८
श्रीशंभु म्हणे 'वत्सा! लोकीं झालासि नारदा! धन्य, ।
त्वत्सम न होइल जन ज्ञानें, तेजें, तपें, यशें अन्य. ॥ ५९
[15]भक्तिसती न करिल, तुज सदना सोडुनि, बहिः [16]पदन्यास; ।
प्रिय मानुनि, न भजो तव मति, जसि न भजे उमा [17]मदन्यास. ॥ ६०
विश्वगुरुत्वाचा म्यां दिधला अधिकार तुज [18]अनन्यास, ।
[19]समुचित होय वदान्या परमवदान्यालयीं धनन्यास. ॥ ६१
वाजउनि मधुर वीणावेणुमृदंगादि सर्व वाद्यांतें, ।

---

१. सहा हजार वर्षें. २. महादेवास. ३. भाटाप्रमाणें. भाट हा राजे वगैरे थोरांची स्तुती करणाऱ्या लोकांचा एक वर्ग आहे. ह्या वर्गाची बोलण्याच्या व वर्णन करण्याच्या कामीं इतकी प्रसिद्धि आहे कीं मराठी भाषेंत 'भाटासारखा बोलतो' अशी म्हण रूढ आहे. ४. अन्वयः—तो सावर्णी (नामविशेष—मनु] [शंकरांनीं] पाठ थापटुनी ग्रंथकृदजरामर (=ग्रंथकार व चिरंजीव) केला. ५. वरुणा व असी ह्या नद्यांच्या संगमावर असणारें क्षेत्र; हेंच काशीपुरीचें मूळ ठिकाण. ६. साजुक तुपाच्या. ७. अन्वयः—शिवप्रसादें शक्र (=इंद्र) देवराज्याच्या पदा योग्य झाला. ८. खरें, उत्तम. ९. दुसरें. १०. साधुसमुदायास. ११. दांत. १२. मनांत धरून, इच्छून. १३. कृपा+आस्पद=कृपेचें स्थान, कृपापात्र. १४. (शंकराच्या) चरणाच्या ठायीं समर्पिलीं आहेत वाचा, मन आणि शरीर ज्यानें असा. १५. भक्ति हीच कोणी साध्वी स्त्री. १६. पाय ठेवणें. पाऊल टाकणें. तुज सदना सोडुनी= त्वद्रूपी घरास सोडून, तूं हेंच कोणी घर त्याला सोडून. १७. माझ्याहून दुसऱ्यास. अन्वयः—मदन्यास प्रिय मानुनि जसी उमा न भजे, [तसि] तव मति न भजो. १८. नाहीं अन्य (दुसरा, मज शंकराहून इतर) ज्याला, त्यास. अर्थात् मद्व्यतिरिक्त भक्तिस्थान ज्याला नाहीं, अशा नारदास. १९. अन्वयः—वदान्या (=उदार मनुष्याला) परमवदान्यालयीं (=आपल्याहून अतिशय उदार अशा मनुष्याच्या घरीं) धनन्यास (=द्रव्याची ठेव ठेवणें) समुचित (=यथायोग्य) होय. हे नारदा! देण्याची वासना आपल्याहूनही ज्याला अधिक आहे अशा गृहस्थाच्या घरीं ठेव ठेवणें हेंच उदार पुरुषाला योग्य. ह्या व्यवहारास अनुसरून, लोकांस सदुपदेश करून तारण्याची तुझी माझ्याहूनही अधिक उत्कंठा पाहून अवघ्या जगाच्या गुरुस्थानीं तुझी योजना मीं केली, हें माझें करणें योग्यच झालें, असा भाव.

प्रेमें सुस्वर गाउनि, डोलविशिल याहि[1] विष्टपाद्यातें.' ॥ ६२
वर्णावें एकमुखें म्यां प्रभुयश किति, कसें रमेशा तें ? ।
ऐक, सदा मन्मानस भगवद्भजनीं जसें रमे शातें[2]. ॥ ६३

---

## अध्याय दुसरा.

मी व्याघ्रपाद[3]मुनिचा सुत, माझा बंधु धाकटा सौम्य[4], ।
उपमन्यु नाम माझें, त्याचें अभिधान[5] माधवा! धौम्य. ॥ १
कथितों सविस्तर, प्रभु[6] तारी मज परममुग्ध भक्ता, तें. ।
पाहें बाळक[7] मी ऋषिशिशुभक्षित[8] रम्य दुग्धभक्तातें. ॥ २
मातेसि म्हणें 'तैसें दुग्धौदन[9] मज यथेष्ट[10] दे खाया' ।
बहुदुःखभरें[11] उघडुनि दृष्टि न शकली मदास्य देखाया. ॥ ३
मग माझी ती माता पिष्ट जळीं कालवूनि तें कढवी, ।
ठकवी किति दिवस[12] असें, दारिद्र्यचि[13] कपट तीस तें पढवी. ॥ ४
[14]पोषिलि होती चुंबुनि जी शांतिसुरभि तदूधभा तातें ।
शोषलि, दुःखें मायचि, तैशा वाढून दूधभातातें. ॥ ५

---

१. याहि विष्टपाद्यातें=सर्व जगाचें आदिकारण जो मी शंकर, त्या ह्या मलाही. २. सुखानें. शात=सुख. पूर्वार्ध–अर्थसादृश्य–'जगदंबेचें एकानन कवि वर्णील काय सोहाळे ? ॥' (मोरोपंतकृत विनायकमाहात्म्य २।८.) ३. एक वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि. ४. शांत स्वभावाचा. ५. नांव. ६. शंकर. मुग्ध=मूढ. ७. लहान वयाचा असा मी, लहानपणीं मी. ८. ऋषिपुत्रानें भक्षिलेल्या सुंदर दूधभातातें. ९. दूधभात. १०. पोटभर. ११. सार्थान्वयः–बहुदुःखभरें (अत्यंत दुःखावेगामुळें, अतिशय दुःख होऊन) दृष्टि उघडुनि मदास्य (मत्+आस्य=माझें मुख) देखाया न शकली. १२. बहुत दिवसपर्यंत. १३. अन्वयः–दारिद्र्यचि तें कपट तीस [स्वभावतः निष्कपट अशा माझ्या आईस] पढवी (शिकवी). १४. सार्थान्वयः–तैशा दूधभातातें वाढुनि, जी शांतिसुरभि (=शांतिरूप कामधेनु) पोषिली होती, तदूधभा (=तिच्या ओटींतील तेज, ओटींतील तेजस्वी दूध) चुंबुनी तातें शोषिली (=सुकी, रिती केली) [व] दुःखें मायचि शोषिली (=रक्तहीन, फिकट व अशक्त केली). दारिद्र्यामुळें ती माझ्याबरोबर चाललेली फसवणूक पाहून, माझ्या बापाची शांति मोठ्याच कसोटीला लागली व आई तर दुःखानें करपलीच, हा भाव. येथें संकटकाळीं पुरुष कशीबशी तरी शांति संभाळतात. पण स्त्रिया होरपळूनच निघतात हें दर्शविलें आहे. तसेंच पित्यापेक्षां मातेच्या अंगीं अधिक कोमलपण व कमी धीर असतो, हेंही सुचविलें आहे. ऊधन्=ओटी.

[1]झांकी जी दुग्धकपट, बा! करि उघडेंहि तीच ममता तें; ।
ज्ञातिकुळीं यज्ञातें जातां, नेलें मलाहि मम तातें. ॥ ६
[2]घडलें तेथें कृष्णा! दिव्यसुरभिदुग्धपान; [3]रस मजला ।
[4]समजे सत्यानृत, गुरुभक्त जसा काय बा! नर समजला. ॥ ७
[5]सेवविला मातेनें श्रुतिनें जो 'सेव्य' म्हणुनि विष्टरसा, ।
विषया ब्रह्मज्ञ, तसा भुललों दुग्धज्ञ मी न पिष्टरसा. ॥ ८
यदुवीरा! बाळपणें ऐसें उपमन्यु हा वदे [6]तीसं; ।
'माते! [7]क्षीर नव्हे हें; नलगे; ठेवूनी [8]नांव देतीस.' ॥ ९
या मद्वचनें कृष्णा! [9]अंबा बहु [10]गहिंवरे, [11]असुख पावे, ।
[12]वाटे तीसं असें कीं, 'जन्म विफळ, [12]आपुले असु खपावे.' ॥ १०
कृष्णा! मज आलिंगुनि [13]मस्तक हुंगुनि, असें म्हणे माता, ।
'[14]मागसि तें दुग्धौदन कैचें या तापसाजना? ताता! ११
[15]वाताहार करावा, प्यावें जळ, शाकमूळफळ खावें; ।
[16]सुखभोगविहीनत्वें बा! आम्हां तापसांसि वळखावें. ॥ १२

---

१. अन्वयः—बा! जी ममता (माया) दुग्धकपट (दुधाविषयीं केलेलें कपट) झांकी, तीच [ममता] तें उघडेंहि करी. कारण जेव्हां नातेवाईकांच्या घरीं यज्ञ सुरू झाला, तेव्हां तेथें खरा दूधभात चार दिवस खावयास मिळेल म्हणून माझ्या बापानें मला मोठ्या प्रेमानें बरोबर नेलें व खरोखरचा दूधभात भरविला. तेव्हां कपटाचें कारण जें प्रेम, त्यानेंच तें कपट उघडकीस आणलें! २. दिव्यसुरभिदुग्धपान घडलें=कामधेनूचें दूध मला पिण्यास मिळालें. ३. गोडी किंवा आनंद. ४. सार्थान्वयः—बा! जसा काय गुरुभक्त नर (=गुरूचे ठिकाणीं निष्ठा ठेवणारा मनुष्य) सत्यानृत रस (=खरा व खोटा आनंद; ब्रह्मानंद व ऐहिकविषयानंद) समजला, [तसा] मजला सत्यानृत रस (=खरें व खोटें दूध किंवा त्यांचा स्वाद) समजे. ५. सार्थान्वयः—जो [ऐहिकविषय] विष्टरसा (=दर्भमुष्टीप्रमाणें) 'सेव्य' म्हणुनि श्रुतिनें (=वेदांनीं) सेवविला, [त्या] विषया [जसा] ब्रह्मज्ञ [न भुले], तसा, जो [पिष्टरस] मातेनें [सेव्य म्हणुनि] सेवविला, [त्या] पिष्टरसा दुग्धज्ञ मी न भुललों. जसा ब्रह्मवेत्ता वेदांनीं सांगितलें तरीही ऐहिकविषयाचा आस्वाद घेत नाहीं, त्याप्रमाणें खऱ्या दुधाची गोडी अनुभवलेला मीही आईनें भरविलेलें तें पीठ खाईनासा झालों, असा उपमन्यूच्या भाषणाचा भाव. ६. मातेस. ७.दूध. ८. दूध म्हणून. दूध नसून त्यास दूध असें म्हणून. ९. आई. १०. सद्गदित झाली. ११. तिला वाईट वाटलें. १२. प्राण जाईल तर बरें असें तिला वाटलें. १३. मस्तक हुंगणें हें प्रेमाचें द्योतक आहे. १४. सार्थान्वयः—ताता! (बाळा) [जें] मागसि, तें दुग्धौदन या तापसजना कैचें? तें आपल्यासारख्या दरिद्री तपस्व्यांकरितां नव्हे, असा भाव. १५. वायुभक्षण. १६. सार्थान्वयः—बा! आम्हां तापसांसि सुखभोगविहीनत्वें वळखावें (ओळखावें). सुखोपभोगाचा अभाव हेंच तापसांचें लक्षण होय.

बा ! [1]आम्हांऐशांची [2]परमा गति **शिव**, तया [3]सदाराध्या, ।
क्षीरौ[4]दन किति ? पुरविल सकळेच्छित, ईश्वरा [5]सदारा [6]ध्या. ॥ १३
वत्सा ! **सांब**[7]पदाश्रित तरले [8]बहुसंख्य [9]वन्य तापस रे; ।
[10]तांप सरे **शिव**भजनें, [11]ब्रह्मांडामाजि [12]धन्यता पसरे.' ॥ १४
मी कर जोडुनि पुसता झालों '[13]माते ! कसा **स**दाशिव तो ? ।
कोठें असतो ? कैसा दास तया स्वामिच्या पदा शिवतो ? ॥ १५
**शिव**[14]दर्शनकर, निश्चित[15]फळ जो सदुपाय तापसां गमला, ।
तो जननि ! मन निवाया, जाया निःशेष ताप, सांग मला.' ॥ १६
या मद्वचनें मोह[16]विहसा सहसा मदीयजननीला ।
आला पुष्कळ गहिंवर, '[17]अहिवरशयना ! [18]अकाळ **घन**नीळा ! ॥ १७
सांगों काय प्रेमें भेटुनि मज, मस्तकासि हुंगी तें ? ।
[19]मातेतें सदपत्य प्रिय बहुतचि, सुमधु जेविं मुंगीतें. ॥ १८
उपदेशी जें श्री**शिव**[20]तत्वमहावाक्य मज मदंबा, तें ।
मातें बहु धन्य करी, **कृ**ष्णा ! [21]तेंव जेविं पदें कदंबातें. ॥ १९
माय मज म्हणे 'वत्सा ! बहु दुर्ज्ञेय[22]स्वरूप **शिव** [23]सांचा, ।

---

१. आम्हांसारख्यांची. २. मोठा थारा. ३. तया सदाराध्या=साधूंनीं आराधन करण्यास योग्य अशा त्याला. ४. क्षीरौदन किती ?=दूधभाताची मातबरी ती काय ? ५. पार्वतीनें युक्त अशा. ६. स्मर. ७. शंकराच्या पायाचा आश्रय केला आहे ज्यांनीं असे. ८. पुष्कळ. फार आहे संख्या ज्यांची असे. ९. वनांत राहणारे. १०. आधिभौतिक, आदिदैविक व आध्यात्मिक असा त्रिविध ताप. अथवा जन्ममरणाचा ताप, चवऱ्याशीचा फेरा. ११. त्रैलोक्यांत. १२. कीर्ति वाढते. १३. अन्वयः–'माते ! तो सदाशिव कसा [व] कोठें असतो ? दास तया स्वामिच्या पदा कैसा शिवतो ? (त्या प्रभुच्या पायाचा स्पर्श भक्तांस कोणत्या प्रकारें लाभतो ? अर्थात् प्रभुचरणाशीं भक्त कोणत्या उपायानें जातो ?). १४. श्रीसांबाचें दर्शन करून देणारा. १५. निःसंशय फल देणारा. हें व 'शिवदर्शनकर' हीं दोन्हीं 'सदुपाय' याचीं विशेषणें. १६. मूर्च्छा आणणारा असा. १७. सर्पश्रेष्ठ जो शेष त्यावर शयन करणाऱ्या (हे कृष्णा !). १८. अवेळीं, योग्य प्रसंग नसतां. मीं शिवप्रसाद साधण्याचा उपाय विचारला, यांत तिला रडण्यासारखें किंवा गहिंवरण्यासारखें कांहीं नव्हतें, हा भाव. १९. अन्वयः–जेंवि मुंगीतें सुमधु [तेविं] मातेतें सदपत्य (उत्तम मूल) बहुतचि प्रिय [असे]. हें सुभाषितरूप आहे. २०. श्रीमत् शंकराच्या व्यापकतेच्या महासिद्धान्ताचा उच्चार. २१. कृष्णावतारीं कालियामर्दनसमयीं प्रभूंनीं यमुनेच्या कांठीं असणाऱ्या कळंबवृक्षावर चढून तेथून यमुनेंत उडी टाकली. गोपींचीं वस्त्रें घेऊनही प्रभु श्रीकृष्ण कळंबाच्याच झाडावर बसले होते. ह्या गोष्टी येथें अनुसंधेय होत. २२. जाणण्यास कठीण आहे स्वरूप ज्याचें असा. २३. खरोखर.

जीवां[1] दुर्लक्ष्य[2] सदा, दिवसांधा जेविं नाथ[3] दिवसाचा. ॥ २०

सुज्ञमहर्षि[4]सभेची ऐसी[5] म्यां स्पष्ट मात आयकिली; ।
पावे[6] तो गुरुरूप, श्रीशिव देतो जयासि पायकिली. ॥ २१

दुर्ज्ञेय[7] जसें निर्गुण, शिवरूप तसेंचि सगुणही बा! गा! ।
विश्वांत विश्वरूपें वसती; विरळा[8] दिसे महाभागा. ॥ २२

श्रीशिव निर्गुण सगुणहि दुर्ज्ञेय, तथापि भक्तवश गा! तो; ।
त्याला[9] सुलभ, प्रेमें जो आत्मार्पण करूनि यश गातो. ॥ २३

ब्रह्मादिपुत्तिकांतें[10] निर्मुनि, घे तो म्हणोनि ओतारी ।
आपणचि आपणातें, प्रभुची प्रणतां म्हणोनि 'ओ'तारी. ॥ २४

नसतां[11] सद्भक्ति बृहस्पतिमुनिशिष्याहि वासवा गोते, ।
जडहि तरति, म्हणति 'मति न शास्त्रीं, सोडुनि शिवास, वागो' ते. ॥ २५

---

१. प्राणिमात्रास. २. दिसण्यास कठीण. ३. सूर्य. दिवसांध=वाघूळ. ४. विद्वान् व महातपोनिष्ठ अशा लोकांची. ५. अशी (=पुढील गीत्यर्धांतील) गोष्ट. ६. सार्थान्वयः— जयासि (ज्याला) श्रीशिव पायकिली (चरणरूप इंगित) देतो, तो गुरुरूप पावे (=तो गुरुरूपाप्रत पावतो, शिवस्वरूप होतो). ७. परमेश्वराचीं साकार व निराकार अशीं दोन्हीं रूपें समजावयास कठीण आहेत. ८. विरळा महाभागा दिसे=जगांत क्वचित्च दिसणारे जे महाज्ञानी पुरुष, त्यांनाच मात्र हा दिसतो. 'महाभाग' याचा 'भाग्यवान् पुरुष' असाही अर्थ होईल. ९. अर्थसादृश्य—स स्थाणुः स्थिरभक्तियोगसुलभः । विक्रमोर्वशी. अन्वयः—जो आत्मार्पण करूनि, प्रेमें यश गातो त्याला [तो] सुलभ. १०. सार्थान्वयः— ब्रह्मादिपुत्तिकांतें (=ब्रह्मदेवादि मूर्तींना, पुतळ्यांना) निर्मुनि, तो [शिव] आपणचि आपणातें ओतारी (=ओतींव काम करणारा, मूर्तिकार) म्हणोनि (म्हणवून घे;) म्हणोनि (=तेव्हां, यास्तव, या कारणामुळें) प्रभुची 'ओ' प्रणतां (=भक्तांना) तारी. सर्वसंग्रहांत या गीतीच्या प्रथम व तृतीय चरणांची उलटापालट आहे. परंतु त्या पाठांत निष्कारण दूरान्वय होतो. ११. सार्थान्वयः—सद्भक्ति नसतां बृहस्पतिमुनिशिष्याहि वासवा गोते [बसति] (इंद्र हा देवांचा राजा आणि पुनः बृहस्पतींचा शिष्य परंतु केवळ सद्भक्ति नसल्यामुळें, त्याला सुद्धां हिसके खावे लागतात, मग इतराची कथा काय?) [परंतु जे] म्हणती [कीं] शिवासि सोडुनि शास्त्रीं मति न वागो (=न वावरो) ते जडहि तरती. येथें 'जड' व 'तरणें' हे शब्द श्लिष्ट आहेत. जड=(१) मंद बुद्धीचे, (२) फार वजनाचे. तरणें=(१) मोक्षपदाला जाणें, (२) पाण्यांत तरंगणें. प्रभुनामस्मरणाचा महिमा पंतांनीं इतरत्र असाच वर्णिला आहे:—न लगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती । वैकुंठ पेठ मोठी नामावर हीन दीन खट पटती. ॥

होईल सुभक्तिनें तें पूर्ण मनीं इच्छिसील वत्सा! जें. ।
दुःसह तेजस्वित्वें शिवभालदृगग्निकीलवत् साजें.' ॥ २६

## अध्याय तिसरा.

उपमन्यु म्हणे 'हितकर जननीचा सदुपदेश, तो याचा, ।
ग्रीष्मीं तृषिता पांथा दाखविला जेंवि देश तोयाचा. ॥ १
बाळाहि दिल्हा साधुनि उपदेशें परम लाभ जननीच्या. ।
घडलें, बहु उच्चासहि अतिदुर्घट, पर मला भजन नीचा. ॥ २
बुडतां मनोरथीं, ने बोध तिचा धरुनि हात पार मला ।
शिवचरणाब्जीं अलिसा अल्पवया करुनि हा तपा रमला. ॥ ३
काय शिवभजन, असत्या लालाश्रुभरें नहात, पोराशी? ।
झाला बाळपणांतचि, बा! व्हावा जरि न हा तपोराशी. ॥ ४
वर्षे सहस्र वामांगुष्ठाग्रीं मी हरे! उभा राहें, ।

---

१. सार्थान्वयः–वत्सा! (उपमन्यो!) जें मनीं इच्छिसील तें सद्भक्तीनें पूर्ण होईल. दुःसह तेजस्वित्वें (=सहन करण्यास कठीण अशा तेजानें युक्त होत्साता) [तूं] शिवभालदृगग्निकीलवत् (शिव+भाल+दृक्+अग्नि+कीलवत्=शंकराच्या कपालावरील नेत्राच्या अग्निज्वालेप्रमाणें) साजें (शोभावेंस). २. उपमन्यु म्हणे जननीचा (आईचा) सदुपदेश (उत्तम उपदेश) हितकर; तो [तेंवि] याचा (मागा, मागें लागून 'दे' म्हणा) जेंवि ग्रीष्मीं (उन्हाळ्यांत) तृषिता पांथा (प्रवाश्यास) दाखविला (दाखविलेला) तोयाचा देश (पाणी ज्या ठिकाणीं आहे तो प्रांत). आईच्या उपदेशाची केवढी योग्यता आहे, हें येथें स्पष्ट दर्शविलें आहे. ३. अन्वयः–जननीच्या उपदेशें [मला] बाळाही (लहान असतांनाच) परम लाभ साधुनि दिल्हा; [कारण] बहु उच्चासही (फार मोठ्यास सुद्धां) अति दुर्घट (साधण्यास फार कठीण); पर (परंतु) मला नीचा (क्षुद्रास, यःकश्चितास) भजन घडलें. ४. सार्थान्वयः–मनोरथीं बुडतां (आपली इच्छा सफल होत नाहीं म्हणून मी निराश झालों असतां,) तिचा बोध हात धरुनि मला पार ने (नेता झाला. अर्थात् आईच्या उपदेशाच्या बलावर माझे मनोरथ पूर्ण झाले). अल्पवया (लहान वयाचा) हा (मी उपमन्यु) तपा करुनि शिवचरणाब्जीं अलिसा (भ्रमराप्रमाणें) रमला (रममाण झाला). शंकरपदसेवेंत सानंद निमग्न झालों, असा भाव. ५. सार्थान्वयः–लालाश्रुभरें (लाळ व आसवें यांच्या ओहोळांनीं) नहात असत्या (भिजून जाणाऱ्या, लडबडणाऱ्या) पोराशी शिवभजन काय? (=कसचें साधणार?) [पण] बा! (हे कृष्णा) बाळपणांतचि जरी तपोराशी न व्हावा तरी] हा (=मी उपमन्यु) झाला. ६. डावे पायाच्या आंगठ्यावर. ७. श्रीकृष्णा!

[1]मदसु परस्पर म्हणति 'न अपयश हो, वपु अरे! उभारा हें.' ॥ ५
शतवर्षें फळभक्षण, शतवर्षें [2]अशन [3]शीर्णपर्णाचें, ।
शतवर्षें मग कृष्णा! तृष्णाशमनार्थ पान [4]अर्णाचें. ॥ ६
[5]सप्तशताब्द [6]मरुदशन करुनि, शिवासि, न [7]म्हणोनि 'हाय,' नमीं. ।
ऐसें करिता झालों [8]उग्र तप सहस्र [9]दिव्यहायन मी. ॥ ७
[10]प्रभुवर मातें [11]निजपदपद्मासवपानमत्त पाहून, ।
होय प्रसन्न, मानी अन्यतप [12]स्वल्प [13]मत्तपाहून. ॥ ८
[14]मत्सत्व परीक्षाया [15]हरिच्या घे [16]वामदेव सोंगातें. ।
[17]कृष्णा! 'होय, नव्हे' हा संदेह मनीं नदे वसों गा! तें. ॥ ९
[18]सर्वामरगणवेष्टित, ऐकत गंधर्वगीतें[19] यश कानीं, ।
मिरवितें[20] पवितें, [21]भ्यावें ज्या चवरा सर्वशत्रुमशकांनीं, ॥ १०
[22]केयूरकिरीटकटककुंडलवररत्नहारपदकांहीं ।
भूषित होउनि, करित स्मित [23]अतिशयितप्रसादपद कांहीं, ॥ ११

---

१. सार्थान्वयः–'अपयश न हो (होवो), अरे! हें वपु उभारा' असें मदसु परस्पर म्हणति. माझे प्राण आपसांत म्हणूं लागले 'अरे बाबांनो! हें शरीर ताठ ठेवा, नाहींपेक्षां प्राण गेल्यामुळें शरीर खालीं पडून तपश्चर्येचा भंग झाल्यास, तो अवघा दोष आपणांकडे येईल, तो न येवो.' प्राण पांच आहेत म्हणून अनेकवचनी प्रयोग आहे. 'परस्पर' हें क्रियाविशेषण. २. भक्षण. ३. वाळलेल्या पानाचें, गळून पडलेल्या पानाचें. ४. उदकाचें. ५. सातशें वर्षें. ६. मरुत्+अशन=वायूचें भक्षण. ७. हाय न म्हणोनि=दुःखोद्गार न काढितां; न त्रासतां. ८. खडतर, कडक. ९. देवांचीं हजार वर्षें. १०. समर्थश्रेष्ठ शंकर. ११. निज+पद+पद्म+आसव+पान+मत्त=आपले चरण हेच कमलें त्यांतील (भक्तिरूप) मधूच्या प्राशनानें धुंद झालेला असा; अर्थात् अनन्यभावें चरणसेवेंत गुंगलेला. १२. कमी. १३. मत्+तपाहून=माझ्या तपापेक्षां. १४. माझा निश्चय कसोटीस लाविण्याकरितां. १५. इंद्राच्या. १६. महादेव. १७. सार्थान्वयः–कृष्णा! तें (सोंग) 'होय [कीं] नव्हे' हा संदेह (संशय) मनीं वसों नदे. शिवानें इंद्राचें सोंग असें बेमालुम घेतलें होतें कीं हा इंद्र होय कीं नाहीं अशी तिलप्राय शंका सुद्धां उद्भवली नाहीं. १८. सर्व देवपरिवारासह. १९. गंधर्वांनीं गाइलेलें. हें 'यशा'चें विशेषण. २०. डौलानें धारण करून. २१. ज्या चवरा (=ज्या वज्ररूप चवरीला) शत्रुरूप मशकांनीं भ्यावें. चवरी ढळत असतां माशी फिरकत नाहीं, तद्वत् वज्र परजत असतां शत्रु तोंड काढीत नसे. दहापासून तेरापर्यंतच्या गीतींतील 'ऐकत', 'मिरवित,' 'करित,' 'देत', 'देखत देखत,' व 'देत' या अपूर्णक्रियावाचक कृदंतांचा संबंध चवदाव्या गीतींतील 'आला' या क्रियापदाकडे आहे. २२. बाहुभूषण, मुकुट, कडीं, कर्णभूषण (कुडक्या), उत्कृष्ट रत्नहार व त्यांतील पदकें यांनीं अलंकृत. २३. अत्यंत प्रसन्नतेचें स्थान, अर्थात् ज्यांत प्रसन्नता स्पष्ट बिंबली आहे असें. हें 'स्मित' ह्याचें विशेषण. 'स्मित'=गालांतल्या गालांत हसणें. कांहीं=ज्याचें वर्णन करितां येत नाहीं असें.

चित्तांत आतपत्रें[1] बहु लज्जा देत शारद शशीतें, ।
करुणामृतें[2] शतें निजनयनाचीं करुनि फार दश शीतें, ॥ १२
मार्गीं वराप्सरांच्या देखत देखत सलील[3] लास्यातें[4], ।
आस्यातें[5] अवलोकुनि, नर्मरसें[6] पुष्टि[7] देत हास्यातें, ॥ १३
आला स्कंधीं बैसुनि सांत्वित[8] नागा[9] सुधावदाता[10], तें ।
केलें[11] कपट, परि दिल्ही ठकउनि बाळा सुधा वदा तातें. ॥ १४
शक्र[12] म्हणे 'वर देतों, जो तुज हित विप्रसत्तमा! गमला, ।
झालों बहु तुष्ट तपें, आलों मी वरदराज, माग मला.' ॥ १५
ऐसें ऐकुनि, कृष्णा! जेंवि घनें दावपावक, विझालों[13], ।
जो[14] मी प्रार्थुनि म्हणतां 'शंभो! पद दाव, पाव' कवि झालों. १६
वदलों शक्रासि 'महादेवावांचूनि तों मला कांहीं, ।
तुजपासुनि कीं अन्या देवापासूनि मागणें नाहीं. ॥ १७
तुज कथितों सत्य, रुचे, शंभु नसे जींत, ती जनकथा न. ।
साचें[15] कीं चित्रींचें वद शिशुच्या तृप्तिचें जनक थान? ॥ १८
पशुपतिवचनें होइन तत्काळ विशाळ[16] वृक्ष कीं कीटें[17], ।

---

१. सार्थान्वयः—आतपत्रें (छत्रांनीं) शारद शशीतें (शरदृतूंतील स्वच्छ चंद्रास) चित्तीं बहु लज्जा देत. 'आतपत्रें' ही तृतीया आहे. २. सार्थान्वयः—करुणामृतें (दयारूप अमृताच्या योगें) निजनयनांचीं दशशतें (=दहा शेंकडे, हजार) फार शीतें करुनि. (दयार्द्र दृष्टीनें युक्त होऊन हा भाव). ३. हावभावासहवर्तमान. ४. नृत्यातें. ५. मुखातें. ६. क्रीडारसानें, शृंगार—चेष्टांनीं. ७. हास्यातें पुष्टि देत=हंशा पिकवीत. ८. चुचकारीत. ९. ऐरावतास. १०. अमृताप्रमाणें शुभ्र अशा. ११. सार्थान्वयः—तें कपट केलें, (सोंग घेण्याची लबाडी केली) परि तातें (पित्यानें) बाळा ठकवुनि सुधा (अमृत) दिल्ही [असें] वदा (म्हणा). १२. सार्थान्वय—हे विप्रसत्तमा (=ब्राह्मणश्रेष्ठा!) जो वर तुज हित (=कल्याणप्रद) गमला (=भासला) तो देतों, मी वरदराज (=वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ) तपें तुष्ट झालों [व] आलों, मला (=माझ्यापाशीं) माग. १३. निस्तेज झालों. १४. सार्थान्वयः—जो मी 'शंभो! पद दाव, पाव' [असें] म्हणतां कवि (=ज्ञानी, सत्य ज्ञानवान्) झालों, [तो मी] ऐसें [इंद्राचें भाषण] ऐकुनी, जेंवि घनें (=मेघानें, जलवृष्टीनें) दावपावक (=वणवा) [तेंवि] विझालों [=निस्तेज झालों]. १५. सार्थान्वयः—वद, साचें किं चित्रींचें (खरोखरीचें कां चित्रांत काढिलेलें) थान (स्तन) शिशुच्या तृप्तिचें जनक (उत्पन्न करणारें)? सांग पाहूं, मुलाचें समाधान चित्रांतील स्तनपान केल्यानें होईल कां खरें स्तनपान केल्यानें होईल? १६. प्रचंड, मोठा. १७. किडा.

इतरें दिधल्या[1] त्रिभुवनराज्यश्रीचाहि[2] बहु मला वीट[3]. ॥ १९
हर[4]चरणनमननिरता हो श्वपचकुळींहि[5] जन्म धन्य[6] मला[7], ।
नसतां शिवभक्ति, नव्हे संभवें शक्रा! तुझ्या गृहींहि भला[8]. ॥ २०
जळवातसेवनेंही न सरेलचि दुःख लेशहि[9] नराचें, ।
न घडे ज्यासि हराचें भजन सुरासुरसभागुरुवराचें[10]. ॥ २१
जन्हि[11] अन्यधर्मयुक्ता त्यांच्या वार्ता, पुरे, बरा कुचला, ।
हरचरणस्मरणाचा विच्छेद क्षणहि ज्यां जनां रुचला. ॥ २२
व्हावें[12] शिवपदरतमति, न शिवाया कलियुगींहि तापानें, ।
होय न भय संसारीं हरभक्तिरसायणाचिया पानें. ॥ २३
दिवस[13], तदर्ध, मुहूर्त, क्षण, लवही, भक्ति शंकरीं त्याला ।
न घडेचि, तत्पदाचा नाहीं प्राप्त प्रसाद ज्या झाला. ॥ २४
कीट[14] पतंगहि[15] होइन शिववचनें, सुखचि तें[16], नव्हे कष्ट[17]. ॥
शक्रा! त्रिभुवनराज्यहि जरि दिधलें त्वां नको मला स्पष्ट[18]. ॥ २५
श्वानहि ईश्वरवचनें व्हावें म्यां, परम[19] काम हा माजा, ।

---

१. दिलेल्या. २. त्रिभुवनाच्या राज्यलक्ष्मीचा. ३. तिटकारा. शंकरावांचून इतर कोणीही त्रिभुवनाचें राज्य दिलें तरी सुद्धां मला तें नको, असा भाव. ४. शंकराच्या पायीं नमस्कार घालण्यांत पूर्ण गढलेल्या मला. ५. चांडाळकुळांतसुद्धां. ६. सुखाचा. ७. जन्म. ८. ठीक, योग्य. ९. काडीमात्रसुद्धां. १०. देवदानवांच्या सभेंतील अत्यंत श्रेष्ठाचें. हें 'हराचें' विशेषण. या गीत्यर्धांत 'न घडे त्यासि' असा सर्वसंग्रहांत पाठ आहे. पण तो चूक आहे. ११. सार्थान्वयः–ज्यां जनां हरचरणस्मरणाचा विच्छेद क्षणही रुचला, त्यांच्या वार्ता (=कथा) जरी अन्यधर्मयुक्ता (=शिवभक्तिव्यतिरिक्त धर्मसाधनासंबंधींच्या) [असतील, तरी त्या] पुरे; (त्यांहून) कुचला बरा. सर्वसंग्रहपाठः–'जन्हि अन्यधर्मयुक्ती.' कुचला किंवा काजरा म्हणून एक विषारी बी आहे. १२. सार्थान्वयः–तापानें कलियुगींही न शिवाया (=कलियुगामध्येंसुद्धां तापत्रयाची बाधा न व्हावी म्हणून) शिवपदरतमति (शंकरचरणीं रममाण झालेली आहे बुद्धि ज्याची असें) व्हावें. हरभक्तिरसायणाचिया पानें (शिवाची भक्ति हेंच औषध त्याच्या प्राशनानें) संसारीं भय न होय. १३. अन्वयः–ज्या (ज्याला) तत्पदाचा (शिवचरणाचा) प्रसाद (अनुग्रह) प्राप्त झाला नाहीं, त्याला दिवस, तदर्ध (अर्धा दिवस) मुहूर्त, क्षण, लवही शंकरीं (शंकराचे ठायीं) भक्ति न घडेचि. भक्ति घडण्यासुद्धां ईश्वरप्रसाद लागतो असा ध्वनि. येथें कदाचित् असा मूळचा पाठ असावाः–दिवस, तदर्थ, मुहूर्त, क्षण, लवही भक्ति शंकरीं ज्याला । न घडेचि, तत्पदाचा नाहीं प्राप्त प्रसाद त्या झाला. ॥ यमकाचा व अर्थाचा या पाठाला पाठिंबा आहे. १४. किडा. १५. फुलपांखरूं. १६. किडमुंगी होणें. १७. संकट, दुःख. १८. साफ. १९. हा माझा परम काम=ही माझी मोठी उमेद; हा माझा अंतःकरणपूर्वक हेतु.

होइन अनीश्वरोक्तें[1] न सुरगणाचा[2] मुहूर्तही राजा. ॥ २६

क्षणहि नको देवांचें राज्य, नको ब्रह्मपद, नको मुक्ती, ।
शिवदासत्वचि बहुमत मज, शक्रा! जाण सत्य हे उक्ती[3]. ॥ २७

शशिशेखरप्रसादा[4]प्रति यावत्काळ[5] मी न लाहेन[6], ।
जन्ममरणदुःखाचे तोंवरि शतशः प्रहार साहेन. ॥ २८

त्या[7] त्रिभुवनसारातें, आद्यातें, कोटिचंद्रकांतीतें, ।
आराधुनि प्रसन्न न करितां, पावेल कोण शांतीतें? ॥ २९

म्हणतों[8], जरि जन्म पुन्हा मम दोषांहीं असे, असो, भावी, ।
त्या त्या जन्मीं माझी शिवचरणीं नित्य भक्ति शोभावी.' ॥ ३०

शक्र मज म्हणे, 'कारणकारण[9] ईश्वर, असी तुझी उक्ती, ।
तरि तत्सत्ते[10]विषयीं उपमन्यो! कोणती असे युक्ती[11]? ॥ ३१

'अतिहिंसक[12] जो प्रळयीं[13] करितो ब्रह्मांड भस्म हें सर्व, ।
याकरितांचि जयाचें सुज्ञांहीं नाम ठेविलें शर्व[14]. ॥ ३२

नग्न, करालभुजंगधर[15], मसणीं[16] क्रीडे सदा, न शिव[17]शील; ।
ऐशा उग्रा[18]पासुनि तूं कैसा वरें वरूनि[19] निवेशील[20]? ॥ ३३

देहींचा दाह बुधा! वैरदहना[21]लिंगनें निवे काय[22]? ।

१. जो ईश्वर (=शंकर) नाहीं, त्याच्या सांगण्यावरून. २. देवेंद्र. मुहूर्तही=क्षणभरसुद्धां. ३. भाषण. ४. चंद्र आहे (मस्तकावरील) तुरा ज्याचा अशा शंकराच्या प्रसादाला. ५. जोंपर्यंत. ६. लाभणार. ७. जो त्रिलोकीचें सत्व व मूळकारण आहे आणि ज्याची कांति कोट्यवधी चंद्रांप्रमाणें आहे, अशा शंकराची आराधना न करितां, कोणाला बरें शांतीचा लाभ होईल? सार=सत्त्व, बळ. ८. सार्थान्वयः–[मी] म्हणतों [कीं] मम दोषांहीं (माझ्या पापामुळें) जरि पुन्हां भावी (पुढला) जन्म असे, (तरी) असो; [मात्र] त्या त्या जन्मीं शिवचरणीं माझी भक्ति नित्य शोभावी. अर्थ-सादृश्यः–हेंचि दान दे गा! देवा! । तुझा विसर न व्हावा. ॥ १. गुण गाईन आवडीं । हेंचि माझी सर्व जोडी. ॥ २. न लगे मुक्तिधनसंपदा । संतसंग दे गा! सदा ॥ ३. तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी. ॥ ४. (अभंग १६०८.) ९. जगदुत्पत्तीचीं जीं पंचमहाभूतादि कारणें त्यांचेंही कारण, आदिकारण. १०. त्याच्या चांगुलपणाबद्दल. ११. प्रमाण, सिद्धता. १२. क्रूरपणें नाश करणारा. १३. सृष्टिसंहाराचे वेळीं. १४. संहारकर्ता. १५. भयंकर सर्पांतें धारण करणारा. १६. स्मशानांत. १७. मंगल आचरण ज्याचें असा, किंवा कल्याण करण्याची बुद्धि ज्याची असा. १८. उग्र हें शंकराचें नांव आहे. या ठिकाणीं उग्र=भयंकर व शंकर अशा दोन्ही अर्थांवर कटाक्ष आहे. १९. वर मागून घेऊन. २०. समाधान पावशील. २१. उत्कृष्ट (अर्थात् धगधगणाऱ्या) अग्नीला कंवटाळून. २२. शांत होतो काय? अर्थात् नाहीं.

संहर्त्यातें[1] व्हाया सुख भजसि, नमोस्तु ते विवेकाय!' ॥ ३४
यदुनाथा! आयकिली शक्राची म्यां असाधु[2] अशि[3] वाचा, ।
जीच्या[4] श्रवणें व्हावा सर्व श्रोत्यांसि लोभ अशिवाचा. ॥ ३५
बहु युक्ति[5] श्रुति दाउनि, वदलों 'शक्रा[6]! सुबालिशा मत्ता ।
न कळो, महेश्वराची न कळे सुज्ञा तुला कशी सत्ता? ॥ ३६
जें[7] बीजीं सामर्थ्य, प्रकट करितसे जसेंचि मृत्स्ना तें, ।
परम शिव तसा सत्ताप्रद या अव्यक्तकादिकृत्स्नातें. ॥ ३७
ब्रह्मज्ञ[8] 'परम आत्मा,' ऐसें म्हणती सदा परतरा[9] ज्या, ।
त्या 'नाहीं' वदसि कसें? या त्यजुनि कुमतपथा[10] परत[11] राजा! ॥ ३८
'ज्ञानैश्वर्य[12] अचिंतित[13],' ज्या म्हणती, 'आदिमध्यपर्यंत[14],' ।
ज्याच्या ध्यानें होतो निःशेषचि निश्चयें संदर्यंत[15]; ॥ ३९
जो निर्मी, निर्मायीं[16] सर्वां जीवां, नगां, अगां, धात्या[17]; ।

---

१. सार्थान्वयः-सुख व्हाया (=सुख व्हावें म्हणून) संहर्त्यातें (=मारणारातें) भजसि; [तेव्हां] नमोस्तु ते विवेकाय (=तुझ्या विचारीपणास, शहाणपणास नमस्कार असो! अर्थात् तूं अविचारी आहेस असा भाव). टीपः-आमच्या वाचकांपैकीं संस्कृतज्ञांनीं श्रीकुमारसंभवनामक महाकाव्याच्या पंचमसर्गांतील बटुरूपधारी शंकरानें पार्वतीसमोर तिची भक्ति कसोटीस लावण्याकरितां केलेली शिवनिंदा अवश्य वाचावी व ती येथील ३२, ३३ व ३४ या गीतींशीं ताडून पहावी. २. अयोग्य. ३. ह्या प्रकारची. ४. सार्थान्वयः-जीच्या श्रवणें (जी ऐकून) सर्व श्रोत्यांसि अशिवाचा (नव्हे जो शिव तो, अर्थात् शंकराहून भिन्न अशा देवाचा, किंवा अमंगल गोष्टीचा) लोभ व्हावा. शंकराहून इतर देवाची भक्ति करावी असें वाटावें, व अकल्याण पदरीं घेण्याची इच्छा व्हावी असा श्लेषध्वनि. आमच्याजवळील हस्तलिखित प्रतींत 'लाभ अशिवाचा' असा पाठ आहे. ५. प्रमाणें, कोटिक्रम. श्रुति=श्रुतींतील आधार, वेदवाक्यें. ६. अन्वयार्थः-शक्रा! सुबालिशा (अत्यंत पोरकटास) [व] मत्ता (=विचारांधास) महेश्वराची सत्ता (=चांगुलपणा) न कळो (=न कळला, तर एक वेळ चालेल) [परंतु] तुला सुज्ञा (शहाण्यास) [ती] कसी न कळे? ७. अन्वयार्थः-बीजीं जें सामर्थ्य, तें जसेंचि मृत्स्ना (=माती) प्रकट करिते, तसा शिव या अव्यक्तकादिकृत्स्नातें (=निराकार ब्रह्मादिक जें सर्व त्यातें) परम सत्ताप्रद (=अस्तित्व व बळ देणारा) [असे]. ८. सर्वसंग्रहपाठः—'ब्रह्म स्वपरम आत्म.' ९. अत्यंत श्रेष्ठास. १०. नास्तिकमताच्या पंथाला. ११. माघारा ये, मागें फीर. १२. ज्ञान हेंच ऐश्वर्य ज्याचें असा अर्थात् महाज्ञानी. १३. अलक्ष्य. १४. सृष्टि, स्थिति आणि लय. १५. सत्+अरि+अंत=सज्जनांच्या शत्रूंचा नाश. १६. उत्पन्न करण्यासाठीं. ह्याचें कर्म 'सर्वां जीवां, नगां, अगां'. १७. ब्रह्मदेवास. हें 'निर्मी' या क्रियापदाचें कर्म. अगां=वृक्षांना, वनस्पतींना.

शक्रा! कोणें गुरुनें तुज कथिलें कीं 'न गा अगाधा त्या?' ॥ ४०
ईक्षणेंचि क्षणमात्रें ज्याचें ब्रह्मांडकोटि निर्मायी, ।
भस्म करायाहि क्षेम; कैसा नेणसि अशाहि निर्मोया? ॥ ४१
झाला हरिसहि पढउनि नय शोभाजनक विप्रसा दानें, ।
केला कोण शिवाच्या न यशोभाजन कवि प्रसादानें? ॥ ४२
किंबहुना शक्रा! तूं पूज्य असा त्रिभुवनांत झालास, ।
श्रीशिववरप्रसादें मजला वर द्यावयासि आलास. ॥ ४३
गुरुनीतितें, अशनितें, स्वतपस्येतेंहि, कश्यपदयेतें ।
यश दे; परि प्रसादें प्रभुच्या होवूनि वश्य पद येतें. ॥ ४४
झालें कोणाच्या शिखिवदनहुतें कनक सांग गा! रेतें? ।
कोणाचें तापत्रयहर हांसे धवल आंग गारेतें? ॥ ४५
कोठें पूज्यत्व असें? 'सुकृतगतिसुखार्थ शंभुच्या लिंगा' ।
म्हणति मनोवृत्तीतें बहु साध्वी साधु 'नित्य आलिंगा.' ॥ ४६

---

१. अन्वयः—शक्रा! तुज कोणें (=कोण्या, कोणत्या) गुरूनें कथिलें कीं, 'त्या अगाधा (=त्या अतर्क्य शंकराला) न गा (गाऊं नको)'. सर्वसंग्रहपाठः—कां न गा अगाधा त्या. २. पाहणेंच, दृष्टिच. ३. निमिषांतच. ४. उत्पन्न करावयास. ५. समर्थ. ६. जाणीत नाहींस. ७. मायारहिताला. ८. सार्थान्वयः—[शंकर] हरिसहि (=विष्णूसही) विप्रसा (=ब्राह्मणाप्रमाणें) नय पढवून; दानें (=ज्ञानदानानें) शोभाजनक झाला. येथें कोणत्या प्रसंगावर कटाक्ष आहे तें बरोबर कळत नाहीं. ९. सार्थान्वयः—शिवाच्या प्रसादानें (अनुग्रहानें) कोण यशोभाजन (कीर्तीचें पात्र) कवि(=ज्ञाता) न केला? अर्थात् शिवाच्या प्रसादानें सर्व लोक ज्ञानवान् व कीर्तिमान् होतात. १०. सारांश थोडक्यांत. ११. अन्वयः—गुरुनीतीतें (=बृहस्पतीच्या उपदेशाला), अशनितें (=वज्राला), स्वतपस्येतें (=आपल्या तपश्चरणास), कश्यपदयेतें (=कश्यपऋषीच्या करुणाप्रसादास), [तूं पाहिजे तर] यश (आपल्या मोठेपणाचें श्रेय) दे, परि (परंतु) प्रभुच्या प्रसादें (=शंकराच्या कृपेनें) पद (=उच्चपद) वश्य होवूनि येतें (आपण होऊन प्रभुकृपेमुळें उच्चपद चालून येतें). अर्थात् तुझें इंद्रपदत्व प्रभुकृपेचेंच फळ आहे असा भाव. कश्यप हा इंद्राचा पिता. यानें मध्यस्थी करून इंद्राचें अनेक कठिण प्रसंगीं रक्षण केलें. १२. सार्थान्वयः—गा! [शंकराशिवाय इतरा] कोणाच्या शिखिवदनहुतें (=अग्नीमध्यें दग्ध झालेल्या) रेतें कनक (सुवर्ण अर्थात् सुवर्णमय पर्वत) झालें? सांग, कोणाचें तापत्रयहर (=त्रिविध तापातें हरण करणारें) आंग गारेतें (=बर्फाच्या तुकड्यांना) हांसे? अर्थात् शंकराचें धवलांग हिमकणापेक्षांही शीतल आहे, असा भाव. १३. अन्वयार्थः—[हे इंद्रा!] असें पूज्यत्व कोठें? (=अशा तऱ्हेचा मान शंकराशिवाय दुसऱ्या कोणाला मिळाला आहे?]. [पहा] बहु साधु साध्वी स्वमनोवृत्तीतें म्हणती [कीं] 'सुकृतगतिसुखार्थ (=पुण्य, मुक्ति व सुख लाभावें म्हणून] नित्य शंभुच्या लिंगा आलिंगा.' ही साध्वींची साक्ष शंभूचें पूज्यत्व, निर्मळत्व व मंगळत्व सिद्ध करण्यास पुरे आहे, असा उपमन्यूचा भाव.

काश्मीर वंग, तंगण, पांचाळ, विदर्भ, कोसल, कलिंग, ।
पाताळ, [१]नाकहि पहा शोधुनि, कोठें सम[२]र्चित न लिंग? ॥ ४७
[३]तूं, विधि, विष्णु, जयाच्या लिंगातें पूजितां सुर सदा, त्या ।
मागेन; उदकदात्या मागावें कीं सुधासुरसदात्या? ॥ ४८
[४]पद्मांका चक्रांका वज्रांका पाहतां नव्हे कांहीं, ।
माहेश्वरी भगाव्हा लिंगाव्हा हे प्रजा, दुजी नाहीं. ॥ ४९
[५]व्हावा लघुहि शिवाचा, गुरुहि मज तुझा दिल्हा नकोच वर. ।
भूपें कुसुम दिल्हें बहु मानधना, सेवकें नको चवर. ॥ ५०
माझ्या ठाईं भगवान् हो शंकर [६]उग्र कीं [७]अनुग्र [८]हरे! ।
मागेन मागणें तें त्यासचि शापो, करो अनुग्रह रे! ॥ ५१
शीतकर थोर गणिला, [९]उष्णकर कधीं लहान, '[१०]कोकांहीं? ।
[११]त्वद्दत्त तव पदादिक, शक्रा! जा कीं रहा, नको कांहीं.' ॥ ५२

---

१. स्वर्गसुद्धां. २. पूजित. ३. सार्थान्वयः–तूं (इंद्र), विधि (ब्रम्हदेव), विष्णु [व इतर] सुर जयाच्या (=ज्याच्या) लिंगातें सदा पूजितां, त्या (=शंकराजवळ) [मी] मागेन (=वराची याचना करीन). [तूंच, सांग पाहूं,] उदकदात्या मागावें कीं सुधासुरसदात्या [मागावें]? (=याञ्चा करावयाची ती पाणी देणाराची करावी का अमृतरस देणाऱ्याची करावी?.) ४. सार्थान्वयः–पाहतां, (=विचार केला असतां), [ही प्रजा] कांहीं (=कोणत्याही प्रकारें, मुळींच) पद्मांका (=कमळचिन्हानें युक्त), चक्रांका [किंवा] वज्रांका नव्हे; [तेव्हां] हे भगाव्हा (=भगचिन्हयुक्त, स्त्रीजातिक) [व] लिंगाव्हा (=पुरुषजातिक) प्रजा (=सृष्टि) माहेश्वरी (=महादेवापासूनच झालेली) [आहे]; दुजी नाहीं. पद्म, चक्र व वज्र हीं अनुक्रमें ब्रह्मदेव, विष्णु व इंद्र यांचीं चिन्हें आहेत. भगलिंग म्हणजे शाळुंकायुक्त लिंग हें मात्र शंकराचें चिन्ह आहे. प्रस्तुत गीति ज्या भारती श्लोकाचें भाषांतर आहे तो हाः—न पद्मांका, न चक्रांका, न वज्रांका यतः प्रजा । लिंगांका च, भगांका च, तस्मान्माहेश्वरी प्रजा ॥ ५. सार्थान्वयः–शिवाचा लघुहिवर मज व्हावा, [परि] तुझा दिल्हा (=दिलेला) गुरुहि [वर] नकोच. मानधना (=मान हेंच ज्याचें धन, अशा पुरुषास) भूपें दिल्हें (=दिलेलें) कुसुम (=पुष्प) बहु (=फार योग्यतेचें), [परि] सेवकें (चाकरानें) [दिल्हें] चवर (=चवरी) नको. अर्थसादृश्यः—'याञ्चा मोघावरमधिगुणे नाधमे लब्धकामा' (मेघदूत). गीतींतील दृष्टांत मोठा नामी आहे. मराठींतील 'मानाचें पान' ही म्हण सुप्रसिद्ध आहेच. ६. भयंकर, तापट. ७. प्रसन्न, शांत. ८. इंद्रा! ९. सूर्य. १०. चक्रवाकांनीं. चक्रवाक पक्ष्यांचीं जोडपीं दिवसा एकत्र असतात व रात्रौ त्यांचा वियोग होतो, पण तीं वियोगकर्ता प्रबल व संयोगकर्ता अल्पबल असा विचार करण्याच्या कधींही नादीं लागत नाहींत. तद्वत् तूं थोर का लहान हा विचारच मी मुळीं करीत नाहीं; मात्र तुझा प्रसाद मला नको व शंकराचा पाहिजे, हें खास. ११. अन्वयः–शक्रा! [तूं] जा कीं रहा; [पण] त्वद्दत्त (तूं दिलेलें) तव पदादिक (इंद्रपद वगैरे) कांहीं [सुद्धां] नको.

ऐसें[1] बोलुनि कृष्णा! 'पूर्ण करायासि काम हा देव ।
आला, प्रसाद न करी मजवरि अद्यापि कां महादेव?' ॥ ५३

यापरि चिंतित मी शिव[2]घनविरहम्लान शालि बा! होतों[2], ।
प्रकटी स्वरूप करुणाकर शंकर विजयशालिबाहो! तों. ॥ ५४

वृषभें केला प्रकट स्वाकार, त्यजुनि कुंजराकार[3], ।
करि[4] बहु, ज्यातें मानुनि पतितेजःसारपुंज, राका र! ॥ ५५

मधुपिंगल[5]लोचनयुग बहुरम्यावयव तो महाकाय[6]; ।
वृषरूप क्षीरोदचि[7], वर्णू तद्रूप तें अहा! काय? ॥ ५६

सूक्ष्मारुणवर्णाग्रें[8] जीं[9] पद्में सेविलीं मनीं भृंगें, ।
पवि[10]सारमयें तप्तस्वर्ण[11]द्रवपूरसन्निभें श्रृंगें. ॥ ५७

परम मनोहर त्याचें श्रीकृष्णा! कृष्णवर्ण तें पुच्छ, ।
बहुधवळ विशाल ककुद[12], तुहिनाचळशिखर[13] ज्यापुढें तुच्छ. ॥ ५८

---

१. गीती त्रेपन्न व चौपन्न यांचें युग्म असल्यामुळें एकत्र अन्वय करावा. अन्वयार्थः–कृष्णा! ऐसें बोलुनि, (असें भाषण केल्यावर) 'हा देव (=इंद्र) [माझा] काम (=इच्छा) पूर्ण करायासी आला, [तरी पण] अद्यापि महादेव मजवरी प्रसाद (=कृपा) कां न करी (=करीत नाहीं)?' यापरि (=असें) [मनीं] चिंतित, मी, बा! शिवघनविरहम्लान शालि (=शंकररूप मेघाच्या वियोगामुळें सुकून गेलेलें भाताचें तण) होतों, तों (=इतक्यांत) [हे] विजयशालिबाहो! (ज्याच्या हाताला नेहमीं यश आहे अशा कृष्णा!) करुणाकर शंकर स्वरूप (=आपलें खरें रूप) प्रकटी. २. अवर्षणानें जसें भाताचें तण किंवा रोप सुकून जातें, तसा मी शिवाच्या विरहानें सुकून जात होतों हा भाव. ३. हत्तीचें (ऐरावताचें) रूप. ४. सार्थान्वयः–ज्यातें (=ज्या वृषभातें) पतितेजःसारपुंज (=पति जो चंद्र त्याच्या तेजाच्या सत्वाचा गोळा) मानुनी राका (पूर्ण चंद्रयुक्त रात्र) र (रुदन) करी. आपला पति जो चंद्र त्याच्या अंगांतील तेजःसत्व एकत्र होऊन नंदीरूपानें बाहेर पडलें आहे व आपला पति तेजोहीन झाला आहे, असा भास होऊन पौर्णिमेची रात्र रडूं लागली. तो नंदी फार शुभ्र होता, असा भाव. ५. मधाप्रमाणें पिंगट नेत्र आहेत ज्याचे असा. ६. विशालदेही. ७. क्षीरसमुद्रच; क्षीरसमुद्रासारखें पांढरें. ८. अणकुचीदार व तांबूस आहेत टोकें ज्यांचीं अशीं. हें 'शृंगें' याचें विशेषण. ९. जीं भृंगें मनीं पद्में सेविलीं=जीं भुंग्यांनीं आपल्या मनांत कमळें म्हणून मानिलीं; जीं भुंग्यांना कमळेंच भासलीं. १०. वज्राच्या सत्त्वानेंच बनविलेलीं, वज्रासारखीं कठीण. ११. तापलेल्या सोन्याच्या रसाच्या प्रवाहाप्रमाणें कांती आहे ज्यांची, अशीं. १२. वशिंड, कोळें. १३. ज्यापुढें हिमालयपर्वताचें शिखरही (पांढरेपणानें व आकारमानानें) क्षुद्र.

[1]सारें पविचे, वर्णें हरिनीळाचेहि बा! खुर ग डीते, ।
शिवते महीतळा तरि मृदु, वस्त्रा जेंवि आखु रगडीते. ॥ ५९
[2]बहुतगुणेंकरुनि उणें भासविलें अमृत वासवा फेनें ।
यद्वदनाच्या, केला जित सुरतरुकुसुमवास वाफेनें. ॥ ६०
त्या वृषभावरि भगवान् विश्वेश्वर, तत्प्रिया उमा, [3]रीती ।
[3]दावी कल्पनगाश्रित कल्पलतेचीच गिरिकुमारी ती. ॥ ६१
तेज असें प्रथम दिसे, ज्यांत [4]लोपावें [4]सहस्रतपनाहीं; ।
[5]मी काय? ज्या पहाया पदरीं ब्रह्मयाचियाहि तप नाहीं. ॥ ६२
प्रभुच्या [6]दीप्तिपुढें [7]किति [8]अर्चिराभावृष्टि, [9]तरळलीला जे; ।
[10]मुग्धा पतिस पहाया तसि माझी दृष्टि तरळली लाजे. ॥ ६३
[11]मग देव दिसे, कीं करि पूर्ण प्रभुचा अनुग्रह रित्यातें; ।

---

१. सार्थान्वयः—बा! ते [नंदीचे] खुर सारें (=सामर्थ्यानें, बळकटपणानें) पविचे (=वज्राचे) गडी (=सोबती), वर्णें (रंगानें) हरिनीळाचेहि (=इंद्रनीळाचेहि) गडी, तरि [=असें असूनही] महीतळा शिवते (=शिवणारे) ते [तेवीं] मृदु, जेवि वस्त्रा रगडीते आखु. म्हणजे ते खूर वज्रासारखे कणखर, इंद्रनीळासारखे निळे व उंदराच्या पायासारखे मऊ होते, हा भाव. सर्वसंग्रहपाठः—शिवते महीतळावरि मृदुवस्त्रा जेविं आखु रगडीते. २. सार्थान्वयः—यद्वदनाच्या (=ज्याच्या तोंडाच्या) फेनें (फेसानें) बहुगुणेंकरुनि (=गुणातिशयानें) वासवा (=इंद्राला) अमृत उणें (कमी) भासविलें; यद्वदनाच्या वाफेनें सुरतरुकुसुमवास (=पारिजातक कुसुमाचा सुगंध) जित केला (पराभूत केला). वरील ६ गीतींत केलेलें नंदीचें वर्णन फारच सुंदर आहे. ३. सार्थान्वयः—ती गिरिकुमारी (हिमालयपर्वताची कन्या) कल्पनगाश्रित कल्पलतेचीच रीती दावी. कल्पवृक्षावर असणारी कल्पवल्ली ज्याप्रमाणें दिसते, त्याप्रमाणे शंकराला बिलगलेली पार्वती भासत होती. उपमा सरस आहे. येथें शंकरपार्वतींचें औदार्य ध्वनित केलें आहे. ४. हजारों सूर्यांनीं लोपून जावें. ५. सार्थान्वयः—ज्या पहाया ब्रह्मयाचियाही पदरीं तप नाहीं, [त्या पहाया] मी काय? त्या तेजोमयस्वरूपाकडे वर मान करून बघण्याइतकी ब्रह्मदेवाची सुद्धां पुण्याई नव्हती; मग माझी कथा काय? मी तर क्षुद्र मानव. ६. तेजापुढें. ७. काय किंमतीची? ८. विजेची वृष्टि, विजेचा झोत. ९. जिचा चकचकाट चंचल आहे अशी, जिचें चमकणें क्षणभरच टिकणारें आहे अशी. सर्वसंग्रहपाठः—अचिराभा वृष्टि तरळलीला. १०. सार्थान्वयः—मुग्धा (=जिच्यांत कामसंचार अद्याप झाला नाहीं अशी अल्लड व नुकताच तारुण्याचा उद्भव होत असल्यामुळें सुंदर दिसणारी पोर) पतिस पहाया [जशी] लाजे, तसि माझी तरळली (=चळलेली, अस्थिर झालेली) दृष्टि [पहाया] लाजे. ही उपमा फारच बहारीची आहे. या एकाच उपमेवरून शृंगाररसाचें स्वारस्य आपणास चांगलें अवगत होतें हें पंतांनीं दाखविलें आहे. ११. सार्थान्वयः—मग देव दिसे; कीं (=कारण) प्रभुचा अनुग्रह (=प्रसाद) रित्यातें (रिकाम्यास, गुणहीनास) पूर्ण (=भरलेला) करी (=करतो); अत्युग्राही (=अतिभयंकर अशाही) हरिचा (=सिंहाचा) जो बालक, त्यातें [तो उग्र] हरि (=सिंह) अनुग्र (=सौम्य). मी अतिउग्र अशा शिवाचा बालक (भक्त) म्हणून मला तो शिव अनुग्र (सौम्य दिसला,) असा भाव.

अत्युग्राही हरिचा बा! बाळक जो, अनुग्र हरि त्यातें. ॥ ६४
ध्यात्यां[1]सि म्हणति 'आम्हीं सद्विद्यालाभहेतु[2] मठ, रोबा,[3]' ।
ऐसे विलोकिले म्यां प्रभुचे बहु रम्य बाहु अठरा[4] बा! ॥ ६५
शुक्लध्वज शुक्लांबर, शुक्लचि माल्यानुलेपनें[5] देहीं, ।
उपवीत[6] शुक्ल, शुक्लचि सर्व, जसा धर्म साधुच्या गेहीं. ॥ ६६
माळा उरःस्थळावरि साजे बहु भव्य[7] शुक्लकमळांची, ।
तीतें झांकी, उघडी, द्युति दंतांची कळाभृदमळांची[8]! ॥ ६७
बाळसुधाकर[9] मुकुटीं, अंकीं तुहिनाद्रिनंदिनी[10] सुकला[11], ।
न धरी ध्यान असें जो, तो मूढचि, कीं[12] महासुखा मुकला[13], । ६८
प्रभुकंठ[14], तुझा जैसा देह, तसा देवराजनीलाभ; ।
जेणें भूतदयेचा, रेवतिच्या देवरा! जनीं लाभ. ॥ ६९

---

१. चिंतन करणारांस, भक्तांस. २. उत्तमविद्येची प्राप्ति होण्याचें कारण. हा 'मठ=स्थान' ह्याचा उद्देश. ३. यांत सुखानें सेवा करीत रहा. ४. शिवाचें चार, आठ, दहा किंवा अठरा हातांचें ध्यान असतें. ५. फुलें व उटी. ६. जानवें. टीपः—श्रीशंकर शुभ्र (=पांढऱ्या किंवा स्वच्छ, निर्मळ) वेषानें आले असून त्या वेळीं त्यांचें सर्व कांहीं शुभ्र होतें.त्या शुभ्रपणास (=पांढरे-पणास) साधूच्या घरच्या शुभ्र (=निर्मळ) धर्मांची उपमा दिली आहे. हें शुभ्रपणाचें वर्णन वाचतांना बाणभट्टांच्या कृतींतील महाश्वेतेच्या शुभ्रवेषाच्या वर्णनाची आठवण संस्कृतज्ञ वाचकांस जाहल्या-वांचून राहणार नाहीं. ७. विशाळ. 'उरःस्थळा'चें विशेषण. ८. कळा+भृत्+अमळांची=कलांतें धारण करणारा (=कला आहेत ज्याला तो) चंद्र, त्याप्रमाणें स्वच्छ. हें विशेषण 'दंतांची' ह्याचें. टीपः—त्या माळेंतील श्वेतकमळें केव्हां स्वच्छ व्यक्त दिसत व केव्हां अगदींच लोपून जात; कारण ज्या वेळीं शिव हंसत, त्या वेळीं त्यांच्या शुभ्रदांतांच्या प्रभेंत शुक्लकमळमालेची प्रभा लोपून जा-ऊन, ती अदृश्य होई. नंतर मग जेव्हां हंसें पुरें होऊन दांत ओठांनीं आच्छादिले जात, तेव्हां ती माळा पुन्हां दृग्गोचर होत असे. ही पंक्ति खरोखर बहारीची आहे. ९. चंद्रकोर. १०. हि-माचलाची मुलगी, गौरी. ११. आमच्याजवळील एका हस्तलिखित पोथींत 'शुक्ला' असा पाठ आहे. १२. कारण. १३. आंचवला, अंतरला. १४. अन्वयार्थः—[हे कृष्णा!] जैसा तुझा देह [देवराजनीलाभ], तसा प्रभुकंठ (=शिवाचा गळा) देवराजनीलाभ (=देवराज+नील+आभ =इंद्र+नील+कांति=इंद्रनीलाच्या कांतीप्रमाणें कांती ज्याची असा,) जेणें (=ज्या शिवकंठानें व तुझ्या देहानें) [हे] रेवतीच्या देवरा! (=रेवती, बलरामपत्नी तिच्या दिरा, श्रीकृष्णा!) जनीं भूतदयेचा लाभ होतो. टीपः—समुद्रमंथन झालें असतां जें विष निघालें त्याचें प्राशन जर श्रीशंकर न करिते, तर त्या विषानें ह्या जगांत अनर्थ केले असते. म्हणून कृष्णाच्या देहाप्रमाणें शिवकंठांतही मूर्तिमंत भूतदया भरलेली होती.

बाणपरशुशूळांची कथितों कृष्णा! कथा पिनाकीची,[1] ।
वधिती देवारींतें, देती सद्गति तथापि नाकींची.[2] ॥ ७०
[3]जें धनु पिनाकनामक, ज्याच्या गाताति वेद महिम्यातें, ।
अवलोकिलें प्रभुपुढें, जें झालें सप्तशीर्ष अहि, म्यां तें. ॥ ७१
[4]बाणहि सहस्रबाहूदरमस्तकनेत्र देखिला, ज्याला ।
पाशुपत असें म्हणति, प्रणति करी ज्यास काळही भ्याला. ॥ ७२
[5]ब्रह्मास्त्र मुख्य, कृष्णा! त्याहुनि नारायणास्त्र अस्त्रांत, ।
त्यांतहि पाशुपताचें, दहनाचें जेविं तेज वस्त्रांत. ॥ ७३
तें मूर्त[6] पाहिलें म्यां बा! शूळ, तुझ्याहि जें अरिस भारी,[7] ।
[8]श्रुतहि प्रताप ज्याचा होतो पीतांबरा! अरिसभारी. ॥ ७४
[9]मूर्त त्रिशूळ करुनि त्रिशिखा भ्रुकुटी, धरूनि सर्प करीं, ।

---

१. पिनाकनामक धनुष्यातें धारणकर्ता जो महादेव, त्याची. २. सार्थान्वयः–[जे बाण–परशु–शूळ] देवारींतें (देवांच्या शत्रूंना, असुरांना) वधिती, तथापि (त्या देवारींना) नाकींची सद्गति (मोक्ष) देती. अर्थात् शंकराच्या अस्त्रानें हत झालेले देवशत्रु मोक्षपद पावतात असा भाव. अर्थसादृश्यः–'सत्संगजानि निधनान्यपि तारयन्ति' उत्तररामचरित्र. ३. सार्थान्वयः–जें धनु (धनुष्य) पिनाकनामक, ज्याच्या महिम्यातें वेद गाताति, जें सप्तशीर्ष अहि (सर्प) झालें (=सात फडांच्या नागाच्या रूपाचें जें होतें); तें म्यां प्रभुपुढें (शंकरासमोर) अवलोकिलें (पाहिलें). टीपः–शंकराचीं शस्त्रें साकार अशीं उपमन्यूस दिसलीं, त्यांत पिनाकधनुष्य सप्तशीर्ष नागाच्या रूपानें दिसलें. ४. सार्थान्वयः–ज्याला पाशुपत असें म्हणती, ज्यास भ्याला (भ्यालेला) काळ (यम) प्रणति करी (नमन करी; अर्थात् ज्याच्यापुढें काळाचेंही कांहीं चालत नाहीं) [असा] बाणही सहस्रबाहूदरमस्तकनेत्र (सहस्र+बाहु+उदर+मस्तक+नेत्र=हजार हात, पोटें, मस्तक व नेत्र आहेत ज्याला असा) [म्यां] देखिला. ५. सार्थान्वयः–[हे] कृष्णा! अस्त्रांत ब्रह्मास्त्र मुख्य, नारायणास्त्र त्याहुनि [अधिक योग्यतेचें]; आणि त्यांतही (त्या नारायणास्त्रांतही), जेविं दहनाचें (अग्निचें) तेज वस्त्रांत [तेविं] पाशुपताचें [असे]. अर्थात् हें नारायणास्त्रापेक्षां अत्यंत तेजस्वी होतें. ६. साकार, सशरीर. हें 'शूल' ह्याचें विशेषण. 'शूल' हा शब्द मराठींत पुल्लिंगी योजितात; परंतु संस्कृतांत हा पुल्लिंगी, व नपुंसकलिंगीही आहे व येथें तो पंतांनीं नपुंसकलिंगीच योजिला आहे. ७. जें तुझ्याहि अरिस भारी=जें तुझ्या चक्रालासुद्धां (=सुदर्शनालासुद्धां) भारी (=आटोपण्यास कठीण). ८. सार्थान्वयः–[हे] पीतांबरा! (पिवळें आहे वस्त्र ज्याचें अशा श्रीकृष्णा!) ज्याचा श्रुतहि प्रताप (=ज्याचा नुसता ऐकिलेला प्रताप, ज्याच्या प्रतापाची वार्तासुद्धां) अरिसभारि (=शत्रुमंडळाचा शत्रू) होतो. ९. सार्थान्वयः–[तो] मूर्त (मूर्तिमंत) त्रिशूळ, भ्रुकुटी (भुवई) (जणूं रागानेंच) त्रिशिखा (जिला तीन टोकें आहेत अशी) करुनि, करीं (हातांत) सर्प धरूनि, जणों पाशकरा (फास ज्याच्या हातांत आहे त्या) काळा (यमाला) भय दाउनि, 'दर्प (=गर्व) न करीं' असें म्हणे. काळाच्या हातांत नुसते पाश असतात, परंतु त्रिशूळाच्या हातांत साप असल्यामुळें, त्याचें भयानकत्व काळाहून अधिक होतें.

पाशकरा काळा भय दाउनि, जाणों म्हणे 'न दर्प करीं.' ॥ ७५
अहिपाणि[1] मूर्त परशुहि कृष्णा! म्यां देखिला पुरुषकाय, ।
पाहेल[2] मरणधर्मा त्या अमरभयप्रदा पुरुष काय? ॥ ७६
प्राधान्यें[3] कथिलीं म्यां हीं चार, अनंतशक्तिचीं अमितें ।
अस्त्रें[4] किति वर्णावीं सर्वामरकायवाङ्मनोनमितें? ॥ ७७
दक्षिणभागीं[5] पाहें द्रुहिणा स्वर्णप्रभा वरविमानीं, ।
मी त्यातें, देखुनियां त्याचा वर्णप्रभाव, रवि मानीं. ॥ ७८
पार्श्वीं प्रभुच्या पाहुनि पद्मगदाशंखचक्रकर वामीं[6], ।
भरलों[7] सुखामृतें, जो होतों धृतदुःखतक्र करवा मी. ॥ ७९
'करिन निधीश' म्हणे जो प्रणतोद्धृतिदक्षबाहु[8] 'निःस्वा मी,' ।
बहु शोभला मयूरीं देवीच्या[9] निकट राहुनि स्वामी[10]. ॥ ८०
देवापुढेंचि[11] ज्यातें[12] शक्रादि[13] समस्त[13] लोकपति[13] वंदी, ।
जो रूपें सामर्थ्यें शंकरसा, तो विलोकिला नंदी. ॥ ८१

---

१. अन्वयः–[हे] कृष्णा! अहिपाणि (सर्प हातांत धरणारा) मूर्त परशुही (देहधारी परशुसुद्धां) पुरुषकाय (पुरुषस्वरूप) म्यां देखिला. २. सार्थान्वयः–मरणधर्मा (मर्त्य) पुरुष त्या अमरभयप्रद (देवांसही भीति दाखविणाऱ्यास) पाहील काय (पाहूं शकेल काय)? 'धर्म' हा शब्द बहुव्रीहिसमासांत अंत्यावयव असेल, तर त्याचा 'धर्मन्' असा आदेश होतो व मराठींत त्या सामासिकपदाचें संस्कृतांतील प्रथमांत रूप योजिण्याची वहिवाट असल्यामुळें येथें 'मरणधर्मा पुरुष' असा प्रयोग करण्यांत आला आहे. ३. मुख्यत्वेंकरून. ४. सार्थान्वयः–सर्वामरकायवाङ्मनोनमितें (सर्व+अमर+काय+वाच्+मन+नमितें=सर्व देवांचे देह, वाणी व मन, ह्यांनीं नमस्कारिलेलीं) अनंतशक्तिचीं (=अपार आहे शक्ति ज्याची अशा शंकराचीं, किंवा अपार आहे शक्ति ज्यांची अशीं,) अमितें (अपार) अस्त्रें किती वर्णावीं? ५. सार्थान्वयः–दक्षिणभागीं (उजव्या बाजूस) वरविमानीं (उत्तम विमानांत) [बसलेल्या] स्वर्णप्रभा (सुवर्णकांति आहे ज्याची अशा) द्रुहिणा (ब्रह्मदेवाला) पाहें. त्याचा (ब्रह्मदेवाचा) वर्णप्रभाव (अंगकांतीचें तेज) देखुनियां मी त्यातें रवि (सूर्य) मानीं. ६. डाव्या. हें 'पार्श्वीं'चें विशेषण °चक्रकर=विष्णु. ७. अन्वयः–जो मी धृतदुःखतक्र करवा [=दुःखरूपी ताकानें रसरसलेला करवा (=गंडेरी)] होतों (=जो मी पूर्वी अत्यंत दुःखी होतों) [तो] सुखामृतें भरलों (सुखरसानें भरलों; पूर्ण सुखी झालों). करवा किंवा गंडेरी हा शब्द हल्लीं सामान्यतः सोललेल्या उसाच्या तोंडांत मावण्यासारख्या लहानशा तुकड्याला लावितात. ८. प्रणत+उद्धृति+दक्ष+बाहु=नम्र झालेल्याच्या उद्धाराविषयीं तत्पर आहे भुज ज्याचा असा. अन्वयः–जो प्रणतोद्धृतिदक्षबाहु म्हणे, [कीं] 'मी निःस्वा (=निर्धनाला) निधीश (कुबेर) करीन'. रंकाचा राव करण्याचें सामर्थ्य माझ्यांत आहे, हा भाव. 'जो'चा संबंध उत्तरार्धीतील 'स्वामी=कार्तिकस्वामी' ह्या शब्दाकडे. ९. पार्वतीच्या. १०. कार्तिकस्वामी. ह्याचें वाहन मोर आहे. ११. शंकराच्या पूर्वींच. १२. ज्या नंदीतें. १३. इंद्रप्रभृति सर्व लोकपाल.

स्वायंभुव[1]मुख मनु, हरिमुख[2] सुर, भृगुमुखहि[3] ऋषि तपोराशी, ।
आले[4] चातक, विनवुनि घन, निववायासि तृषित पोराशी. ॥ ८२
आटोकाट[5] मिळाले, 'आटो[6] काट स्वदृष्टिचा' म्हणती, ।
'जय जय' म्हणोनि करिति प्रभुच्या चरणांबुजाप्रति प्रणती[7]. ॥ ८३
ब्रह्मा रथंतराख्यें[8], विष्णु ज्येष्ठाभिधें[9] स्तवी सामें[10], ।
शतरुद्रियें[11] शतमखहि[12]; विभुचीं गाती किती सुधी[13] नामें. ॥ ८४
शंभुपुढें[14] उदयातें एकाकाळींच केशवा! करिते, ।
जरि बहु अयुतें असते चंद्रार्क, स्पष्ट लोपते तरि ते. ॥ ८५

## अध्याय चवथा.

उपमन्यु म्हणे, 'कृष्णा! गुरुभजनीं जें विशंक[15] राबेल[16], ।
समजेल[17] मन, वहावा स्तव भावें, जेविं शंकरा बेल. ॥ १
'दुष्टे[18]!, हित साधूं दे, धरिसी कोंडूनि कां मना? लाजे !'

---

१. स्वयंभु जो ब्रह्मदेव त्याच्या दक्षिण अंगापासून निर्माण झालेला, तो स्वायंभुव. हा १४ मनूंतील पहिला होय. २. इंद्रादि. ३. भृगुप्रभृति. ४. सार्थान्वयः–[हे] चातक (=ईश्वररूप मेघाचे खरे एकनिष्ठ भक्त) घन (=ईश्वररूप मेघाला) विनवून, [मज] तृषित पोराशी निववायासि (=शांत करण्यासाठीं) आले. सर्वसंग्रहाचा पाठः–'आले चातक निववुनि.' ५. समस्त. ६. स्वदृष्टिचा काट आटो म्हणती=आपल्या नेत्रांचा मळ नाहींसा होवो, असें म्हणूं लागले. काट=गंज, जंग, मळ. ७.नमस्कार. ८. 'रथन्तर' हें कित्येक सामांचें नांव आहे. ९. ज्येष्ठ नांवाच्या. १०. सामवेदांतील स्तोत्रानें. ११. यजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेंत (१६; १–६६) शतरुद्रिय नांवाचें एक प्रसिद्ध स्तोत्र आहे. या स्तोत्राचा मतलब शतशिरा रुद्राला प्रसन्न करण्याचा आहे. १२. इंद्र. १३. सुज्ञ. १४. सार्थान्वयः–चंद्रार्क (चंद्रसूर्य) जरी बहु अयुतें (अनेक दशसहस्रें, हजारों, लाखों) असते व एका काळींच उदयातें करिते (जरी एकदम उगवले असते), तरी ते शंभुपुढें स्पष्ट (खास) लोपते. गीतेंत विश्वस्वरूपाच्या तेजाचें असेंच वर्णन आहेः–'तेज रविसहस्रांचें जरि एकसरें उठेल आकाशीं, । तरि त्या महात्मयाच्या तेजाची तें सरी करीनाची. ॥–मोरोपंती गीतार्याटीका, अ० ११ गी० १२. १५. बिनदिक्कत. १६. सेवेंत मग्न होईल. हेंच यमक शांतिपर्वांत आलें आहेः–'शुचि पुरुषरत्न सादर गुरुगेहीं जें विशंक राबेल । बहुमत तदुक्त सर्वां सर्वज्ञा जेंवि शंकरा बेल. ॥ ७।६७.' १७. पूर्वार्धासह अन्वयः–गुरुभजनीं जें विशंक राबेल [तें] मन शंकरा जेविं बेल, [तेविं] स्तव [ही] वहावा (अर्पण करावा) [असें] समजेल. १८. गीती २ व ३ यांचें युग्म आहे, तेव्हां त्यांचा एकत्र अन्वय करावा. सार्थान्वयः–'दुष्टे लाजे! हित साधूं दे. मना (=मनाला) कोंडूनि कां धरिसी'? ऐसें जे म्हणति [व] सर्व कामनांला (=वासनांना) निपटुनियां (समूळ) त्यजिती, तिहीं, जें वस्तु विनाशि न (=शाश्वत वस्तु, मोक्षपद), तें [शंकराला] भावें (=एकनिष्ठपणानें) स्तवुनि जोडिलेंचि. सर्वसंग्रहाचा पाठः–दुष्टे हित साधूं दे धरिसी कोंडूनि का मनाला जे । ऐसें म्हणति त्यजिती निपटुनियां सर्व कामनां लाजे ॥

ऐसें म्हणति, त्यजिती निपटुनियां सर्व कामनांला जे, ॥ २
तें जोडिलेंचि भावें स्तउनि, नव्हे जें विनाशि वस्तु[1], तिंहीं. ।
वाक्शुद्धि[2] न होय इतर मंत्रजपांहीं विना शिवस्तुतिंहीं. ॥ ३
म्हणुनि असा स्तविला प्रभु; 'विश्वाकारा[3]! तुला असो नमन ।
तो निष्फळजनु[4], जेणें स्मरण न केलें तुझें, असोन मन[5]. ॥ ४
धाता, दाता, त्राता, भ्राता, माता, पिताहि तूं देवा! ।
सद्गुणहीनां दीनां संसारीं तारिती तुझी सेवा. ॥ ५
सांबा! सांभाळाया दक्ष[6] तुझें चरणरजचि लक्षमतें[7], ।
शर्वा! सर्वाधारा! जें दृढतर वज्रकवच अक्षम तें. ॥ ६
शंभो[8]! अंभोद हितहि परि मारी चातकास करकांहीं. ।
आवरिति जोडिलेहि न त्या सुजडा घातकास कर कांहीं. ॥ ७
भर्गा[9] स्वर्गागम[10] जड; यद्यपि ते आश्रितासि शोभविती, ।
क्षोभविती[11] कामातें, बहु अर्पुनि विषय चित्त लोभविती. ॥ ८

---

१. 'वस्तु' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे व पंतांनींही तो त्याच लिंगीं मराठींत योजिला आहे. कांहीं शब्दांचीं लिंगें पंत संस्कृताप्रमाणेंच मराठींत ठेवितात त्यांपैकींच हा एक आहे. २. अन्वयः–शिवस्तुतिंहीं विना इतर मंत्रजपांहीं वाक्शुद्धि न होय. शिवस्तुतीवांचून कोणतेही मंत्र वगैरे जपल्यानें वाणी शुद्ध व पवित्र होत नाहीं; असा शिवस्तुतीचा महिमा आहे. याकरितांच उपमन्यूनें पुढें लिहिल्याप्रमाणें शिवस्तुतीस आरंभ केला. सर्वसंग्रहाचा पाठः–वाक्शुद्धि न हो इतरा मंत्र–जपांहीं विना शिवस्तुतिंहीं ॥ ३. सर्व विश्वच आहे आकार ज्याचा, सर्वव्यापी. ४. व्यर्थ जन्म ज्याचें असा. ५. बुद्धि. न्यायशास्त्रामध्यें 'मन' हें 'बुद्धि' व 'इंद्रिय' यांजमधील सांखळी मानिलें आहे. ६. समर्थ. ७. लक्षावधि लोकांच्या मतानें. ८. सार्थान्वयः–शंभो! अंभोद (मेघ) हितही (सुखावह खास आहे); परि चातकास करकांहीं (गारांनीं) मारी; जोडिलेहि (जोडलेले सुद्धां) कर (हात) त्या सुजडा (उत्तमजलयुक्ता, पक्षीं मूर्खा) घातकास कांहीं (रति मात्र) न आवरिती (थांबवीत नाहींत). येथें 'सुजडा' हा शब्द श्लेषयुक्त असल्यामुळें मतिमंद अशा घातकर्त्याचें सुद्धां हात जोडून पायां पडल्यास निवारण होतें; परंतु, काकुळतीस आल्यावर सुद्धां हा मेघ गारांचा वर्षाव आवरून धरीत नाहीं असा ध्वनि आहे. अर्थसादृश्यः–ग्रीष्मीं भीष्म सुचंड सूर्यकिरणें जो पोळला चातक। कष्टें लोटितसे तुला स्मरुनि जो दीर्घा दिनां घातक ॥ त्याच्या दृष्टिपथांत थाट करुनी मेघा! महाडंबरें। गारांचाच असा प्रसाद करिशी! बोलूं कुणाला बरें? ॥ (भामिनीविलास.) या व पुढील तीन गीतींत हितप्रद अशा उपमान वस्तूंतील न्यूनत्व फार बहारीनें वर्णिलें असून त्यायोगें ध्वनीनें शंकर हितप्रद असून तो निर्दोष आहे, असें सांगितलें आहे. ९. हे महादेवा! १०. स्वर्गींचे वृक्ष, पांच कल्पवृक्ष. ११. अन्वयः–बहु विषय अर्पूनि कामातें क्षोभविती [व] चित्त लोभविती (मोहांत पाडतात).

किति देइल? चिंतामणि हो, किंवा तेंहि[1] कामकपिला[2] हो. ।
तूंचि[3] म्हणसि 'मोक्षासहि, नसतांही मोक्षकाम कपि लाहो.' ॥ ९
जीवांसि[4] सगुण होउनि तारिसि म्हणसी 'अहा! न तापावें.' ।
स्मरतां कोण त्वदितर धांउनि वेगें महानता पावे? ॥ १०
ब्रह्मशिरच्छेदातें[5], कर्ता तूं एक कामदाहातें; ।
अपराधी शासुनियां, कुरवाळिसि सर्वकामदा! हातें. ॥ ११
स्वसुखामृततृप्ता[6] तुज तुल्यरसचि अधरबिंब, विषयज्ञ; ।
तूं आत्मज्ञ म्हणसि 'सम,' 'एक मधुर, एक निंब' विषयज्ञ. ॥ १२
वर्णांत[7] ब्राह्मण तूं, शंभो! सर्वां सुरांत[8] तूं धाता, ।

---

१. ते=ती, प्रसिद्ध. २. कामधेनु. ३. जेवढें मागावें, तेवढेंच चिंतामणि व कामधेनु देतात; परंतु मोक्षाची इच्छा नसतांही कपिला शिवानें मोक्ष दिला, म्हणून शिव खरा श्रेष्ठ, हा या गीतीचा मतलब. येथें 'कपि' शब्दानें अंजना किंवा तिचा पती केसरी याचा बोध होतो असें वाटतें. यांनीं शंकराची आराधना केल्यावरून त्यांच्या पोटीं शंकर पुत्ररूपानें आले. हाच मारुति. या मोक्ष मिळविणाऱ्या कपीचा पंतांनीं पुन्हां एकदा उल्लेख केला आहे. (पुढें, अ० ६, गी० ६ पहा.) 'कपिला' असें पद घेतलें, तर 'कपिल मुने!' असा अर्थ होईल. अन्वय:-तूंचि म्हणसी, 'कपिला! [तुला] मोक्षकाम नसतांही, [तूं] मोक्षासही हो (=मोक्षाप्रत अस, मोक्षास लाभ.)' ४. वस्तुतः परमेश्वर निर्गुण, पण भक्तांचें काज पुरविण्याकरितां तो सगुण झाला आहे. अन्वय:- सगुण होउनि जीवांसि (प्राण्यांस) तारिसि (उद्धरितोस) [व] 'अहा! न तापावें (दुःखांत राहूं नका)' [असें] म्हणसि; स्मरतां (धांवा केला असतां) त्वदितर (तुझ्याहून अन्य) कोण वेगें धांउनि महानता (अत्यंत नम्र झालेल्यास) पावे? अर्थात् दुसरा कोणीही पावत नाहीं असा भाव. ५. अन्वय:-तूं एक ब्रह्मशिरच्छेदातें [व] कामदाहातें कर्ता; हे सर्वकामदा! (=सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या) [तूं] अपराधी शासुनियां (अपराध्यांस शिक्षा देऊन) [नंतर त्यांसच] हातें कुरवाळिशी. ब्रह्मदेवानें आपली मुलगी जी सरस्वती तिच्यावर वांकडी नजर ठेविल्यामुळें, शंकरानें त्याच्या पांच शिरांपैकीं एक शिर आपल्या करांगुळीनें छाटून टाकिलें. तसेंच शंकरानें आपल्या तृतीय नयनाच्या तेजानें मदनाचें भस्म करून टाकिलें होतें. या दोन्ही पौराणिक कथांवर येथें कटाक्ष आहे. ६. सार्थान्वय:-स्वसुखामृततृप्ता (=आत्मानुभवरूप अमृतानें संतुष्ट झालेल्या) तुज अधरबिंब [व] विषयज्ञ (विषदान) तुल्यरसचि. तूं आत्मज्ञ [त्यां] सम म्हणसि, [परंतु] विषयज्ञ (=केवळ विषयांचीच ज्यास गोडी आहे, असा) एक मधुर, एक (=दुसरें) निंब (=कडु) [असें म्हणतो]. ७. गीति १३-२१ व 'भगवद्गीतेंतील दहाव्या अध्यायांतील श्लोक २०-४२ यांत अत्यंत साम्य आहे. परमेश्वर कोण आहे हें येथें उपमन्यूनें सांगितलें असून गीतेमध्यें प्रत्यक्ष भगवंतांनींच तें सांगितलें आहे. वर्णांत=ब्राह्मण, क्षत्रिय, विट् व शूद्र, ह्या चार वर्णांत. ८. देवांत.

मरुतांत[1] शतक्रतु तूं, आदित्यांमाजि विष्णु सत्राता[2]; ॥ १३
सुगृहस्थ आश्रमांत, प्रभुवर्या! तूं कुबेर यक्षांत, ।
रुद्रांत नीललोहित, दीक्षित तूं यज्ञकर्मदक्षांत[3]; ॥ १४
तूं पर्वतांत मेरु, ग्रहवर्गी सूर्य तूं, सदाधारा[4]! ।
नक्षत्रांत शशी तूं, जो अमृताच्या क्षरे[5] सदा धारा; ॥ १५
गरुड खगांत, वसूंतहि[6] पावक, तैसाचि जो सदा शांत ।
सर्वां ऋषींत देवा! शितिकंठा! तूं अरुंधतीकांत[7]; ॥ १६
ग्राम्यपशूंत प्रभु तूं गोवृष[8], तुज जाणतों असें बा मी, ।
आरण्यकापशूंतहि तूं देवा! सिंह आमुचा स्वामी; ॥ १७
सांख्यांत[9] कपिल, योगी जे त्यांत सनत्कुमार[10] तूं शर्वा! ।
बहु मान्य महेश्वर तूं, ईश्वर जो जो असे, तया सर्वां; ॥ १८
वेदांत सामवेद, श्रीशतरुद्रिय यजूंत, भुजगांत ।
तूं शेष, सत्यलोकहि लोकांत, श्रेष्ठ तूं विभु[11] जगांत. ॥ १९
'कर्ता, भर्ता, हर्ता,' ऐसें तुज म्हणति सर्वही संत ।
स्पष्ट विभूतींस तुझ्या जगदात्म्या! शाश्वता! नसे अंत. ॥ २०
तेजें[12]करुनि अधिक जें; तें तें सर्व स्वरूप तव लोकीं; ।
मम मति असि, शशिचूडा[13]! श्रुतिहि[14] म्हणतसे असेंचि अवलोकीं. ॥ २१
मज दासासि अभय दे तव करुणेनेंचि बहु निवे[15] दीन, ।

---

१. मरुदेवतांमध्यें. २. सत्+त्राता=साधूंचा रक्षणकर्ता. ३. यज्ञकर्मामध्यें प्रवीण असे जे त्यांत. ४. सत्+आधारा=साधूंच्या आश्रया. ५. स्रवतो. ६. सप्तविध देवांतील पांचवे देव. हे आठ आहेत. त्यांचीं नांवें;–धर, ध्रुव, सोम, अन्ह, अनिल, अनल, प्रत्यूप व प्रभास. ७. वसिष्ठ. ८. गो+वृष=उत्तम बैल, पोळ. ९. सांख्यदर्शनाच्या अनुयायांत. भरतखंडांतील आर्यांत तत्त्वज्ञानाच्या सहा शाखा दर्शनें या नांवानें प्रसिद्ध आहेत. या षट्दर्शनांपैकीं सांख्य हें एक आहे. या दर्शनाचे कर्ते कपिल महामुनि होत. त्यांनीं आपल्या मातेस तत्वज्ञानाचा उपदेश केला. सांख्यदर्शनांत २५ तत्वें मानिलेलीं आहेत. ह्या तत्वांपैकीं अंत्य तत्व पुरुष (आत्मा) हें होय, बाकीचीं २४ औपाधिक तत्वें होत. त्यांचें यथार्थ ज्ञान संपादून, त्या ज्ञानाच्या जोरावर पुरुषतत्त्वाची औपाधिक तत्त्वांच्या तडाख्यांतून सुटका करणें, हाच या दर्शनाचा मुख्य हेतू आहे. वेदांत व सांख्य हीं दोन्हीं दर्शनें समुद्बंधक (Synthetical) असल्यामुळें गौतमप्रणीत पृथक्करणीक (Analytical) 'न्याय' पद्धतीशीं ह्यांचा विरोध आहे. 'सांख्य' व 'वेदांत' ह्या दोहोंत फरक एवढाच कीं पहिल्यामध्यें द्वैतसिद्धान्त असून दुसऱ्यामध्यें अद्वैतमताचें प्रतिपादन आहे. १०. ब्रह्मदेवाच्या चार मानसपुत्रांपैकीं एक. ११. स्वामी. १२. तेजानें. १३. चंद्रशेखरा, महादेवा! १४. वेद. १५. शांत होतो.

नें [1]निवेदिलें न जाणुनि, आतां पाद्यार्घ्य तुज [2]निवेदीन. ॥ २२
अपराध घाल पोटीं, [3]चुकलोंचि करावया स्तव, नमाया; ।
[4]असि वत्सलें करावी जडजीव तरावयास्तव न माया. ॥ २३
शंभो! [5]दंभोलिकरचि गमलासि, नमिल कसें पद [6]भ्रमला? ।
प्रभुनें क्षमा करावी, घडला अपराध हा [7]अदभ्र मला.' ॥ २४
[8]अंजलि केला, ऐसें विनवुनि, [9]पाद्यार्घ्य तें [10]निवेदून; ।
[11]कीं, चुकला, तो, प्रभुला नमन करुनि, सर्वही निवे दून. ॥ २५
घननीला! [12]जननीला लाजविती शंभुची दयादृष्टी, ।
मजवरि पडतां, पडली सुरकुसुमांची मनोहरा वृष्टी. ॥ २६
मंद, सुगंध, सुशीतळ, लक्ष्मीच्या वल्लभा! पवन वाहे, ।
[13]ऐकति सुरवाद्यांचा सुमधुर रव कर्ण बा! नवनवा हे. ॥ २७
नारद, गंधर्व [14]करित होते आलाप मधुर हर्षोनी; ।
[15]बहु 'साधु साधु,' 'जयजय,' वदले प्रेमाश्रुबिंदु वर्षोनी. ॥ २८
प्रभुवर [16]सादर डोले, बोले '[17]सुरहो! महातपीं शक्ती, ।

---

१. अर्पण केलें नाहीं. २. अर्पण करीन. ३. अन्वयः–स्तव कराया [व] नमाया चुकलोंचि. ४. अन्वयः–जडजीव (बुद्धिहीन प्राणी) तरावयास्तव (मुक्त व्हावेत म्हणून) वत्सलें (सकरुणानें) असि माया (फसवणूक, सोंगाची बतावणी) न करावी. ५. दंभोलि (वज्र) करामध्यें (हातामध्यें) ज्याचा असा; इंद्र. ६. भ्रांत, चकलेला. ७. मोठा. ८. 'अंजलि' हा शब्द मराठींत प्रायः स्त्रीलिंगीं योजितात; परंतु संस्कृतांत तो पुल्लिंगीं आहे व पंतांनीं त्याच लिंगीं घातला आहे. ९. पाद्य=पाय धुण्यास दिलेलें पाणी. अर्घ्य=सन्मानपूर्वक पुढें ठेविलेली भेट. पाद्यार्घ्य=पूजाद्रव्य. 'तें' प्रसिद्ध्यर्थी दर्शकसर्वनाम. १०. अर्पण करून. ११. सार्थान्वयः–कीं (=कारण) [जो] चुकला, तो सर्वही दून (=दुःखी किंवा पश्चात्तप्त मनुष्य) प्रभुला नमन करुनि निवे (=स्वस्थ होतो, दुःखमुक्त होतो). १२. सार्थान्वयः–जननीला (आईला) लाजविती (लाजविणारी) शंभुची दयादृष्टि मजवरि पडतां, इ०. श्रीशंकराच्या ठायीं असणारें भक्तवात्सल्य, आईच्या ठायीं असणाऱ्या पुत्रवात्सल्याहूनही अधिक आहे असा भाव. आईचें पुत्रावर जें प्रेम असतें तसें अहेतुक व अमर्याद प्रेम जगतांत कोठें आढळत नाहीं, पण परमेश्वराचें वात्सल्य त्या प्रेमापेक्षांही अधिक आहे. १३. अन्वयः–बा! हे कर्ण (कान), सुरवाद्यांचा सुमधुर (अति गोड) नवनवा रव (ध्वनि) ऐकति. 'ऐकति'=ऐकते झाले; हा भूतार्थी वर्तमान (Historic Present). १४. मधुर आलाप करीत होते=गोड सूर व ताना काढीत होते. १५. हें प्रेमाश्रुबिंदूंचें विशेषण. १६. मोठ्या कौतुकानें. 'डोलणें' ह्या क्रियेवरून मनःसंतोष व आनंद व्यक्त होतो. १७. सार्थान्वयः–सुरहो (देवांनो!) या उपमन्यूची महातपीं शक्ति (खडतर तपश्चर्या करण्याचें सामर्थ्य) [व] हे भक्ति कैसी (कशी) अमळा, (निर्मळ) [व] अचला (स्थिर) [आहे] पहा.

अचळा अमळा कैसी हे या उपमन्युची पहा भक्ती!' ॥ २९
सुर कर जोडुनि वदले 'प्रभुजी! सकळेष्ट यासि अर्पावें, ।
सततैकभक्तचातकपोतातें तोयदेंचि तर्पावें. ॥ ३०
मागायाचा नोहे, देउनि इतरांस हाक, विप्र वर; ।
सत्कारावा त्वां सुप्रभुनेंचि सुपात्र हा कविप्रवर.' ॥ ३१
ब्रह्मप्रमुखसकळसुरसंप्रार्थित देव शिव सदार वदे, ।
प्रभुचा बहु सुख कर्णा, जैसा तव वेणुचा, सदा रव दे. ॥ ३२
'वत्सा! उपमन्यो! तूं झालासि करूनि शुद्ध तप दास, ।
जो न त्वत्सम, माझ्या तो काय भजेल उद्धत पदास? ॥ ३३
तूं शुचि दृढ भक्त असें जाणें, आत्म्यास काय न कळे तें, ।
मी साक्षी वृत्तीतें मुख्य, जसा वायु गायनकळेतें. ॥ ३४
झालों यशोर्थ करिता मी कृतहरिकायमाय मायेतें, ।
करितों भक्तीं, तोकीं तेविं करिल काय माय मायेतें? ॥ ३५
वत्सा! मी केवळ रवि, मम सर्वस्वच्छवि प्रवर दास, ।

---

१. निस्सीम भक्त जो बालचातक त्यातें. नवमेघाचे पाण्यासाठीं चातक पक्षी सदा कंठशोष करीत असतो हें सर्वविश्रुत आहे. २. मेघानें. ३. तृप्त, संतोषित करावें. ४. अन्वयः—विप्र (उपमन्यु) इतरांस हांक देऊनी (शंकरावांचून इतर देवाचा धांवा करून) वर मागावयाचा नोहे (वर मागणारा नव्हे); [यास्तव] हा सुपात्र कविप्रवर (शहाणा द्विजश्रेष्ठ) त्वां सुप्रभुनेंचि सत्कारावा (आदरावा). ह्या ठिकाणीं प्रभुस 'सुप्रभु' व उपमन्यूस 'सुपात्र' अशीं 'सु' उपसर्ग लाविलेलीं विशेषणें दिल्यानें अर्थगौरव साधिलें आहे. ५. ब्रह्मदेवादि सर्व देवांनीं विनविलेला. ६. स्त्रीसह (पार्वतीसह) असणारा. ७. अन्वयः—जैसा तव वेणुचा (तुझ्या मुरलीचा) [तैसा] प्रभुचा (शंकराचा) रव (ध्वनि, शब्द) कर्णा (कानास) सदा बहु सुख दे. ८. भक्त. ९. चढेल, गर्विष्ठ. १०. सार्थान्वयः—जसा वायु गायनकळेतें (गायनास) तसा मी वृत्तीतें मुख्य साक्षी (पाहणारा, जाणणारा) [आहें]. वायूच्या अभावीं गायनकला असंभाव्य आहे; तसेंच माझ्यावांचून मनोवृत्तींचें अस्तित्वही अशक्य आहे. तेव्हां कोणाही मनुष्याचें काय अंतरंग आहे हें मला समजलेंच पाहिजे. मी सर्वज्ञाता आहें, माझ्या परोक्ष कांहींच होणें शक्य नाहीं, असा भाव. ११. सार्थान्वयः—कृतहरिकायमाय (केलें आहे इंद्राच्या स्वरूपानें कपट ज्यानें असा) मी मायेतें (कपटातें) यशोर्थ करिता झालों. भक्तीं (भक्तांचे ठायीं) [मी जेविं] मायेतें (ममतेतें) करितों, तेविं माय तोकीं करील काय? (माझें जितकें भक्तांविषयीं वात्सल्य आहे तितकें प्रत्यक्ष आईचें तरी आपल्या मुलाविषयीं असेल काय? अर्थात् नाहीं, असा भाव.) (पहा मागें, गीति २४). १२. सार्थान्वयः—वत्सा! मी केवळ रवि (सूर्य); [व] प्रवर दास (=उत्तम एकनिष्ठ भक्त) मम सर्वस्वच्छवि (=सर्वसंपत्ति व तेज) होत.

स्वात्म्यापरीस बहुमत मज सर्व स्वच्छ विप्र वेरदास. ॥ ३६
यो भक्तिनें मुदित मी झालों वरदेश सोम, वत्सा! जें ।
हित, तें घे, स्वयशें ह्या निववुनि वर देश, सोमवत् साजें.' ॥ ३७
या प्रभुवचनश्रवणें वाहे प्रेमाश्रु लोचनावाटे, ।
दाटे कंठ, जगीं मी धन्य, असें बंधमोचना! वाटे. ॥ ३८
करमस्तकचि न शिवले क्षितिसि, म्हणति 'नमन हो बरें' गुडघे, ।
बहुहर्ष तो म्हणे प्रभु बहुदुर्गतशिशुसि, 'खोबरें गुड घे.' ॥ ३९
कृष्णा! करी मदंगीं एकैका परम हर्ष पद लोमीं, ।
बहुकंपसंपदास्पद होउनि, ऐसें नमूनि वदलों मी. ॥ ४०

---

१. प्राणांपेक्षांही. २. वर देणाऱ्यास. अर्थसादृश्यः—भक्तीनें वश सत्पतीस करिती साध्वी, मला मज्जन; । प्रेमांभोनिधि संत, त्यांत करितों मी मीनसा मज्जन; ॥ त्यांला मीच, मलाहि तेच रुचले; ते हंस, मी मानस; । श्री त्यांहींच मला, मदीय भजनें त्यांचें सुखी मानस. ॥ ६३ ॥ सर्वस्व मी सज्जनांचें, माझें सर्वस्व सज्जन; । पावेन मी, न पावेल कधीं मज्जन मज्जन. ॥ ६४ ॥ १० मोरोपंत—भक्तभूषण. ३. सार्थान्वयः—वत्सा! मी वरदेश (वरद+ईश=वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ) सोम (स+उम=पार्वतीसहवर्तमान असणारा असा), या भक्तिनें मुदित (प्रसन्न) झालों; जें हित तें घे; [व] हा वर देश (उत्तम प्रांत) स्वयशें निववुनि (शांत करून) [तूं] सोमवत् (चंद्राप्रमाणें) साजें (शोभायमान हो). चंद्राचे ठायीं शीतलता व सतेजता असे दोनही गुण आहेत; व हे उपमन्यो! त्वां संपादिलेल्या यशानें तुझ्या अंगीं आलेलें तेज प्रखर नसून दुसऱ्याचा ताप हरण करणारें आहे; असा भाव. टीपः—संस्कृतामध्यें 'वत्' प्रत्यय लागून क्रियाविशेषण होतें. तेव्हां 'सोमवत्' हें विशेषण नसून क्रियाविशेषण आहे; ह्याचा संबंध 'साजें' ह्या क्रियापदाकडे. ४. डोळ्यांतून. ५. संसाररूपी बंधापासून मुक्त करणाऱ्या श्रीकृष्णा! ६. सार्थान्वयः—करमस्तकचि (हात व माथा हेच केवळ) क्षितिसि (भूमीस) न शिवले; तर गुडघे[ही] बरें नमन हो म्हणति (चांगला प्रणिपात घडो असें म्हणूं लागले. अर्थात् साष्टांग नमस्कार मीं घातला असा भाव). 'खोबरें गुड घे' (हें गुळ खोबरें घे=हा खाऊ घे) [असें] तो बहुहर्ष (=आनंदानें भरलेला, आनंदरूप प्रभु) बहुदुर्गत शिशुसि (=अगदीं कनिष्ठ स्थितीस गेल्या मुलास, दुःखानें कुजबुजलेल्या भक्तास) म्हणे. ७. एकैका लोमीं=केसागणिक. ८. परमहर्ष पद करी=अत्यानंद पाऊल ठेवी. हा प्रयोग केवळ संस्कृतपद्धतीचा आहे. एकैका लोमीं परम हर्ष पद करी=हर्षानें माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले, आनंदानें अंगावर कांटा उभा राहिला. जसा आश्चर्यानें किंवा आकस्मिक भीतीनें तसाच हर्षानेंही अंगावर कांटा उभा राहतो; त्याला 'लोमहर्षण' असें संस्कृतांत म्हणतात. उदाहरणार्थः—इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः । संवादमिममश्रौषमद्भुतं **रोमहर्षणम्** ॥ गीता १८।७४. श्रीवासुदेवपार्थांचा हा संवाद महाद्भुत । राया! आयकिला अंगीं कांटे अद्यापि माझिया ॥ वामनपंडित,—गीतासमश्लोकी. ९. बहु+कंप+संपत्+आस्पद=पुष्कळ जी कंपरूप संपत्ति तिचें स्थान. "संपदास्पद होऊन=थर थर कांपत.

‘झालों[1] धन्य, मजपुढें तो कीं तूं प्रभु उभा; सुरासुर ज्या ।
परम गुरु म्हणति, वंदिति यच्चरणाच्या सुभासुरा सुरजा. ॥ ४१
धन्यतर कवण मदितर? हे सुरही, करुनिही महायास[2], ।
ज्याचे पाय न पाहति, त्या प्रभुला पात्र मी पहायास. ॥ ४२
या जगदवनाकरितां[3] द्रुत गिळिता होय जो अज[4] गैरातें[5], ।
त्या तुज मी देखतसें साक्षात् काळाखुच्या[6] अजगरातें[7]. ॥ ४३
क्षम[8] दक्षवामपार्श्वांपासुनि[9] जो विधिसि[10] हरिसि[11] निर्माया[12], ।
त्यां[13] तुज पाहें, बा! हें नवल भवलयार्थ करिसि निर्माया! ॥ ४४
त्यांचा[14] रचिता तूं कीं, सूर्या, चंद्रा, यमा, मरुद्राजा ।
जो दुःसह, किंबहुना कांपे ब्रह्मांडधाम रुद्रा ज्या.’ ॥ ४५
ऐसें[15] बोले, हांसे, उद्धरिला तो जसा करी, नाच ।
ब्राह्मण हा ब्रह्मण्या! देवा! तैसा पुरे करीनाच! ॥ ४६
कृष्णा सजलजलद[16]हरिनीलनिभानंदकंदनवदेहा! ।

---

१. सार्थान्वयः–धन्य झालों (कृतार्थ झालों) कीं (कारण) ज्या सुरासुर (देव व दैत्य) परम गुरु (श्रेष्ठ गुरु) म्हणति [व] यच्चरणाच्या (ज्याच्या पायाच्या) सुभासुरा (अत्यंत तेजस्वी) सुरजा (उत्तम रजःकणाला) वंदिती, तो तूं प्रभु मजपुढें उभा. २. अतिश्रम. ३. जगाचें संरक्षण व्हावें ह्या हेतूनें. ४. जन्मरहित, ईश्वर. ५. कालकूटविषातें. ६. काळरूप उंदिराच्या. ७. सर्पविशेषातें–सर्प उंदीर गिळून टाकतात हें सर्वत्र प्रसिद्ध आहेच. ८. समर्थ. ९. उजव्या आणि डाव्या बाजूपासून. १०. ब्रह्मदेवास. ११. विष्णूस. १२. उत्पन्न करण्यास. १३. अन्वयः–त्या तुज [मी] पाहें; बा! निर्माया! (=मायारहिता! ज्ञानस्वरूपा!) [तूं] हें (=माझ्या सारख्या अज्ञ व क्षुद्रबाळकालाही दर्शन देणें इत्यादि) नवल [केवळ] भवलयार्थ (=संसाराचें निर्मूल व्हावें म्हणून) करिसी. १४. सार्थान्वयः–सूर्या, चंद्रा, यमा, मरुद्राजा (मरुद्देवांचा राजा–इंद्र–त्याला) जो दुःसह (अर्थात् ज्याच्या पुढें सूर्यादि देवांचा निभाव लागत नाहीं) किंबहुना (सारांश) ज्या रुद्रा (रुद्रावतारास) ब्रह्मांडधाम (ब्रह्मांडरूप गृह) कांपे (भितें) त्याचा (त्या रुद्राचा) रचिता (उत्पन्नकर्ता) तूं कीं (खास, निश्चयें तूंच आहेस). टीपः–युगाचा अंतकाल आला असतां सर्व स्थावर जंगम सृष्टीचा संहार करण्यासाठीं महादेव रुद्रावतार उत्पन्न करितो. १५. सार्थान्वयः–हा ब्राह्मण (मी उपमन्यु) [हे] ब्रह्मण्या! (श्रीकृष्णा!) देवा! ऐसें बोले, हांसे, [आणि] जसा [त्वां=कृष्णानें] उद्धरिला (=उद्धरलेला) तो करी (=तो प्रसिद्ध गजेंद्र), तैसा हा ब्राह्मण नाच पुरे करीनाच! गजेंद्राचा उद्धार झाल्यावर तो जसा नाचत सुटला, तसाच शिवदर्शन झाल्यावर उपमन्यू जो नाचत सुटला, तो मुळीं थांबेच ना, हा भाव. १६. सजलजलद+हरिनील+निभ+आनंदकंद+नव+देहा=पाण्यानें भरलेले काळे ढग+इंद्रनीळ+समकांति+आनंदाचें मूळ+अपूर्व+शरीरा=काळे ढग व इंद्रनीळ यांप्रमाणें श्यामसुंदर, अत्यंत आनंद देणारा व अपूर्व असा आहे देह ज्याचा अशा श्रीकृष्णा!

वरदा स्मरदाहकरा विश्वेशा[1] करुनि वंदन वदे हा. ॥ ४७
'देसि[2] यशाचें दासा जरि आजि, करुनि अनुग्रहा, चवर; ।
तरि भव्य भक्ति दे मज, द्यावा घ्यावा अनुग्र हाच वर. ॥ ४८
जाणावें सुज्ञानें म्यां भूतभविष्यवर्तमानातें, ।
स्वप्नीं न सांपडावें दुस्तरविपदंधगर्तमानातें[3]. ॥ ४९
क्षीरौदन[4] भक्षावें म्यां अक्षयसर्वबांधवांसहित, ।
त्वत्सान्निध्यें व्हावा माझा आश्रम सदा जगन्महित[5].' ॥ ५०
संप्रार्थिला[6] चराचरगुरु[7] विश्वेश्वर मला म्हणे 'साधो! ।
बाधो आधि[8] व्याधि[9] न; जें त्वद्वांच्छित[10] असेल, तें साधो[11]. ॥ ५१
अजरामर[12] हो; होतिल तेहि, जसा तूं, तसे तव ज्ञाती[13]. ।
अनिवार्या[14] काळाची गति; परि न करिल तुझी अवज्ञा ती. ॥ ५२
दिव्यज्ञान[15]समन्वित होसिल सन्मुनिजनासि सत्कार्य; ।
बहुमत यशासि हो तव नाम, जसें सन्मनासि सत्कार्य. ॥ ५३
दिव्यतपस्तपनाच्या[16] तेजा तव देहसुरनग[17] न [18]सोडू; ।

---

१. सार्थान्वयः—हा (मी उपमन्यु) वरदा (वर देणान्यास) स्मरदाहकरा (मदनाचें भस्म करणान्यास) विश्वेशा (जगत्प्रभूस) वंदन करुनि (नमस्कार करून) वदे (बोलता झाला). २. सार्थान्वयः—अनुग्रहा करुनि (कृपाळु होऊन) आजि (आज, सांप्रत) जरि दासा (भक्ताला) यशाचें चवर (चवरी) देसि (देतोस—अर्थात् दासावर जर यशाची पाखर घालणार असलास तर) भव्य (उत्कृष्ट—अर्थात् दृढ) भक्ती दे (तुझे ठायीं माझी अचल भक्ति राहो असा भाव). हाच अनुग्र (=सौम्य, ज्यांत लेश मात्रही भीति नाहीं असा) वर [कोणींही देणारानें] द्यावा [व घेणारानें] घ्यावा. कारण जर वर अशा सौम्य प्रकारचा नसेल, तर तो वरही अनिष्टावह होतो, ही गोष्ट रावण, भस्मासुर, सिंदूर, हिरण्यकशिपू वगैरेंच्या इतिहासावरून अगदीं उघड आहे. ३. दुस्तर+विपत्+अंध+गर्त+मानातें=तरावयास कठीण अशा विपत्तिरूप अंधेऱ्या खळग्याच्या विस्ताराला, आटोक्याला. अर्थात् विपत्ति स्वप्नांतसुद्धां नसो, असा या अर्धाचा भाव. ४. दूधभात. ५. जगानें मानिलेला असा, जगाच्या आदरास पात्र असा. ६. विनविलेला. ७. स्थावर व जंगम सृष्टीचा जनक. ८. मनस्संताप, दुःख. ९. रोग, दुखणें. १०. त्वत्+वांच्छित=तुझा मनोरथ, तुझें प्रिय. ११. सफल होवो. १२. वृद्धापकाळरहित व मृत्युरहित. १३. आप्त, बांधव. १४. सार्थान्वयः—काळाची गति अनिवार्या (मृत्यु कोणाच्यानेंही चुकवितां येणार नाहीं;) परि (परंतु) ती (कालगति) तुझी अवज्ञा न करील (काळाचा पगडा तुजवर बसणार नाहीं). १५. सार्थान्वयः—दिव्यज्ञानसमन्वित (दिव्य ज्ञानानें युक्त) [तूं] सन्मुनिजनासि सत्कार्य (आदर करण्यास, मान देण्यास योग्य असा) होसिल; जसें सत्कार्य (सत्कृत्य) सन्मनासी (सुजनांच्या अंतःकरणास) [बहुमत] [तेविं] तव नाम यशासि बहुमत (प्रिय) हो (होवो). तुझ्या नांवाचा महिमा सर्वत्र पसरो, असा भाव. १६. कडक अशा तपश्चर्यारूप सूर्याच्या. १७. देहरूप मेरुपर्वत. मेरूवर सूर्य सर्वकाळ तळपत असतो. १८. सोडो.

शोभो बहु मुनिपद्द हें त्वां, द्विजराजें असें गगन सोई. ॥ ५४
तुज भेटोनि निवाया येतिल सुकृतक्रियापर महर्षी, ।
वाहुनि मस्तक चरणीं, होतिल, करुनि प्रिया, परमहर्षी. ॥ ५५
आहे आलिंगुनियां मजला मैच्छक्ति हे असी अतुला, ।
राहेल यौवनश्री आलिंगुनि सर्वदा असीच तुला. ॥ ५६
वत्सा! उपमन्यो! म्यां तुजला दिधलाचि राशि दुग्धाचा, ।
बहुमत मज भक्ताचा, ताताला जेवि बोल मुग्धाचा. ॥ ५७
तूं इच्छिसील जेथें, तेथें दुग्धाब्धिचें सदा तुजला, ।
सान्निध्य घडो; टकळा घालूनि न वत्स सुरभिचा सुजला. ॥ ५८
श्रुतिवक्तया मज 'घे' या उच्चारण कठिण काय वाणीचें? ।
घेणें रुचतें, परि बा! देणें न रुचे कधींहि वाणीचें. ॥ ५९
[१०] जें अल्पदान, नोहे प्रभुस प्रभुयाचकासही शुभ तें, ।
यास्तव या स्तवनार्हें म्यां तुज दुग्धाब्धिचें दिलें दुभतें. ॥ ६०
आकल्प क्षीरौदन अमृतोपम सौंप्तवर्ग जेव, रहा; ।
[१२] ते काय? स्वजनाच्या विश्लेषें म्हणवितील जे वर 'हा!' ॥ ६१

---

१. चंद्रानें (पक्षीं) ब्राह्मणश्रेष्ठानें. २. नक्षत्रयुक्त असें. ३. पुण्यकृत्यास वाहिलेले. ४. माझी स्त्री, पार्वती. ५. अनुपम. ६. शिशूचा, बालकाचा. ७. या षष्ठीचा संबंध 'सान्निध्य' या नामाकडे. ८. अन्वयः–सुरभिचा वत्स टकळा घालोनि (ध्यास धरून) न सुजला (आतुर झाला नाहीं). सुरभि ही कामधेनु असल्यामुळें तिच्या वासराला कोणत्याही गोष्टीचा घोष घेऊन आतुर होण्याचें कारणच पडत नाहीं. तेव्हां शंकर म्हणतात, मी कामधेनूच आहें, आणि माझे भक्त हे वत्सासारखे आहेत; तुम्हीं कोणतीही इच्छा केलीत, कीं ती लागलीच पुरी होईल, तुम्हांला काळजी म्हणून कशी ती शिवूं देणार नाहीं. टकळा=ध्यास, घोष, स्मरणी. ९. सार्थान्वयः–श्रुतिवक्त्या (=वेद बोलणाऱ्यास–परमेश्वरमुखांतून वेद निघाले हें सुप्रसिद्ध आहेच) मज 'घे' या वाणीचें (=वररूप भाषणाचें) उच्चारण कठिण काय? (अर्थात् नाहीं.) बा (=हे उपमन्यो!) वाणीचें (कमीपणाचें) घेणें रुचतें (चालतें), परि (परंतु) वाणीचें (कमीपणाचें देणें कधींही न रुचे). थोडें घेतलेलें मला पुरवतें व पण जें द्यावयाचें तें मात्र थोडें कधींही पुरवणार नाहीं. थोर मनाच्या मनुष्याच्या वृत्तीचें चित्र पंतांनीं एका गीत्यर्धातच अप्रतिम काढिलें आहे. १०. सार्थान्वयः–जें दान अल्प (थोडें), तें प्रभुस (=समर्थास, थोरामोठ्यास) [व] प्रभुयाचकासहि (=थोरा मोठ्यांजवळ याचना करणाऱ्यासाही) शुभ (हितप्रद) नोहे (होत नाहीं). अपुऱ्या दानाविषयीं पंत वामनचरित्रांत लिहितातः–जरि याचितार्थ न पवे सुखरोमांचाढ्य आंतवरि काय। तत्काळ याचकाचा जें न करी दान तेंहि तरि काय? ॥–गी० ९५. ११. आपल्या बंधुवर्गासहवर्तमान. १२. सार्थान्वयः–जे वर (प्रसाद) स्वजनाच्या विश्लेषें (वियोगानें) हा (हाय) म्हणवितील (म्हणावयास लावितील) ते काय? (त्यांची किंमत काय?)

कल्पांतीं पाव मला; तों वस सेवीत दुग्धभक्तातें; ।
ने विसंबें, न उपेक्षीं मी सामान्याहि मुग्ध भक्तातें. ॥ ६२
बांधववृंद तुझें कुळगोत्रहि आकल्प मुदित राहेल, ।
कृतलोककवळ काळ क्रोधकुटिलदृष्टिनें न पाहेल. ॥ ६३
दिधली प्रसन्नचित्तें तुज शाश्वतभक्तिसंपदा साची; ।
म्यां भक्तत्व दिल्यावरि, मति कां पावेल कंप दासाची? ॥ ६४
बा! या त्वदाश्रमीं मी सान्निध्य करीन सर्वदा साचें, ।
स्थळ कैलासाहुनि मज बहुमत उटजादि सर्व दासाचें. ॥ ६५
स्वस्थ येथाकाम रहा, उत्कळेलें करूं नको लेशें, ।
बुडतां उद्धार करी क्षितिचें रदंष्ट्रेंकरून कोलेश. ॥ ६६
संरक्षिले शिशु पशुहि, धरिला मंथाद्रि पाठिवरि; कां म्यां ।
भेटि न द्यावी? मजला इच्छा होतांचि आठिव रिकाम्या.' ॥ ६७
यांपरि महाप्रसादें करुनि त्रिजगांत धन्य हा विप्र, ।
तत्काळ गुप्त झाला रविकोटिसमप्रभ प्रभु क्षिप्र. ॥ ६८
कृष्णा! विलोकिला म्यां यापरि भगवान् समाधि साधूनी, ।
यांचि उपायें केला नाहींच भवश्रमाधि साधूंनीं. ॥ ६९

---

म्हणूनच परेश्वरानें 'सासवर्ग जेव, रहा' असें म्हटलें. आप्तजनांच्या अभावीं कोणत्याही सौख्यांत गोडी वाटत नाहीं. 'ज्या वैभवानें शत्रु झुरत नाहीं, व मित्र संतोष पावत नाहीं तें काय कामाचें' ह्या अर्थाचें संस्कृत सुभाषित सुप्रसिद्ध आहेच.

१. भेट, मज सन्निध ये. २. विसरत नाहीं. ३. हेळसांड करीत नाहीं. ४. साधारण. ५. अन्न, लाह्यांगोळ्या. ६. जगाचा केला आहे घांस ज्यानें असा. ७. खरी. ८. पर्णकुटिकादि. हें 'स्थळ'ह्याचें विशेषण. पहा, 'माझ्या वाडे नाहीं कामाचे, साधुची झोंपडी बरी ॥ उद्धवा! चल जाऊं विदुरा घरीं.' ९. मन मानेल त्याप्रमाणें. १०. काळजीला. ११. लवमराही, किंचित् सुद्धां. १२. प्राणिमात्र. १३. विष्णूचा वराहावतार. (पंतकृत अवतारमाला गीति १-१२ पहा.) १४. सार्थान्वयः—म्यां भेटी कां न द्यावी? (=मीं भेट कां देणार नाहीं? मी तूं म्हणशील तेव्हां भेटेन.) [बा! उपमन्यो! तुला भेटीची] इच्छा होतांच, रिकाम्या मजला (=भक्तांना भेटी द्यावयाला जो मी नेहमींच रिकामा आहें, त्या मला) आठिव, [मी आपला ठेवलेलाच म्हणून समज]. संरक्षिले शिशुपशुहि धरिला मंथाद्रि पाठिवरि काम्या—हा सर्वसंग्रहाचा पाठ, व 'काम्या'वर 'मनोरथ पूर्ण करणारी' अशी टीप. १५. अन्वय—यापरि (याप्रमाणें) महाप्रसादें (मोठ्या वराच्या योगानें) हा विप्र (उपमन्यु) त्रिजगांत धन्य (कृतार्थ) करुनि, रविकोटिसमप्रभु (कोटिसूर्यांप्रमाणें तेज आहे ज्याचें असा) प्रभु शंकर तत्काळ (त्याच वेळीं) क्षिप्र (सत्वर) गुप्त झाला. १६. समाधि साधूनी=भगवच्चिंतन किंवा तप संपादून. १७. सार्थान्वयः—यांचि उपायें (=समाधिच्या जोरावर) साधूंनीं (=संतांनीं) भवश्रमाधि (=संसा-

झालें प्राप्त सकळ जें, दे अनुकंपा करूनि मज भव तें; ।
आहे, पहा, कसें हें ब्रह्मज्ञ ब्रह्मवृंद मजभवतें. ॥ ७०
गंधर्व, सिद्ध, विद्याधर, किन्नर, अप्सरा, पहा, गा! या ।
येतां इकडे, न म्हणे शतमख, 'जावूं नका, रहा गाया.' ॥ ७१
तरु गुल्म लता देती सर्वऋतूंच्या फुला, फळा, सुरसा; ।
हा आश्रम शतमखसा, ताप सकळ यापुढें बळासुरसा. ॥ ७२
हें वन मदाश्रमीचें, तरुपंचक जेविं नंदनवनीं तें; ।
विपुळें सुखें मज प्रभु पोषी, तुज जेविं नंद नवनीतें. ॥ ७३
हा उपमन्युमुनि पयोनिधिच्या सेवूनि अक्षय दुधाला, ।
जेविं तव यश प्राशुनि, तृप्त करुनि साधुलक्ष, यदु धाला. ॥ ७४
यां स्थानीं लक्ष्मीचें माहेर क्षीर, हात यादानें—।
तैसें न जोडितां म्यां, आहे, रक्षी रहातया दानें. ॥ ७५
या आश्रमीं अनुभउनि विविधा अवलोकनीं चमत्कारा, ।
सर्व स्वर्गस्थ म्हणे 'हा वासवलोक नीच मत्कारा.' ॥ ७६

राची दगदग) नाहींच केला (=अजीबात नष्ट केला). साधुसंत जे संसाराच्या त्रासांतून मुक्त होतात, ते ह्याच समाधिसाधनाच्या जोरावर होत, असा भाव.

१. दया, कृपा. २. इंद्र. ३. अन्वयः—हा आश्रम शतमखसा (इंद्राप्रमाणें) [व] सकळ ताप यापुढें बळासुरसा (बलदैत्याप्रमाणें). बळदैत्यास इंद्रानें मारिलें. ४. अन्वयः—जेविं नंदनवनीं तें तरुपंचक (पांच कल्पवृक्ष) [तेविं] हें मदाश्रमीचें वन. ५. क्षीरसागराच्या. ६. सार्थान्वयः—जेविं [तुझा पूर्वज] यदु तव (=तुझें, श्रीकृष्णाचें) यश [स्वतः] प्राशुनि [व] साधुलक्ष (=लक्षावधि संतांस) तृप्त करुनि धाला (तृप्त झाला). यदुनेच वंश यादव होत; व परमात्मा श्रीकृष्ण त्या कुलांत उत्पन्न झाले. म्हणजे अर्थात् परमात्म्याच्या कीर्तिरूप अमृतानें यदु स्वतः तृप्त झाला व त्यानें हजारों संतांसही तृप्त केलें. वंशजाच्या सत्कृत्यामुळें व सुकीर्तीनें पूर्वजांचा उद्धार होतो व इतर लोकांचेंही त्यांत हित होतें, हें येथें पर्यायानें सुचविलें आहे. ७. सार्थान्वयः—लक्ष्मीचें माहेर [जें] क्षीर (=क्षीरसमुद्र) [तें], [जसें] यादानें (=जलचरानें), तैसें मी[ही] हात न जोडितां (=जलचराप्रमाणें मीही प्रार्थना करीत नसतांही) या स्थानीं आहे; [व तें] दानें (=क्षीरदानें) रहातया (=येथें राहणाऱ्या प्रत्येकाला) रक्षी (=पोशितें). ज्याप्रमाणें जलचरांनीं कोणत्याही तऱ्हेची विनवणी केली नसतांही, त्यांस जलाशय लाभतात, त्याप्रमाणें प्रभुकृपेनें येथें मला क्षीरसागर आयताच लाभला आहे, हा उपमन्यूच्या भाषणाचा मतलब. ८. अन्वयः—या आश्रमीं, विविधा चमत्कारा अवलोकनीं अनुभउनि (=पाहून) सर्व स्वर्गस्थ (=स्वर्गांत राहणारे, देवप्रभृति सर्व) म्हणे 'हा नीच वासव लोक (=इंद्रलोक) मत्कारा [होय]' (हा आमचा इंद्रलोक केवळ बंदीखाना आहे).

बहुकुतुकातें येथें भक्तभवतमोरवि[1] प्रसाद वितो[2], ।
लोकांस 'पहा शिवघन,' ऐसें हा मोर विप्र[3] सौंदवितो." ॥ ७७

---

## अध्याय पांचवा.

श्रीकृष्ण म्हणे, 'धर्मा! माझ्या आलेंचि तें अनुभवातें[5], ।
नमिता झालों होउनि रोमांचप्रोल्लसत्तनु[6] भवातें[7]. ॥ १
उपमन्युप्रति वदलों, 'विप्रेंद्रा! त्रिभुवनांत तूं धन्य, ।
प्रभुवरवरप्रसादालंकृत[8] ऐसा न ऐकिला अन्य. ॥ २
हा तीर्थराज[9] आश्रम, कीं जो झाला शिवासि आवास[10], ।
यांचें[11] सुयश म्हणेलचि अमृताशननायकासि[12], "'आ[13]' वास[13]." ॥ ३
होतील[14] धन्य, देतिल कलिला बहु धाक विप्र या गाते; ।
त्वदधिक नच म्हणतिल शुचिसलिला बहुधा कवि प्रयागातें. ॥ ४
'मुनिसिंहा[15]! मजहि प्रभुदर्शन देईल काय? बा[16]! पाहें. ।
तुजपरि[17] धन्य यशस्कर वाटेल अपत्य मायबापा हें?' ॥ ५
ऐसें पुसतां धर्मा! ध्यानीं आणुनि तया अनादिस[18] तो, ।

---

१. भक्तांच्या संसाररूप अंधकाराचा (नाशकर्ता) सूर्य. २. प्रसवतो; देतो. ३. उपमन्यु. ४. आनंदानें शब्द करून सांगतो आहे. 'साद घालणें' 'सादविणें' हा शब्द पोपट, मोर इत्यादिकांच्या आनंदभरित शब्दास लावतात. येथें 'मोर'शब्द श्लिष्ट असून, कवीनें आपलें नांव त्यांत ध्वनित केलें आहे. ५. प्रत्ययास. ६. रोमांच+प्रोल्लसत्+तनु=रोमांचांनीं उल्लास पावणारें अर्थात् शोभणारें शरीर आहे ज्याचें असा. ७. शंकरातें. ८. महादेवानें दिलेल्या वराच्या अनुग्रहानें शृंगारलेला, शोभलेला. ९. सर्व तीर्थांत श्रेष्ठ. १०. स्थान. ११. आश्रमाचें. १२. अमृत+अशन+नायकासि=अमृतभक्षण करणारे जे देव त्यांचा मुख्य इंद्र त्याला. १३. आ वास=तोंड पसर. अमृतप्राशनापेक्षांही ह्या आश्रमाच्या यशांत अधिक गोडी आहे, असें प्रत्यक्ष इंद्रासही वाटेल. १४. सार्थान्वयः—या (आश्रमाला) गाते (गाणारे) विप्र धन्य होतील, [व] कलिला बहुधाक देतील; कवि (शहाणे) शुचिसलिला (पुण्योदका) प्रयागातें (त्रिवेणीसंगमक्षेत्र त्यातें) त्वदधिक नच म्हणतील. गंगा, यमुना व सरस्वती या तीन पवित्र नद्यांचा संगम जेथें झालेला आहे, त्या क्षेत्रास प्रयाग म्हणतात. याच्या जवळच अलाहाबाद हें शहर आहे. १५. मुनिश्रेष्ठा उपमन्यो! सिंह, व्याघ्र, शार्दूल व पुंगव हे शब्द कित्येक कर्मधारय समासांत उत्तरपद असले, म्हणजे त्यांचा अर्थ श्रेष्ठ असा होतो. १६. सर्वसंग्रहपाठः—बापा! हें. १७. सार्थान्वयः—हें अपत्य (=मी कृष्ण) तुजपरि (=तुझ्यासारखें) मायबापा धन्य (=कृतकृत्य) [व] यशस्कर (=कीर्ति देणारें) वाटेल काय? १८. शंकरास—आदि नाहीं ज्याला त्यास.

मुनि मज म्हणे, 'मुकुंदा! निकटचि[1] तव अभ्युदय[2] मना[3] दिसतो. ॥ ६
तूं[4] देखसिल असंशय देवांमाजी महायशा, साव्या, ।
कीं प्रभुनें विघ्नचमू भजकां होउनि सहाय शासाव्या. ॥ ७
देइल शिव आठ, शिवा[5] आठ, पुन्हा तीच आठ वर; हा तो ।
भगवत्प्रसाद[6]; जेणें कळतो सर्वार्थ, आठव रहातो. ॥ ८
स्वस्वाश्रमीं[7] तपें अवलोकाया कामदा श्रमतयातें ।
द्रुत सिद्धिप्रद नसता, तरि रुचता कां मदाश्रम तयांतें? ॥ ९
हे मुनि सहस्रशः[8] प्रभुकरुणेला[9] पात्र जाहले असती. ।
होइल मदाश्रमींची विफळा कृष्णा! तुलाचि कां वसती[10]. ॥ १०
कठिनींच[11] कठिन, मृदुलीं मृदुल, तुझें हृदय बा! जसें तोय; ।
देवांसि तुजअशासी श्लाघ्य समागम यदूत्तमा! होय. ॥ ११
ब्रह्मण्य[12] श्रद्धावान् तूं, शीलविजितसुरापगातोया[13]! ।

---

१.समीप.२. वृद्धि, भाग्य. ३.माझ्या (उपमन्यूच्या) मनास. ४.सार्थान्वयः-देवांमाजी (देवांमध्यें) महायशा (मोठी आहे कीर्ति ज्याची त्यास) [व] साव्या (भोळ्यास) तूं असंशय (खास) देखशील; कीं (कारण) भजकां (भक्तजनांस) सहाय होऊनि (मित्र होऊन) विघ्नचमू (विघ्नांच्या सेना, पुष्कळ विघ्नें) शासाव्या (दंडाव्या, मथाव्या-अर्थात् विघ्नपरंपरा दूर करावी). टीप-'साव्' हें विशेषण असून ह्याचा अर्थ 'निष्कंटक' असा आहे. ह्यावरून लक्षणेनें 'भोळा.' शंकराची भोळेपणाबद्दल किती प्रसिद्धि आहे, हें सांगणें अनावश्यक आहे. ५. पार्वती. ६. पूर्वार्धांतील 'हा तो' ह्या शब्दांसहित सार्थान्वय-हा तो भगवत्प्रसाद; जेणें (ज्या प्रसादाच्या योगानें) सर्वार्थ (सर्व गोष्टी) कळतो [व त्याचा] आठव (स्मृति) रहातो. ७. सार्थान्वयः-कामदा (=सर्व इच्छा पुरविणाऱ्या शंकरास) अवलोकाया स्वस्वाश्रमीं (=आपापल्या आश्रमांत) तपें श्रमतयातें (=तपाचे थोर आयास करणाऱ्यास) [जर हा मदाश्रम] द्रुत सिद्धिप्रद(=अल्पावकाशांत शिवदर्शनरूप सिद्धि करून देणारा)नसता, तरि तयांतें मदाश्रम (=माझा-उपमन्यूचा-आश्रम) कां रुचता (=आवडता)? तेव्हां माझ्या आश्रमांत तात्काळतोच सिद्धि प्राप्त होतेच, असा भाव. सर्वसंग्रहपाठः-स्वस्वाश्रमीं तपें अवलोकाया कामदा श्रमत यातें, । ८. हजारों. ९.शंकराच्या दयार्द्रतेस. १०.राहणें. तुझें वास्तव्य विफल होणार नाहीं, म्हणजे तुला प्रभुदर्शन खास घडेल, असा गीतीचा भाव. ११. सार्थान्वयः-बा! (हे कृष्णा!) जसें तोय [तसें] तुझें हृदय, कठिनींच कठिन (कठोराशीं कठोर), मृदुलीं मृदुल (मऊ असेल त्याचे ठायीं मऊ) [असें आहे;] [तेव्हां] तुज अशासी (=तुझ्यासारिख्या बरोबर) समागम देवांसि [ही] श्लाघ्य (=कीर्तिप्रद) होय. 'देवासि'-असा सर्वसंग्रहाचा पाठ. अर्थसादृश्यः-वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि । लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति. ॥ (उत्तररामचरित्र.) गारेच्या रूपानें पाणी अत्यंत कठिण असतें, परंतु तेंच द्रवरूपानें अत्यंत मऊ असतें, म्हणून येथें त्याची कठोरांत कठोर, पण मृदूंत मृदु अशा कृष्णाच्या मनाला उपमा दिली आहे. १२. ब्राह्मणांसंबंधें आदरपूर्ण. १३. शील+विजित+सुर+आपगा+तोया=स्वभावानें जिंकिलें आहे भागीरथीचें उदक ज्यानें असा. भागीरथीचें

बहु शुचि तव यश, कृष्णा! व्हाया निर्मळ सुराप[1] गातो यीं[2]. ॥ १२
कथितों सर्वार्थप्रद[3] जप्य[4] महामंत्र मी तुला, ऐणें[5] ।
वश[6] होइजेल देवें, जेंवि मधुरगीतमोहितें एणें.' ॥ १३
नमुनि[7] मुनिप्रति वदलों 'भगवंता! हा तव प्रसादास ।
पावो, घनास समयीं व्हाया सुसमृद्ध वप्रसा, दास.' ॥ १४
झाले[8] मुनिवाक्श्रवणें मज एक मुहूर्त आठ वासर ते, ।
देहाच्या गेहाच्या होउं न देतांहि आठवा सरते. ॥ १५
सांगे 'सहस्रनाम' प्रभुचें, प्रकटी[9] जयासि[10] [11]तंडी, तें, ।
जें दूर [12]अविद्येतें करि, जेविं [13]ज्वलनतेज थंडीतें. ॥ १६
दीक्षा[14] देउनि [15]सुदिनीं स्तवराजाचा करूनि उपदेश, ।
सांगे सांबाराधन[16], कीं ज्यां व्हावें [17]सुसिद्धिसुपदेश. ॥ १७
[18]दीक्षित [18]होउनि झालों त्या मुनिवृंदांत [19]आगतप्रथ मी, ।

---

उदक शीतता, स्वच्छता व शुचिता ह्याबद्दल प्रसिद्ध आहे; पण हे तीनही गुण तुझ्या स्वभावांत इतके आहेत, कीं त्यांयोगें तुझ्या स्वभावानें भागीरथीच्या उदकास मागें सारिलें आहे.

१. मद्यपी, दारू पिणारा. २. ह्या तुझ्या यशातें. ३. सर्व कल्याणातें देणारा. ४. घोकण्याचा, मनांतल्यामनांत म्हणण्याचा. ५. ह्यानें. ६. देवें वश होइजेल=प्रभु महादेव वश केला जाईल. प्रयोग ध्यानांत धरण्यासारखा आहे. 'वश होणें' हें संयुक्त क्रियापद आहे; व ही वश होण्याची क्रिया 'देवें' (प्रभूच्या हातून) 'एणें' (ह्या मंत्राच्या जोरावर) घडून आली जाईल. उत्तरार्धाचा सार्थान्वयः-जेंवि मधुरगीतमोहितें एणें (हरिणानें) [तेविं] एणें (ह्या मंत्रानें) देवें वश होइजेल. ७. सार्थान्वयः-नमुनि मुनिप्रति (उपमन्युऋषीस) वदलों 'भगवंता! घनास वप्रसा (शेताप्रमाणें), हा दास (=मी कृष्ण) सुसमृद्ध (=कृतार्थ; पक्षीं धान्ययुक्त) व्हाया, समयीं (=वेळेवरच) तव प्रसादास पावो (=तुझा अनुग्रह मिळवो). ८. सार्थान्वयः-मुनिवाक्श्रवणें (उपमन्युऋषीचें बोलणें ऐकण्यानें) देहाच्या (स्वशरीराच्या) [आणि] गेहाच्या (=घराच्या) आठवा (=आठवणीस, स्मृतीस) न होऊं देतांही सरते (=सरणारे) ते आठ वासर (=आठ दिवस) मज एक मुहूर्त (=एका क्षणासारखे) झाले. ते आठ दिवस एका पळासारखे केव्हांच गेले व त्यांत स्वतःचें भानही मला राहिलें नाहीं व घरचीही आठवण झाली नाहीं. पहा, 'अविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत्' उत्तररामचरितम्. ९. लोकांत प्रथमच प्रसिद्ध करी. १०. ज्या सहस्रनामाला. ११. उपमन्यूचा गुरु. १२. अज्ञानातें. १३. अग्नीचा कडकपणा. १४. शिवदीक्षा. १५. सुमुहूर्तावर. १६. शंकर प्रसन्न होतील अशी त्याची भक्ति. १७. चांगली सिद्धि (=यश) ज्यांत आहे, अशा उत्तम पदाचा (=स्थानाचा, अवस्थेचा) ईश (=स्वामी); पूर्णपणें यशस्वी. १८. दीक्षित होउनि=दंड, कुश, मेखला इत्यादि घेऊन, मी यथाविधि दीक्षा घेऊन. १९. मिळाली आहे प्रसिद्धि ज्याला असा, विख्यात.

करुनि[1] फळाशन होतों मासीं नियमांत जागत प्रथमीं. ॥ १८
उदकाशन द्वितीये[2]पासुनि संपूर्ण पांचवा मास[3]; ।
कीं[4] परमार्थपरां तप 'मीच' म्हणे, 'हित; न सांचवा मास.' ॥ १९

शंभुपदीं शिर होतों[5] एक पदावरि उभा वहायास, ।
परमार्थेच्छु कवण बुध न करिल सुतपीं शुभावहायास[6]? ॥ २०
षष्ठारंभीं[7] दशशतरवितेजाचा[8] विलोकिला पुंजे[9], ।
जो विविधवर्णशतमखचापशतद्युतिविलासिनीकुंज[10]. ॥ २१
बहु[11] चपला, बहु नीलश्वेतारुण मेघ रेखिले होते, ।
कोणीही अत्यद्भुत[12]दर्शन नसतील देखिले हो! ते. ॥ २२
त्यांत सुनीळ सुनिर्मळ तेजाचा भव्य[13] देखिली[14] राशी ।
मन्नयनासि[15] तसें, शुभ देश जसें भव्य दे खिलाराशी. ॥ २३
त्या नीळवर्णतेजोराशींत प्रभु दिसे सदार[16] मला, ।

---

१. अन्वयः–प्रथमीं मासीं (पहिल्या महिन्यांत) फळाशन (फलांचें भक्षण)करुनि नियमांत जागत होतों (तपश्चरण करीत होतों). २. दुसऱ्या महिन्यापासून. ३. महिना. अन्वयार्थः–द्वितीयापासूनि (दुसऱ्या महिन्यापासून) संपूर्ण पांचवा मास (=पांचवा महिना संपे तों) उदकाशन [करण्यांत आलें]. ४. सार्थान्वयः–कीं(=कारण) परमार्थपरां (=परमार्थ साधूं इच्छिणारांस, मुक्ति मिळविण्यासाठीं खटपट करणारांस) तप म्हणे, 'मीच हित (=कल्याण करणारें), मास न सांचवा (=अंगावर बोटभर मांस वाढविल्यानें परमार्थप्राप्ति होणें नाहीं, तरी शरीर पुष्ट करण्याच्या भरीस पडूं नका).' सर्वसंग्रहाचा पाठः–कीं परमार्थपरंतप. ५. एक पदावरि उभा होतों=अतितत्पर, उत्सुक होतों. हा शब्द-समूह श्लिष्ट आहे, व मी एक पायावर उभा राहून कांहीं दिवस तपश्चर्या चालविली होती, हेंही यांत सुचविलें आहे. ६. शुभावह+आयास=कल्याणप्रद श्रम. ७. सहाव्या महिन्याचे प्रारंभीं. ८. सहस्रसूर्यांच्या प्रभेचा, सहस्रसूर्यांचें तेज ज्यामध्यें आहे असा. ९. गोळा. १०. विविध+वर्ण+शतमख+चाप+शत+द्युति+विलासिनी+कुंज=शेंकडों रंगीबेरंगी इंद्रधनुष्यांची प्रभा हीच कोणी क्रीडा करणारी स्त्री तिचा लतामंडप. गोपींसहवर्तमान मुकुंदानें यमुनेच्या कांठीं क्रीडा केली त्यासंबंधीं रामजोशी बुवांनीं केलेलें वर्णन 'तो कुंज रसाचा पुंज इ०' सर्वश्रुत आहेच. तेव्हां विलासवती स्त्रियांस कुंज फार प्रिय असतो. ११. अनेक विजा व अनेक निळे, पांढरे, तांबडे असे ढग. १२. जे पाहून मन थक्क होईल असे देखावे, अलौकिक चमत्कार. १३. सुंदर. १४. दृष्टी पडलेला पुंज. 'राशि' शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे व त्याच लिंगीं पंतांनीं योजिलेला आहे. १५. सार्थान्वयः–जसें खिलाराशी (गाईच्या समूहास) शुभ देश (सुपीक, हिरवा गार असा प्रदेश) भव्य (सुख) दे, तसें [हा राशी] मन्नयनासि (माझ्या डोळ्यांस) [दे]. उत्कृष्ट गवतानें भरलेलें रान पाहून जसा गाईंना आनंद होतो, त्याप्रमाणें हा तेजोराशी पाहून माझ्या नेत्रास समाधान झालें. १६. स्त्री(उमे)सह.

ज्याच्या [1]सदापदाहरपदभजनीं [2]दास हो सदा रमला. ॥ २४
होतां उमामहेश्वरदर्शन, मन बहु [3]निवोनियां रमलें; ।
[4]युगपत्समुदितजलदस्थित शशिभास्कर, असें मला [5]गमलें. ॥ २५
शोभवित तेज होती निजतेजें भगवती उमा पतिचें, ।
[6]ब्रह्मांड भरुनि उरलें ऐसें सौभाग्य तें उमाप तिचें. ॥ २६
झालों उत्फुल्लनयन रोमांचितकाय परम लाभानें, ।
[7]सोडुं नयेचि पळ, क्षणभरि सोडियलेंचि पर मला भानें. ॥ २७
शरणागतिनें दिसला देव [8]शरच्छशिसुधारसवलक्ष, ।
[9]जो दुर्लभ करितां बहु करिकरसमघृतसुधार सव लक्ष. ॥ २८
वर्णील अळंकारा, आकारा, कोण आयुधा? त्याचें ।
सर्वहि अत्यद्भुत; तें गायीं अत्यल्प [11]आयु धात्याचें. ॥ २९
अत्यद्भुत मुकुट शिरीं, अत्यद्भुत कुंडलें, [12]कुरुक्ष्मापा! ।

---

१. सत्+आपदा+हर+पद+भजनीं=साधूंची विपत्ति दूर करणाऱ्या चरणाच्या सेवेंत. २. मी कृष्ण. ३. तृप्त होऊन. ४. युगपत्+समुदित+जलदस्थित=एकाच वेळीं उदय पावलेले व मेघांमध्यें राहिलेले (मेघाच्छादित); हें 'शशिभास्कर (चंद्रसूर्य)' ह्यांचें विशेषण. ५. भासलें. उमेचें मुख चंद्रासारखें व शंकराचें सूर्यासारखें दिसलें हा मतलब. ६. अन्वयः–तिचें तें सौभाग्य ब्रह्मांड भरुनि उरलें, ऐसें उमाप (उदंड, पुष्कळ) [आहे]. ७. सार्थान्वयः–[भानें मला] पळभर[ही] सोडुं नयेचि, पर (परंतु) मला भानें (देहस्मृतीनें) [तेव्हां] क्षणभरि सोडियलेंचि. टीपः–२॥ घटका= ६० मिनिटें व ६० पळें म्हणजे १ घटका; तेव्हां १ पळ म्हणजे २/५ मिनिटें होत. आतां १ क्षण म्हणजे मुहूर्ताचा १२ वा अंश म्हणजे ४ मिनिटें होत. ह्यावरून पाहतां 'पळभर' ही वेळ 'क्षणभर' ह्या वेळेहून कमी आहे. वरील गीत्यर्धांत श्रीकृष्णाचे बोलण्याचा भाव असा आहे कीं, 'देहभान पळभर सुद्धां जाऊं नये; परंतु माझें (श्रीकृष्णाचें) देहभान त्याहून जास्त वेळपर्यंत नाहींसें झालेंची.' ८. शरत्+शशि+सुधारस+वलक्ष=शरदृतूंतील चंद्र व अमृत ह्यांप्रमाणें शुभ्र. ९. सार्थान्वयः–जो (जो देव) करिकरसमघृतसुधार (हत्तीच्या सोंडेसारखी आहे तुपाची धार ज्यामध्यें असे) लक्ष (लाखों) सव (यज्ञ) करितां[ही] बहु दुर्लभ [आहे.] (अर्थात् ज्याचें दर्शन महायज्ञांनींही घडत नाहीं.) १०. वर्णन करण्यास. ११. 'धात्याचें (ब्रह्मदेवाचें) आयु (आयुष्य) अत्यल्प' असें म्हणून कवीनें परमेश्वराच्या अद्भुतत्वाची केवढी उदात्त कल्पना वाचकांच्या समोर उभी केली आहे! पहा, प्रथमतः पाहिलें तर 'वेद' हे ब्रह्मदेवानें केले, ह्यावरून त्याचें वर्णननैपुण्य व्यक्त होतें. शिवाय इहलोकींच्या एकदिवसाहून हजारोंपटीनें ब्रह्मदेवाचा एक दिवस मोठा आहे. अशा स्थितींतसुद्धां जर वर्णननिपुण ब्रह्मदेवाचें आयुष्य श्रीशंकराचे गुणानुवाद गाण्यास पुरें पडत नाहीं, तर मग इतरांबद्दल बोलणें नको, हें उघडच आहे. १२. कुरुदेशाधिपते धर्मराजा!

अत्यद्भुत अंगदयुग[1], अत्यद्भुत हार, पांडवा! बापा! ॥ ३०
शूलगदावज्रपरशुचापप्रमुखें महायुधें धरिते[2]।
बहु भुज विलोकिले, जे भजकांसि[3] भवार्णवांत[4] उद्धरिते[5]. ॥ ३१
[६]जोतो प्रभुच्या शुद्धा सत्वाआंतील शुद्ध भुज गाभा, ।
आहे, पदाश्रित म्हणुनि केवळ न त्यजुनि शेषभुजगा, भा. ॥ ३२
[७]जो विशद यश प्रकटुनि, करितो कल्याण चिर विभु जगाचें, ।
यज्ञोपवीत वीतक्रिय विप्रयशोर्थ मिरवि भुजगाचें. ॥ ३३
दिव्या अनेकवर्णा भव्या आगुल्फलंबिनी[८] माळा, ।
पडुनि गळां[९], पाय धरुनि[१०], म्हणती जाणों, 'स्वदास सांभाळा.' ॥ ३४
यश वस्त्रांचें मिरवी शार्दूळाचेंचि अजिन[११], वलयांचें[१२] ।
[१३]अहि, भस्म चंदनाचें; वर्णावें काय अजि! नवल यांचें? ॥ ३५
[१४]प्रमथपरिवृत प्रभुचा झाला, सत्प्रेक्षणीय परि, वेष ।

---

१. बाहुभूषणांची जोडी. २. धारण करणारे. ३. भक्तांस. ४. संसारसागरांत. ५. मुक्त करणारे, वर काढणारे. बुडणाऱ्यास हात देऊन वर काढतात हा सार्वत्रिक प्रघात आहे. ह्यामुळें 'उद्धरिते' हें विशेषण फार योग्य आहे. ६. सार्थान्वयः—जोतो भुज (त्या भुजांपैकीं प्रत्येक) प्रभुच्या शुद्धा सत्वाआंतील शुद्ध (निवळ) गाभा; भा(कांति), केवळ पदाश्रित म्हणुनि शेषभुजगा न त्यजुनि, आहे. गाभा=गर्भ, नार, साड. श्रीशंकराचा प्रत्येक हात म्हणजे त्याच्या अंतः-करणाच्या शुद्धतेंतील निकोप असा मध्यभाग होय. ते हात इतके सरळ, पुष्ट व तेजस्वी होते कीं, त्यांनीं जगांतील सर्व सर्पांवर आपल्या शोभेनें ताण केली होती. त्यांच्यापुढें सर्व सर्प फिके पडले होते. फक्त एक शेष मात्र अद्याप भग्नतेज झाला नव्हता. याचें कारण इतकेंच कीं, तो शंकराला शरण येऊन, त्यानें शिवचरणांचा आश्रय केला होता; एरव्हीं त्याच्यावर सुद्धां शिवभु-जांची कडी होती, यांत शंका नाहीं. ७. सार्थान्वयः—जो विभु (शंकर) विशद यश प्रकटुनि (उज्ज्वल कीर्ति दाखवून) जगाचें चिर (निरंतर) कल्याण (हित) करतो, [तो] वीतक्रिय (टाकलीं आहेत कर्में ज्यानें असा) भुजगाचें यज्ञोपवीत विप्रयशोर्थ (ब्राह्मणांच्या कीर्तीसाठीं) मिरवी (घेटीनें धारण करतो). यजनादि क्रियांच्या साधनीभूत जें यज्ञोपवीत त्याची शंकरांस मुळींच जरूर न-व्हती, कारण ते त्यक्तकर्म आहेत; पण त्यांनीं केवळ यज्ञोपवीतधारी ब्राह्मणांची महती वाढावी, ह्याच हेतूनें सर्पाचें जानवें घातलें होतें; असा भाव. ८. पायांच्या घोंट्यापर्यंत लोंबणाऱ्या. ९. गळां पडुनि=गळ्यांत मिठी घालून, पक्षीं अति आग्रहानें. १०. पायां पडून=विनंतिपूर्वक. ह्या उत्तरार्धांतील उत्प्रेक्षा फारच बहारीची आहे. ११. चर्म. १२. कड्यांचें. १३. पूर्वार्धा-सह सार्थान्वयः—शार्दूलाचें अजिन (व्याघ्रचर्म) वस्त्रांचें, अहि (सर्प) वलयांचें (कड्यांचें), भस्म चंदनाचें यश मिरवी; अजि (अहो) यांचें नवल काय वर्णावें? १४. सार्थान्वयः—प्रभूचा सत्प्रेक्षणीय (उत्तम व डोळ्यांस आनंद देणारा) परि (परंतु) प्रमथपरिवृत (प्रमथगणांनीं—पिशाचसमूहानें—वेढिलेला) वेष (मूर्ति, स्वरूप) [तसा] दुष्प्रेक्ष्य (दिसण्यास कठिण) झाला, जसा

दुष्प्रेक्ष्य, शरत्काळीं चंडकर जसा, जयासि परिवेष. ॥ ३६
[1]एकादशशत रुद्र प्रभुतें [2]सद्भक्तवज्रवर्मातें ।
होते स्तवीत, गाउनि मधुर प्रभुच्याचि भव्यकर्मातें. ॥ ३७
[3]आदित्यसाध्यविश्वेदेववसुप्रमुख सर्वसुरसहित, ।
वर्णन करीत होते, [4]जें हृतपीयूषगर्व सुरस हित. ॥ ३८
इंद्रोपेंद्र ब्रह्मा हे मधुर [5]रथंतराख्य सामातें ।
बहु निकट गात होते, ज्यां प्रभुचि म्हणे 'विशंक [6]गा [7]मातें.' ॥ ३९
आले होते योगी, देवर्षि, महर्षि, सिद्ध, [8]चटसारे. ।
तो समुदाय उदधिसा, मी [9][10]मुनिसा, [11]देवदेव [12]वटसा, रे! ॥ ४०
[13]खनिमेषहि आले, मग येतील न यज्ञवृक्ष दर्भ कसे? ।
सकळ पदार्थ मिळाले, [14]प्रियदपितृपदासमीप [15]अर्भकसे. ॥ ४१
बा! [16]उल्वलेंहि आलीं, यावें धांवूनि केविं न घनांहीं? ।
[17]होउनि मूर्त मिळालें विश्व, तयामाजि एक अघ नाहीं. ॥ ४२
गंधर्वांच्या भरिलें होतें नभ सर्व मधुर [18]तानांहीं, ।
वाटे गानीं तैसी कोणाहि रसांत मधुरता नाहीं. ॥ ४३
[19]नृत्यांत अप्सरांचे तोडिति हृत्सहचि सर्व थाक थवे. ।

---

शरत्काळीं जयांसि परिवेष (तेजाचें कडें, खळें) आहे, [तो] चंडकर (सूर्य) दुष्प्रेक्ष्य [होतो]. शरदृतूंत आकाश निरभ्र असतें व म्हणून सूर्यमंडळ स्वच्छ, सतेज व प्रेक्षणीय दिसतें. परंतु असा सूर्यही खळें पडलें असतां, जसा अस्पष्ट व दिसण्यास कठिण होतो, तसाच प्रमथांचा पाळा सभोंवतीं पडल्यामुळें शंकर दुष्प्रेक्ष्य झाला, हा भाव. प्रमथ हे पिशाच असून शंकराचे अनुचर व परिचारक होत.

१.अकराशें. २. उत्तम भक्तांचें वज्रासारखें दृढ (=अभेद्य) चिलखत(=रक्षण करण्याचें साधन). ३. देवविशेष. ४. अन्वयार्थः—जें (वर्णन) हृतपीयूषगर्व (परिहार केला आहे अमृताच्या गर्वाच्या ज्यानें असें) सुरस (गोड) [व] हित (कल्याणप्रद) होतें. ५. या संबंधानें मागें अ० ३ गीति ८४ पहा. ६. वर्णन करा. ७. मजला. ८. एकून एक, झाडून सारे. ९. श्रीकृष्ण. १०. मार्कंडेय ऋषी. प्रलयकाळीं मार्कंडेय ऋषि वटवृक्षाचा आश्रय करून आपलें रक्षण करिता झाला, या कथेवर येथें कटाक्ष आहे. ११. देवाधिदेव, शंकर. १२. वटवृक्षाप्रमाणें. १३. खनि+मेष=रत्नांच्या खाणी व बोकड. १४. आवडती वस्तु देणाऱ्या बापाच्या पायाजवळ. १५. मुलांप्रमाणें. १६. लहान सरोवरें, तळीं. १७. सार्थान्वयः—विश्व (अखिल सृष्टि) मूर्त होऊन (रूप धारण करून, मूर्तिमंत) मिळालें, तयामाजि (त्यामध्यें) एक (फक्त) अघ (पाप) नाहीं. सर्व जग त्या ठिकाणीं एकत्र झालें, पण त्यांत पाप मात्र आलें नाहीं. १८. एकच खडा सूर लांबविला असतां, त्यास 'तान' म्हणतात. १९. सार्थान्वयः—नृत्यांत अप्सरांचे सर्व थवे (समुदाय) हृत्सहचि थाक (अवसान) तोडिति. गवई कोणतीही एखादी चीज गात असतां, त्यांत अमुक

ऐवं[1] प्रभुप्रसादें जो उत्सव, तो न[3] सर्वथा[2] कथवे[3]. ॥ ४४
सांब सदाशिव जेव्हां वर द्याया मजपुढें उभा राहे, ।
ब्रह्मादि विश्व सर्वहि माझ्याचि मुखांबुजाकडे पाहे. ॥ ४५
शक्ति मज महादेवा देखाया कीं स्तवावया नाहीं, ।
ऐसें झालें, धर्मा! गेंजबजलों[4], बा! सुचेचिना कांहीं. ॥ ४६
सेंमजे[5] सर्वज्ञत्वें मच्चित्तांतील सर्व नरपा! हें, ।
देव मज म्हणे 'कृष्णा! स्तव वद' होउनि विशंक वर पाहें. ॥ ४७
आराधिलों[6] असें त्वां पूर्वी शतशः, सहस्रशः स्पष्ट, ।
न गणुनि याहुनि बहुशत वर्षे तपस्याग्रहें महाकष्ट. ॥ ४८
त्वत्सम कोण्ही अन्य प्रिय या लोकत्रयांत मज नाहीं; ।
बँहु[7] असति भक्तरत्नें, तुळितां पुरतिल तुझ्या न वजना हीं.' ॥ ४९
वदतां असें प्रसादें, प्रभुच्या केलें पदा शिरें नमन, ।
झालों[8] मग्न स्तवनीं, म्हणतचि होतें सदा 'शिरेन' मन. ॥ ५०
अंजलि करुनि, 'नेमस्ते'[9] म्हणुनि, समस्तेश्वरासि 'तूं सर्व,' ।
ऐसें स्तवनीं वदलों; तेणें संतुष्ट जाहला शर्व[10]. ॥ ५१

एका ठिकाणापासून तालाची उठावण ठेविली असते, अशा ठिकाणीं चीज आल्यावर मग ती आरंभ केलेल्या लईपेक्षां अधिक जलद किंवा सावकाश म्हणतात, व अशा ह्या ठिकाणास 'अवसान' असें नांव आहे. ह्या अवसानावर तालास धरून तंतोतंत चीज उतरली म्हणजे ऐकणाराची चित्तवृत्ति तन्मय होऊन त्यास आनंदाचें भरतें येतें. ह्या ठिकाणीं अप्सरांच्या नाचण्यांत तालाचें अवसान बरोबर आल्यामुळें अंतःकरण आनंदानें उंचबळून जाई; असा भाव.

१. ह्याप्रमाणें. २. यथासांग. ३. वर्णन करतां येत नाहीं. ४. भांबावलों, गोंधळलों. ५. सार्थान्वयः—नरपा! (धर्मराजा) हें मच्चित्तांतील (मत्+चित्तांतील=माझ्या अंतःकरणांतील) सर्व (अर्थात् माझी काय स्थिती झाली ती सगळी) सर्वज्ञत्वें (सर्व जाणण्याच्या शक्तीमुळें) देव (शंकर) समजे [व] मज म्हणे, 'कृष्णा! विशंक होऊनि (न भितां) स्तव (स्तुति) वद; वर पाहें (खालीं मान न घालतां मजकडे पहा).' ६. अन्वयार्थः—बहुशत वर्षे (शेंकडों वर्षें) तपस्याग्रहें (तपश्चरण नेटानें करून) याहुनि महाकष्ट न गणुनि (ह्याच्यापेक्षां अधिक त्रास झाला असतां त्यास न जुमानतां) पूर्वी [मी] त्वां शतशः सहस्रशः (शेकडों व हजारों पर्यायांनीं) स्पष्ट (प्रसिद्धपणें) आराधिलों असें. ७. अन्वयार्थः—भक्तरत्नें बहु असति, [परि] हीं (रत्नें) [तुळि]तां (तुलना केल्यास) तुझ्या वजना न पुरतील (तुझ्या पासंगासही तोलणार नाहींत). [८. अन्व]यार्थः—स्तवनीं मग्न झालों; [अशा स्तवनीं] 'शिरेन' असें मन म्हणतचि होतें. ९. तुला [नमस्कार अ]सो. १०. महादेव.

रज्जूंत सर्प, कीं जळ किरणीं श्रुतिसन्मतें विवर्ततसे ।
बहु जेविं, तुझ्याठायीं पाउनि जग जन्म तेंवि वर्ततसे. ॥ ५२
तूं तप, सत्वरजस्तम, विधि, रुद्र, ज्वलन, वरुण, रवि, धाता, ।
त्वष्टा[2], मनु, देव सकळ, यज्ञ, तदंगेंहि[3], तत्फलविधाता[4]. ॥ ५३
सकळार्थप्रद[5] तव पद चित्तें ध्यातातिं संत तत्वरतें[6], ।
सर्वप्रणतोद्धारीं सदय तुझें हृदय संतत[7] त्वरतें[8].' ॥ ५४
इत्यादि स्तव करितां, झाला संतुष्ट अंधकाराती[9], ।
परम प्रसन्नता करि दूर गुहास्थाहि[10] अंधकारा ती. ॥ ५५
नमुनि[11] निवाले सकळहि, जेव्हां मज सर्व तापहर पावे; ।
चंद्र चकोरीं द्रवतां विश्वाचे सर्व ताप हरपावे. ॥ ५६
'जय जय' म्हणुनि, मम शिरीं सुरसंहति[12] वर्षली प्रसूनांहीं[13], ।
तो काय जन? जयाच्या धन्यत्वें हर्षली प्रसू[14] नाहीं. ॥ ५७

---

१. सार्थान्वयः–जेविं रज्जूंत (=दोरीच्या ठायीं, दोरीवर) सर्प (=साप, सापाचा आभास) किं किरणीं (=सूर्यकिरणीं) जळ (पाण्याचा आभास, अर्थात् मृगजल) श्रुतिसन्मतें (=श्रुतींच्या मतानें) विवर्ततसे (=मिथ्या भासाप्रमाणें) [वर्ततसे], तेविं तुझ्या ठायीं जग बहु जन्म पाऊनि (=अनेक प्रकारचीं रूपान्तरें लाभून) [मिथ्या भासाप्रमाणेंच] वर्ततसे (राहत आहे, नांदत आहे). दोरी पाहून साप असेल असें वाटणें किंवा कडक उन्ह पडलें असतां सपाटीच्या प्रदेशावर पुढें पाणी असावें असें भासणें, अर्थात् मृगजल दिसणें, ह्या गोष्टी जशा मिथ्या असून खऱ्या भासतात, त्याचप्रमाणें हें जग म्हणजे केवळ भासमान असें तुझें रूपान्तर असून, केवळ मायेचा खेळ आहे व वस्तुतः तूं एक कैवल्यसत्त्व ब्रह्म आहेस. २. त्वष्टा= विश्वकर्मा. हा देवांचा शिल्पकार होय. ३. यज्ञांगें. ४. त्यांचें (यज्ञांचें) फल देणारा. ५. चारही अर्थ साधून देणारें. हें 'पद' ह्याचें विशेषण. ६. सत्याचे ठिकाणीं रममाण झालेल्या. 'चित्तें' ह्याचें विशेषण. ७. एकसारखें. ८. त्वरा करितें. कालावधि सहन करीत नाहीं. ९. शंकर. अंधकासुराचा शत्रु. शंकरपार्वती क्रीडा करीत असतां, अंधक नांवाचा दैत्य पार्वतीस हरण करण्यास प्रवृत्त झाला. शंकरांनीं त्यास जिंकलें; व त्यानें केलेल्या करुणस्तवानें प्रसन्न होऊन त्यास जीवदान दिलें व त्यास आपला गण केलें. १०. दऱ्याखोऱ्यांत असणाऱ्याला सुद्धां. ११. सार्थान्वयः–तापहर सर्व (दुःखार्तें हरण करणारा सर्व=शिव) जेव्हां मज पावे (प्रत्यक्ष दर्शन देऊन मजवर प्रसन्न झाला), [तेव्हां] सकलहि [त्यातें] नमुनि निवाले (समाधान पावले); चकोरीं चंद्र द्रवतां (चंद्रानें आपल्या उदयानें चकोरपक्ष्यावर कृपा केली असतां) विश्वाचे सर्व ताप हरपावे (नेहमीं नाहींसे होतात, सर्व जगास सुख होतें). परमेश्वराचें दर्शन मजलाच घडलें असें नाहीं, तर तेथें असणाऱ्या सर्वत्रांस घडलें, व त्यांस समाधान झालें. १२. देवसमुदाय. १३. पुष्पांनीं. 'सुरसंहति प्रसूनांहीं वर्षली' हा प्रयोग लक्ष देण्यासारखा आहे. देवांनीं पुष्पवृष्टि केली, असा भाव. १४. माता.

देवीतें, शक्रातें, मातें, विजितामृतातिवृष्टीनें[1] ।
दृष्टीनें पाहे प्रभु कृतरक्षितहृतसमस्तसृष्टीनें[2]. ॥ ५८
चरणरजें देवांच्या[3] जो बहु देणार लाज अगमातें, ।
वात्सल्येंकरुनि[4] म्हणे ऐसें तो देवदेव मग मातें. ॥ ५९
'कृष्णा! माझ्याठायीं उत्कृष्टा भक्ति जी तुझी आहे, ।
ईतें प्रसिद्ध सुज्ञ ब्रह्मादि समस्त जाणती बा! हे. ॥ ६०
मत्प्रीतिहि प्रसिद्धा तुझियाठायीं असे सदा परमा, ।
न विसंबे पळमात्रहि तुज, माता जेविं बाळका चरमा[5]. ॥ ६१
आराधिला[6] तुवां बहु, देतो वरदेश[7] आठ वर हा, या ।
माग[8] स्वश्रेय सुखें; न गमो परदेश आठव रहाया. ॥ ६२
देतों सुदुर्लभहि, वर माग, तुज करिन सुखी अदेयशतें[9].' ।
ऐसें म्हणे प्रभु मला, विश्वास[10] तसेंच कीं वदे यश तें. ॥ ६३
मी त्या तेजोराशिस्थितभक्तमयूरमूर्तवर्षातें[11] ।
भगवंतातें ऐसें वदलों पावोनि परमहर्षातें. ॥ ६४
'धर्मी सुदृढत्व असो; व्हावा समरांत शत्रुचा घात; ।
यश बहु, विमळ मिळावें, लोंजावा[12] मज महाबळा वात; ॥ ६५
हों[13] त्वद्भक्त असावा अचळें योगें सदैव संपन्न; ।

---

१. विजित+अमृत+अतिवृष्टीनें=जिंकिली आहे अमृताची अतिवृष्टि जिनें, अशा (दृष्टीनें). २. कृत+रक्षित+हृत+समस्त+सृष्टीनें=उत्पत्ति, स्थिति व लय अवघ्या सृष्टीचा केला आहे जिनें, अशा (दृष्टीनें). ३. देवांच्या अगमातें=सुरवृक्षातें; कल्पतरूतें. ४. प्रेमानें. ५. शेवटच्या. आयांची ममता शेंडेफळावर सर्वांत अधिक असते. कवीस जगांतील गोष्टी किती उत्तम माहीत असतात, ह्याचें हें उदाहरण आहे. ६. आराधिलेला. ७. वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ. शंकरासारखा वर देणारा दुसरा कोणी नाहीं, ही गोष्ट अनेक असुरांनींही शंकरास प्रसन्न करून हवे ते वर मागितले व ते शंकरांनीं दिले, ह्यावरून लक्ष्यांत येणारी आहेच. ८. सार्थान्वयः–या (ह्या मला, शंकराला) स्वश्रेय (स्वतःचें हित, जें तुला हितप्रद असेल तें) सुखें (आनंदानें) माग; आठव (आठवण रहाया परदेश न गमो–आपल्यास काय पाहिजे आहे त्याची आठवण होण्याचे बाबतींत तुला परदेशाचा भास न होवो.) नवख्या ठिकाणीं मनुष्य गेला म्हणजे तो भांबावतो व कांहीं वेळ त्याची स्मृति नष्ट झाल्यासारखी होते. ९. दे-ण्याजोग्या नव्हेत अशा शेंकडों गोष्टींनीं. १०. अन्वयः–तें यश (प्रभुयश) विश्वास (जगास) तसेंच (प्रमाणेंच) वदे कीं. ११. तेजोराशिस्थित+भक्तमयूर+मूर्तवर्षातें=तेजःसमूहामध्यें असलेला अ-[illegible]मेय, व भक्तरूप मयूरांस प्रत्यक्ष मेघाप्रमाणें, असा त्यातें, हें 'भगवंतातें' ह्याचें विशेषण. [illegible] स्वरूप असून कृपावंत आहे असा भाव. १२. अन्वयः–मज महाबळा वात (वायु) [illegible]पी कृष्ण.

व्हावें[1] म्यां विश्वाला परम प्रिय सर्वदा जसें अन्न; ॥ ६६
घावें पुत्रशतांचें शत, या विश्वास आठवायास[2]; ।
तव सन्निधान, हा वर बा! वरदा! देच आठवा यांस[3]' ॥ ६७
वरयाचना असी जी केली, शंकर म्हणे 'तथास्तु' तिला. ।
सेविल[4] न सुधा किंवा भेदिपशुश्रुतिच या कथास्तुतिला. ॥ ६८
त्रिजगन्माता[5] सुयशःकर्पूराची अनादि जी कदली[6], ।
दिव्यतपोनिधि देवी धात्री[7] मज सर्वपावनी वदली. ॥ ६९
'कृष्णा तुज भगवंतें सुतरत्न दिलें अनर्घ्य[8] अनघातें, ।
मज गुहसा यश देइल जांबवतीस स्वशत्रुजनघातें[9]. ॥ ७०
'सांब' असें नांव तया ठेवावें, सविधि बारसें करुनी; ।
विश्वासि विधु तसा तव हृदया निववील बा! रसेंकरुनी[10]. ॥ ७१
मद्वात्सल्यें[11] माझी 'तूंही दे' म्हणुनि पुरविली[12] पाठ, ।
आठ प्रिय वर माग, प्रभुपरि[13] मजलाहि 'घे' असे पाठ. ॥ ७२
जें वंदिलें विधीनें, तत्सुतसुतवंशसंभवांनीं[14], तें ।

---

१. सार्थान्वयः—विश्वाला (जगाला) जसें अन्न परम प्रिय [तसें] म्यां सर्वदा व्हावें. यावरून जनप्रियता ही अमूल्य वस्तु आहे हें सिद्ध आहे. २. जगानें ज्यांचें नांव घ्यावें असे. ३. मला, श्रीकृष्णास. ४. अन्वयार्थः—या कथास्तुतिला (=या कथेला आणि स्तुतीला) सुधा किंवा भेदिपशुश्रुतिच (=भेदवादी जे पशुतुल्य मनुष्य त्यांचा कान मात्र) [मत्सरयुक्त होऊन] न सेविल. कथा व स्तुति या अत्यंत मधुर व अमृतपद देणाऱ्या असल्यामुळें, सुधा त्यांचा मत्सर करील हें उघड आहे. जे भेदवादी आहेत, त्यांनाही हें देव व भक्त यांमधील प्रेम व एकरूपत्व, पसंत पडणार नाहीं. केवळ सगुणवादी किंवा भेदवादी यांना श्रुतीनें 'पशु' म्हटलें आहे. यासंबंधें पुढील यथार्थदीपिकेंतील उतारा वाचनीय आहे:—'दोहींत केवळ सगुणवादी । त्यांची निष्ठा अखंड भेदीं । जयांचें भजन वर्णिलें वेदीं । पशुतुल्य ॥ ७० ॥ श्रुति—अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुः ॥ श्रुत्यर्थ—देव अन्य मी अन्य । ऐसा भेद अन्योन्य । दाटोनी आणिती जघन्य । त्यांस ही श्रुति निंदिते.॥७१॥ यथार्थदीपिका, अध्याय १ ला. ५. पार्वती. ६. कापूर हा पदार्थ केळीच्या झाडापासून निघतो अशी समजूत आहे. शिवाय 'कदली' हा शब्द स्त्रियांसंबंधानें योजिला असतां त्यांच्या अंगयष्टीचें सौंदर्य व्यक्त होतें. पार्वती ही उत्तम यशातें देणारी आहे, असा भाव. ७. माता. ८. बिनमोल. ९. आपल्या शत्रुवर्गाच्या नाशानें. १०. रस=चंद्रपक्षीं अमृतरस; सांबपक्षीं आनंद. ११. माझें भक्तांवर असणारें जें प्रेम त्यामुळें. १२. पाठ पुरविली=सारखा हट्ट घेतला, पिच्छा पुरवला. १३. अन्वयः—प्रभुपरि (शंकराप्रमाणें) मजलाहि 'घे' ('घे' असें म्हणणें; हा शब्द) पाठ असे. १४. तत्सुत+सुत+वंश+संभवांनीं=महादेवाच्या नातवाच्या वंशांत उत्पन्न झालेल्यांनीं, अर्थात् मानवांनीं.

चरणसरोजयुग शिरें नमुनि, असें बोलिलों भवानीतें. ॥ ७३
'विश्वजननि! विप्रांच्या ठायीं तिळमात्रही नसो रोष; ।
व्हावा पितृप्रसाद[1] प्राप्त, परम भोगें[2] भोगितां तोष; ॥ ७४
शत[3] सद्गुणपुत्रांचें; प्रीति असावी कुळीं सदा माते! ।
मातृप्रसाद; दाक्ष्यहि; शमही, जेणें न जन कदा माते.' ॥ ७५
देवी म्हणे 'दिल्हें हें कृष्णा! अमरप्रभाव[4] होशील; ।
सत्य वदावें, ऐसें माझें तैसें तुझेंहि हो शील; ॥ ७६
षोडशसहस्र भार्या त्यांच्या ठाईं असो प्रियत्व सदा; ।
धनधान्याद्यर्थाला व्यय करितां, क्षय तुझ्या नसोचि कदा; ॥ ७७
तुज बांधवांकडून प्रीति सुविपुला दिल्ही घनश्यामा! ।
तैसीच कांम्यता[5] तव देहीं बहु लाजवावया कामा[6]; ॥ ७८
सप्ततिशत[7] अतिथि तुझ्या सदनांत सदा सुतृप्त होतील, ।
तत्कांचनपात्रीं बहु पायस[8] तव सूदवर्ग[9] ओतील.' ॥ ७९
देवानें आठ दिल्हे, देवीनें वर दिल्हे असे सोळा, ।
केले म्यां चोवीस प्रेमें तत्[10]पादरेणुसे[11] गोळा. ॥ ८०
यापरि परमेश्वर वर देउनि तत्काळ जाहला गुप्त, ।
विस्मित झालों, स्वप्नीं अद्भुत[12] पाहोनियां जसा सुप्त. ॥ ८१
हें अत्यद्भुत कथिलें वंदुनि उपमन्युला नृपा! धर्मा! ।
तो सात्विकभावांहीं परवश[13] होवूनि पावला शर्मा. ॥ ८२
उपमन्यु म्हणे, 'दाता कीं करिता शूर शर्वसम यज्ञ ।
कोणी देव नसे, बा! कैंचे सर्वत्र सर्व समयज्ञ[14].' ॥ ८३

---

१. वडिलांची कृपा. २. सुखसाधन, विषय. ३. सार्थान्वयः—माते! सद्गुणपुत्रांचें शत [असावें]; कुळीं सदा प्रीति असावी; मातृप्रसाद; दाक्ष्यहि (प्रामाणिकपणा); [व] जेणें (ज्यायोगें) जन कदा (केव्हांही) न माते (माजत नाहीं, चढून जात नाहीं), [तो] शमहि [असावा]. श्रीकृष्णांनीं आठ वर मागितले ते ह्या व मागील गीतींत दिले आहेत. ४, देवासारखा प्रभाव आहे ज्याचा असा. ५. सौंदर्य. ६. मदनास. ७. सत्तरशें, सात हजार. ८. खीर. ९. वाढपी. १०. गीती ७४–७५ व ७६–७९ ह्यांत सांगितलेले. ११. त्यांच्या पायांच्या धूळीच्या कणांप्रमाणें. १२. चमत्कार. १३. दुर्बळ, व्याकुळ. १४. काळवेळ जाणणारे.

## अध्याय सहावा.

व्यास म्हणे, 'पुत्रा! हो प्रीत महादेव, या स्तवा पढ गा!
या[1] पाठकताप सुजय, मेघांच्या जेविं बर्हिताप ढगा. ॥ १
यों[2] स्तवराजें जैसा पीयूषरसें पिपासुताप सरे, ।
ब्रह्मांडीं कीर्ति, जसी शारदशशिचंद्रिका, सुता! पसरे. ॥ २
मेरुनगीं सफळ करी माझें स्तवराज सुतप हा, यास[3] ।
कीर्तित होतों प्रेमें तापस मी योग्य सुत पहायास. ॥ ३
होतां[4] मनोरथ स्तवराजावांचूनि सिद्ध आशु[5] कसा? ।
झाला, शिवप्रसाद न होतां, कवणासि पुत्र बा! शुकसा[6]? ॥ ४
धर्मा! या स्तवराजें सर्व तुझे काम सिद्ध[7] होतील, ।
शिवकरुणामुदिर[8] भजकचातकवदनांत[9] अमृत[10] ओतील. ॥ ५
मग सर्वदेवसंमत[11] सांख्याचार्यहि[12] म्हणे 'मला[13] कपिला ।
ज्ञान दिल्हें जगदीशें, अति दुर्लभ अमृतफळ जसें कपिला. ॥ ६
बहुजन्में तप तपलों, जपलों[14], झालों उदास[15] सुज्ञा! न; ।
केलों[16] धन्य प्रभुनें; पावे यांचा[17] सुदास सुज्ञान. ॥ ७

---

१. सार्थान्वयः—मेघांच्या ढगा जेविं बर्हिताप (मोरांस होणारा त्रास), [तेविं] या (ह्या शिवस्तवाला) पाठकताप (पठन करणाऱ्यांचा त्रास) सुजय (सहज नाहींसा करण्याजोगा) [असे]. २. सार्थान्वयः—जैसा पीयूषरसें (अमृतरसानें) पिपासुताप (तान्हेल्याचा संताप) सरे (नाहींसा होतो), [तैसा] या स्तवराजें (महास्तोत्रानें) [जनताप सरे]. [व] [हे] सुता! (धर्मराजा!) जशी शारदशशिचंद्रिका (शरदृतूंतील चंद्राची प्रभा), [तशी] कीर्ति ब्रह्मांडीं (सर्व जगभर) पसरे. येथें कीर्तीस दिलेली उपमा फारच समर्पक आहे; कारण, शुभ्रता, मनोहरता व व्यापकता हे तीनही गुण शरच्चंद्रप्रकाश व कीर्ति ह्या उभयतांस सारखेच लागू पडणारे आहेत. ३. अन्वयः—मी तापस योग्य सुत पहायास (योग्य पुत्र व्हावा ह्या हेतूनें) यास (या स्तवराजास) प्रेमें कीर्तित होतों (गात होतों, पाठ म्हणत होतों). ४. झाला असता. ५. सत्वर. ६. शुकसा=शुकाचार्यांसारखा; (पक्षीं) पोपटासारखा बोलका, हुशार. ७. पूर्ण. ८. महादेवरूप दयेचा मेघ. ९. भक्तरूपी चातकांच्या तोंडांत. १०. पाणी, पक्षीं मोक्ष. ११. सर्व देवांस मान्य असा. १२. सांख्यदर्शनप्रवर्तक कपिल मुनि. १३. सार्थान्वयः—अतिदुर्लभ (मिळण्यास कठीण) अमृतफळ (मधुरफळ) जसें कपिला (माकडाला), [तसें] मला कपिला (कपिल ऋषीला) जगदीशें [अतिदुर्लभ] ज्ञान दिधलें. कपिल व सांख्यदर्शन यांसंबंधीं मागें ४ थ्या अध्यायांतील १८ व्या गीतीवरील टीप पहा. १४. जप केला किंवा एकाग्रवृत्तीनें राहिलों. १५. निराश. १६. प्रथमपुरुषी कर्ता असतां, येथें कर्मणिप्रयोग आहे, हें ध्यानांत धरण्याजोगें आहे. १७. शंकराचा.

शक्राचा दयित सखा, 'आलंबायन'[1] असें जया म्हणती, ।
तो चारुशीर्ष करुणामय बोले, करुनि शंभुला प्रणती.[2] ॥ ८
"म्यां शतवर्षे केलें गोकर्णी[3] उग्र सुतप, कीं शांत,[4] ।
व्हावे अयोनिजे,[5] अजर,[6] लक्षायू,[7] ज्ञानसिंधु,[8] सुत दांत.[9] ॥ ९
धर्मा नावडती सुत, सुंदरहि कदापि, जे न कोविद[10] रे ! ।
तैसेचि पंडितहि परि बापा ! कोणासही नको विद्रे.[11] ॥ १०
नसतां[12] शांत, सुताचें बहु तापचि दे वपु;[13] त्रपाकारी ।
काय न अदांत कश्यपमुनिसि तसा देव पुत्र पाकारी.[14] ॥ ११
[15]सर्वहि सद्गुण सोडुनि जातात तया नरा, जरा ज्याला, ।

---

१. नामविशेष. २. नमस्कार. ३. हें शिवक्षेत्र दक्षिणेमध्यें आहे. शंकरांनीं प्रसन्न होऊन आत्मलिंग रावणास दिलें; तें जमिनीवर ठेवूं नको असें रावणास सांगितलें होतें. तें लिंग रावण घेऊन जात असतां वाटेंत त्यास विघ्न करण्याकरितां देवांनीं गणपतीस त्याजकडे पाठविलें. वाटेंत रावणास नित्यकर्मं करणें असल्यामुळें त्यानें कांहीं वेळपर्यंत तें घेऊन उभें राहण्यास गणपतीस सांगितलें; गणपतीनें कांहीं नेमक्या वेळेपर्यंत तें शिवलिंग हातीं धरण्याचें पतकरिलें व नेमलेली वेळ टळतांच तें खालीं ठेविलें. नंतर रावणानें तें जमिनीवरून उचलून घेण्याकरितां यत्न केला, त्या वेळीं जोरानें पिळून वर उचलल्यामुळें त्या लिंगास गाईच्या कानाचा आकार प्राप्त झाला, पण तें जमिनींतून वर निघालें नाहीं. हेंच ठिकाण गोकर्ण म्हणून प्रसिद्ध आहे. ४. विवेकी व समाधानी. ५. गर्भस्थ स्थिति प्राप्त न होतां जन्मलेले. ६. वार्धक्यरहित, जराहीन. ७. लक्षवर्षें आयुष्य ज्यांचें आहे असे. ८. ज्ञानाचे समुद्र. ९. जितेंद्रिय. हीं सर्व विशेषणें 'सुत' ह्याचीं असून, प्रत्येक विशेषणाच्या आवश्यकतेचीं कारणें खालील पांच गीतींत दिलीं आहेत. १०. शहाणे. ११. विद्रूप, कुरूप. १२. [सुत] शांत नसतां=[मुलगा] उच्छृंखल असल्यास. १३. शरीर. कुपुत्रनिंदाः—"जेविं बहु कुपुत्राचें, न फणीचें तेविं दे वपु त्रास । देता झाला कैसा ऐशा मज देवदेव पुत्रास ? ॥ २४ ॥ गृहशून्य अपुत्राचें न, कुपुत्राचेंचि शून्य गृह लोकीं । इत्यादि विलाप करी तो गौतम, मग्न होय बहु शोकीं ॥२५॥" (मोरोपंतकृत कृष्णामाहात्म्य, अध्याय ४.) १४. सार्थान्वयः—तसा देव पाकारी (तो प्रसिद्ध देव व पाकासुराचा शत्रु इंद्र) [परि] अदांत (ज्यांच्या मनोवृत्ति स्वाधीन नाहींत असा) पुत्र कश्यपमुनिसि त्रपाकारी (लाज आणणारा) न काय? इंद्र तेजस्वी पराक्रमी आहे, तेव्हां त्यायोगें त्याच्या वडिलांस म्हणजे कश्यप मुनीस संतोष व्हावा; पण इंद्र अदांत म्हणजे उच्छृंखलवृत्तीचा आहे, हें पाहून कश्यप मुनीस फारच ताप झाला, असा भाव. ह्या ठिकाणीं पंतांनीं 'अदांत' पदानें इंद्राच्या 'अहल्याजारत्वाची' आठवण दिली आहे. १५. सार्थान्वयः—ज्याला जरा (म्हातारपण), तया नरा सर्वहि सद्गुण सोडूनि जातात; प्रबळारिचमूशत (बळाढ्य शत्रूंच्या शेंकडो सेना) [illegible] (कुढणाऱ्या) राजराजाला (राजश्रेष्ठाला, थोर राजाला)[ही] ही (जरा) न आटे (आटोपत नाहीं, पराभूत करितां येत नाहीं).

आटे प्रबळारिचमूशत, मथित्या ही न राजराजाला. ॥ १२
[१]पुरुषास कानकोंडेपण बा! करितांचि बायको येतें, ।
न दिसे तरुत्व म्हणवुनि गेलें सोडोनि काय कोयेतें? ॥ १३
झाले प्राप्त विपुलगुण सुत, तत्संबंधयोग परि टांचा[२], ।
[३]तो तैसा लज्जाकर, जेविं पैरपटोपभोग[४] परिटांचा. ॥ १४
[५]ऐसें मनीं विचारुनि सुविचारें, आयतें वदान्यातें ।
मागितलें म्हणत्या 'जें इष्ट असे काय, तें वदा; न्या तें' ॥ १५
[६]दुर्घट काम पुरविता दीनाचा आप्तकाम पुरविल या; ।
नेताचि समर्थ जगीं कोण दुजा आप्त कामपुर विलया?" ॥ १६
मग वाल्मीकि मुनि म्हणे "पांडित्यें जाहला मला गर्व, ।
वेदविरुद्धचि वदलों, अग्निसह महर्षि कोपले सर्व. ॥ १७
मज 'तूं ब्रह्मघ्न' असे वदले ते अग्निसहित मुनि सारे, ।
तत्काळ त्यां अधर्में झालों आविष्ट[७] पांडवा[८]! बा! रे! ॥ १८
गेलों शरण अमोघा[९] अनघा[१०] परमेश्वरासि[११] बा! राजा[१२]! ।

---

१. सार्थान्वय–बा! बायकोकरितांचि (=बायकोमुळेंच) पुरुषास कानकोंडेपण (=मनःसंकोच, लाजवटपण) येतें, तरुत्व न दिसे म्हणवुनि कोयेतें (फळांतील आठळीस) सोडोनि गेलें काय? जसें तरुत्व गुप्तरूपानें कोईंत असतें, तसेंच लाजिरवाणेंपण स्त्रींत असतें, व तीशीं संबंध जडतांच तें पुरुषालाही पिच्छाडतें. म्हणून चारुशीर्षानें 'अयोनिज' पुत्र मागितले. २. थोडा, अपुरता. ३. पुत्रादिकांचा संबंधयोग. ४. पर+पट+उपभोग=दुसऱ्यांच्या वस्त्राचा उपभोग. दोन दिवसच हातीं आलेल्या दुसऱ्यांच्या कपड्यांचा उपभोग घेऊन केलेला नटवेपणा जसा परिटाला लाज आणणारा आहे, तसाच दोन दिवसांनींच ज्यांचा वियोग दुर्दैवानें व्हावयाचा आहे, अशा अल्पायू मुलांचा संबंधही उसना उसना व लाजिरवाणा वाटतो. उपमा फारच बहारीची आहे. पंतांनीं ह्या दोन गीतींत लोकव्यवहार फार मार्मिकपणें वर्णिला आहे. ५. सार्थान्वयः–ऐसें सुविचारें मनीं विचारुनि [ह्याप्रमाणें मनाशीं योग्य विचार करून] 'जें काय इष्ट असे तें वदा; तें न्या.' [असें] म्हणत्या (म्हणणाऱ्या) वदान्यातें (उदारातें) आयतें (ज्याबद्दल खटपट करण्याचें उरलें नाहीं असें, सर्व इष्ट प्रकारांनीं युक्त असें) मागितलें. ६. सार्थान्वयः–दुर्घट (=दुःसाध्य) काम (=मनोरथ) पुरविता (=पूर्ण करणारा) आप्तकाम (=परमेश्वर) या दीनाचा (काम) पुरविल; [कारण] जगीं कामपुर (=वासनासमूह) विलया नेताचि (=खास नाहींसा करणारा; पूर्णपणें पुरविणारा) दुजा आप्त (=सोयरा) कोण? वासनांचा बीमोड करणारा असा श्रीशंकरावांचून, ह्या जगामध्यें, दुसरा कोणी नाहीं, हा भाव. ७. त्या धर्मविरुद्धाचरणानें झपाटलों. ८ धर्मराजा! ९. वायां न जाणाऱ्या; अर्थात् अचूक फल देणाऱ्या. १०. निष्पाप. ११. शंकरास. १२. धर्मराजा!

पाप पळालें, पुरते प्रायश्चित्ता न अब्द बारा [1]ज्या. ॥ १९
यास्तव दु:खविनाशन ऐसा कोणी नसे सुरांमाजी, ।
[2]झाली, हो! ती आख्या सुजना ग्राह्या जसी सुरामा, जी. ॥ २०
[3]मजकरवीं [4]देवानें धर्मा! [5]करयुग्ममात्र जोडविलें; ।
परमेश्वरें [6]सुदुस्तर पापापासुनि पळांत सोडविलें. ॥ २१
“[7]तुज ‘कविवर’ म्हणतिल बुध, यश गातिल सकळ;” वरद वर दे हा; ।
किंबहुना ‘धन्य’ म्हणति अमरवरहि शंभुदासनरदेहा.” ॥ २२
[8]भृगुराम म्हणे “वधिला [9]नीचांहीं श्रेष्ठ [10]मज्जनक राया! ।
गेलों शरण शिवाला, जेविं नदा तप्त [11]मज्जन कराया. ॥ २३
[12]करितों झालों प्रभुच्या नामांहीं सत्य पांडवा! स्तुतिला; ।
मुख्या हेचि, दुजी जी श्रुति न म्हणति सत्यपांडवास्तु तिला. ॥ २४
[13]मज देवदेव सत्फळ दे सहदिव्यास्त्र परशु भजनाचें; ।
[14]सद्यः प्रभु हाचि करी, तैसें न करीच [15]परें, [16]शुभ जनाचें. ॥ २५

---

१. सार्थान्वय:–ज्या (=ज्या पापाला) प्रायश्चित्ता (=प्रायश्चित्तासाठीं, प्रायश्चित्त घेण्याला) बारा अब्द (संवत्सर) न पुरते(=पुरेसे झाले नसते). २. सार्थान्वय:–हो! जी आख्या (=कीर्ति) झाली, ती जशी सुरामा (=चांगली स्त्री) [तशी] सुजना ग्राह्या (=स्वीकारण्यास योग्य) [आहे]. ३. माझ्याकडून. ४. श्रीसंकरानें. ५. करयुग्म मात्र जोडविलें=नुसते दोन हात जोडावयास लाविले; नमस्कारापलीकडे कांहींच जास्त करावयास लाविलें नाहीं. ६. खडतर. मी केवळ हात जोडले आणि शंकरानें मला तत्काळ पापमुक्त केलें, हा गीतीचा मतलब. ७. सार्थान्वय:–‘सकळ बुध (=ज्ञाते) तुज ‘कविवर’ (=कविश्रेष्ठ) म्हणतील [व] यश गातील; हा वर वरद (=वर देणारा, श्रीशंभु) दे (=देता झाला); किंबहुना (=फार काय सांगावें; सारांश) अमरवर (=श्रेष्ठदेव) हि शंभुदासनरदेहा (=शंकराची सेवा करणाऱ्या पुरुषाच्या शरीरास) धन्य म्हणती. ८. परशुराम. ९. हलकट व दुष्ट अशा कार्तवीर्यपुत्रांनीं. १०. माझा बाप, जमदग्नि. ११. स्नान. १२. सार्थान्वय:–[हे] पांडवा! (धर्मराजा!) नामांहीं (नांवांनीं, शिवसहस्रनामानें) प्रभुच्या (शंकराच्या) सत्य (अंत:करणपूर्वक; खऱ्या) स्तुतीला करिता झालों. हेचि (हीच स्तुति) मुख्या [श्रुति]; जी दुजी श्रुति (=वेदविद्या) तिला सत्यपांडवास्तु (ब्रह्मांडाचा आश्रय, विश्वाचें आधारस्थान) न म्हणति. विश्वाचें रक्षण करण्यांत शिवसहस्रनामापुढें प्रत्यक्ष वेदसुद्धां कांहीं नव्हे, असा भाव. सत्यपांडवास्तु=सत्यप+अंड+वास्तु= सत्यलोकपति (=ब्रह्मा)+अंड+वसतिस्थान. १३. अन्वय:=सहदिव्यास्त्र (=तेजस्वी अस्त्रांसह) परशु [हें] भजनाचें सत्फल देवदेव (=महादेव) मज दे. मी स्तुति केली, त्यायोगें श्रीशंकर प्रसन्न झाले व त्यांनीं मला परशु व अस्त्रें दिलीं, असा भाव. १४. तत्काळ. १५. दुसरा. १६. कल्याण.

‘[1]पापा न शिव खळांच्या; यांच्या मोडुनिहि कापिल्या माना, ।
रे सुरहो! या माज्या मत्सम, सोडुनि हिका, पिल्या माना. ॥ २६
वत्सा! [2]रामा! [3]अजराजेयामर दि[4]व्यकाय होशील.’ ।
ऐसें वदे महेश्वर, याचें स्तववेल काय हो! शीलें[5]. ॥ २७
धन्य प्रसाद पावुनि झालों, [6]भजतां [6]भवा, असा राया! ।
[7]सारत्व सुखें येतें भगवद्भजनें भवा असारा या[7].” ॥ २८
विश्वामित्र म्हणे ‘मी क्षत्रिय [8]कुरुकुळविभूषणा! पहिला[9], ।
भोगित होतों होउनि [10]अभिषिक्त परं[11]परागता [12]महिला. ॥ २९
[13]जीची कास म्हणे, ‘गे! पावलिस वृथाचि तूं सुधे! नुतिला;’ ।
होतों हरित बळें, जी वसिष्ठमुनिकीर्तिसी सुधेनु, तिला. ॥ ३०
तेव्हां वसिष्ठतेजें धर्मा! मी पावलों परि[14]भवातें; ।
स्पष्ट बुडालों होतों, बा! गेलों शरण मी [15]परि [16]भवातें. ॥ ३१
होतें आंगीं [17]भटपण, त्याचा आला [18]उमाप ति[19]टकारा, ।
त्यांतचि मला दुसरिया देता झाला उमापति ‘ट’[20]कारा. ॥ ३२
[21]ब्राह्मण्य सुदुर्लभ, परि झालें प्राप्त प्रभुप्रसादानें. ।
[22]अभिलषित पदार्थांचीं देतो सत्स्वर्द्रु एक हा दानें. ॥ ३३

---

१. सार्थान्वयः—खळांच्या पापा न शिव (दुष्टांस लागणारें पाप तुजला न लागो). यांच्या (खळांच्या) माना मोडुनिहि कापिल्या. हे सुरहो! या माज्या (माझ्या) पिल्या (वत्सास) हिका सोडुनि (हट्ट सोडून) मत्सम (माझ्याप्रमाणेंच) माना (मान द्या.) टीपः—ह्या गीतींतील पूर्वार्ध परशुरामास उद्देशून आहे; व उत्तरार्ध इतर देवांस संबोधून आहे. पुढील गीतींतील पुन्हा पूर्वार्ध परशुरामास उद्देशून आहे. तेव्हां ह्या २४ व्या गीतींत पूर्वार्ध तो उत्तरार्ध व उत्तरार्ध तो पूर्वार्ध असा क्रम असता तर बरें. २. परशुरामा. ३. अजर+अजेय+अमर=जरारहित+अजिंक्य+चिरंजीवी. ४. तेजस्वी देह ज्याचा असा. ५. सुस्वभाव, सौजन्य. ६. भवा भजतां=शंकराची भक्ति करून. ७. या (ह्या) असारा (मिथ्या) भवा (संसारास) भगवद्भजनें सुखें (सहज) सारत्व (सत्यमयता) येतें (प्राप्त होतें). ८. कौरवश्रेष्ठा धर्मा! ९. मूळचा. १०. अभिषेक पावून, राज्याभिषेक लाभून. ११. वडिलार्जित, चालत आलेल्या, पिढीजाद. १२. पृथ्वीला. १३. सार्थान्वयः—जीची (ज्या सुधेनूची) कास [सुधेला] म्हणे, ‘गे सुधे! तूं वृथाचि नुतिला (स्तुतीला पावलीस) [अर्थात् जिच्या दुधापुढें प्रत्यक्ष अमृताचीही थोरवी व्यर्थ होती]व जी सुधेनु (नंदिनी)वसिष्ठमुनिकीर्तिसी (वसिष्ठऋषीच्या कीर्तीप्रमाणेंच) [होती],तिला बळें (बळात्कारानें)हरित होतों (हरण करण्याचा यत्न केला). १४. पराभवाला, मानहानीला. १५. परंतु. १६. शंकरातें. १७. क्षत्रियत्व. १८. फार. १९. कंटाळा. २०. ‘ट’ ह्या अक्षरास. मी भट (योद्धा) होतों; प्रभूनें मला त्यांतच(=भटांतच) एक ‘ट’ दिला म्हणजे अर्थात् मी ‘भट्ट’ (ब्राम्हण) झालों, असा भाव. २१. ब्राह्मणत्व. २२. सार्थान्वयः—हा एक सत्स्वर्द्रु (हा एकटाच भक्तजनांचा कल्पवृक्ष) अभिलषित पदार्थांचीं दानें देतो (इच्छित गोष्टी देतो).

अनुभवितो[1] रंक, वरुनि अभिषेकातें, विशंक राज्याला; ।
पाउनि शव अमृतरसा, हा गाधिज तेविं शंकरा जाला.' ॥ ३४
हरिसख गृत्समद[2] म्हणे "गेलों होतों महेंद्रसत्रास[3]. ।
चुकलोंसा[4] मी झालों मनुसुतशापें[5]करूनि संत्रास[6]. ॥ ३५
चाक्षुषपुत्र[7] म्हणे 'रे! केला कीं सत्रघात[8] तूं पापी, ।
एक अयुत अष्टादशशत[9] वर्षें हरिण हो' असें शापी. ॥ ३६
होती पूर्वस्मृति, मज तृणसम जन्हि उडविलें अंशुभवातें[10]; ।
गेलों शरण, नरेशा! शापें होवूनि मी पशु भवातें. ॥ ३७
स्वमति[11] मज म्हणे, 'वारुनि चित्तांतिल हानिलाभगलबा, गा; ।
तारिल भावें, न रुचे लवहि उमाजानिला भगल बा! गा! ॥ ३८
वेळवावया[12] करावें कांय पतितपावना तप शुभ जनें? ।
द्रवला स्वयेंचि पशुपति देव अतितपा वनांत पशुभजनें. ॥ ३९
भेटुनि देव मज म्हणे 'अमरत्वें जिष्णुसींच[13] तुकेशील[14]; ।

---

१. सार्थान्वयः—[शंकरप्रसाद झाल्यानें] [जेविं] रंक (दरिद्री) अभिषेकातें वरुनि राज्याला विशंक अनुभवितो (निर्धास्तपणें राज्योपभोग घेतो) [व] शव (मृतदेह) अमृतरसा पावुनि [जेविं होतो; अर्थात् सजीव होतो] तेविं हा गाधिज शंकरा [पावुनि] जाला (झाला). टीपः—'शव' शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे तसाच तो येथें योजिला आहे. २. हा मूळचा अंगिरसकुलोत्पन्न शुनहोत्राचा मुलगा. परंतु नंतर इंद्राच्या इच्छेनें हा भृगुकुलोत्पन्न शौनकाचा मुलगा झाला. ऋग्वेदाच्या द्वितीय मंडळांत हाच प्रधान ऋषि आहे. हा इंद्राचा परम मित्र होता. ३. इंद्रानें आरंभिलेल्या यज्ञास. ४. चुकल्यासारखा. वेद वगैरे पठन करीत असतां 'संचार जातो' हें सर्वत्रांस माहीत आहेच. ५. चाक्षुष मनूच्या मुलाच्या शापानें. चाक्षुष मनु हा १४ मनूंपैकीं ६ वा मनू. याच्या मुलाचें नांव वरिष्ठ होतें. ६. त्रासयुक्त. हें 'मी' याचें विशेषण. ७. मनूचा मुलगा. ८. यज्ञनाश. ९. दहाहजार, अठराशें अर्थात् अकराहजार आठशें वर्षें. १०. अशुभ+वातें=अकल्याणरूप वायूनें, दुर्दैवाच्या वाहुटळीनें. ११. सार्थान्वयः—मज स्वमति (=माझें मन) म्हणे 'चित्तांतील हानि-लाभ-गलबा (नुकसान किंवा फायदा यायोगें होणारी अस्वस्थता) वारुनि (नाहींशी करून) [शंकरातें] गा; [तो] भावें (=भक्तीमुळें, तुझ्या मनांत खरी निष्ठा असेल तर) [तुला] तारील, [परंतु] उमाजानिला (उमा आहे जाया ज्याची असा शंकर त्याला), बा! गा! (अरे बाबा), लव-हि (रतिमात्र सुद्धां) भगल (ढोंग) न रुचे (आवडत नाहीं). १२. सार्थान्वयः—पतितपावना (पतितांचा उद्धार करणाऱ्या शंकरास) वळवावया (आपलासा करण्याकरितां) शुभ (=पवित्र, पुण्य-वान्) जनें काय तप करावें (=करण्याची जरूरी आहे?); अतितपा (घोर तपस्वी) [व] पशुपति देव (शंकर) स्वयेंचि (आपण होऊन) वनांत पशुभजनें (हरिणरूपी जो मी, त्या माझ्या भक्तीनें) द्रवला. येथें 'पशुपति' 'अतितपा' व 'पशुभजन' या शब्दांची योजना फारच खुबीदार आहे. १३. इंद्राशीं. १४. बरोबरी पावशील.

चुकशील नच कधीं, हो जिंतवाणीपाणिवर्तिशुकशील.' ॥ ४०
बापा! धर्मा! कोणी विद्येनें मजअसा कवी नाहीं. ।
प्राचीनांहीं[2] जैसे, तैसे कर जोडिले नवीनांहीं. ॥ ४१
वत्सलवर[3] हर, उपमा नच कोठें राजपुंगवा[4]! यास; ।
प्रेमें[5] बहु चाटवाया कीं लावी इतर हुंगवायास. ॥ ४२

पुनरपि कृष्ण म्हणे 'मी पूर्वीं साहूनि ताप सत्वानें[6], ।
प्रभुतें[7] प्रसन्न करितां झालों निर्दोष तापसत्वानें[8]. ॥ ४३
वदला शंभु, 'असे त्वां शुचि तप केलें धरूनि विश्वास[9]; ।
होसील, अंतरात्मा जैसा, प्रिय तूं तसाचि विश्वास[10].' ॥ ४४
पूर्वील अवतारीं मी बहुतचि मणिमंतपर्वतीं जपलों[11], ।
शरद[12]युतसहस्रांचे सहस्रशत सुदृढ निश्चयें तपलों[13]. ॥ ४५
भगवान् प्रसन्न होउनि, भेटुनि, मज बहुत आदरि[14] द्रवुनी[15], ।
सुख[16] पावलों प्रसादीं, हेमंतीं जेविं बा! दरिद्र उनीं. ॥ ४६

---

१. प्रत्यक्ष सरस्वतीच्या हातावर बसणाऱ्या [आवडत्या] शुकाच्या [=पोपटाच्या] शीलावर (=कंठमाधुर्य व भाषणचातुर्य यांवर) ज्यानें ताण केली आहे असा. सरस्वतीच्या आवडत्या व बोलक्या पोपटाचा शांतिपर्वांतही पंतांनीं उल्लेख केला आहे:—मग आयकवी कृष्णा निजसूक्तिकलाप लाडकी राजा, । प्यावें वाणीकर्णें, करुनी बहुकल पलाड कीरा ज्या ॥ अ० ३ गी० ५९. २. सार्थान्वयः— जैसे प्राचीनांहीं (=प्राचीन कवींनीं किंवा पंडितांनीं) तैसे नवीनांहीं कर जोडिले (=माझें श्रेष्ठत्व कबूल केलें आहे). ३. ममत्वानें संरक्षण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ, अत्यंत मायाळू. ४. नृपश्रेष्ठा धर्मराजा! 'पुंगव' 'शार्दूल' इत्यादि शब्द कर्मधारय समासाच्या अंतीं योजिल्यास त्याचा अर्थ 'श्रेष्ठ' असा होतो. ५. सार्थान्वयः—कीं, (कारण) बहु प्रेम चाटावयास लावी, इतर (=त्याहून कमी दर्जाचें प्रेम) [नुसतें] हुंगावयास [लावी]. पशूंची अशी रीत असते कीं जेथें जास्त ममत्व तेथें ते पशु चाटतात, पण तेंच बातावेताचें दिसल्यास ते नुसतें हुंगतात. ही गोष्ट गाय वगैरे पाळींव जनावरांमध्यें नित्य पहावयास सांपडते. येथें गृत्समद ऋषी शापामुळें हरिण झाले होते व त्या स्थितींत त्यांनीं शंकरास प्रसन्न करून घेतलें आहे, तेव्हां अशा वेळीं साजेल अशीच उपमा व शब्दयोजना पंतांनीं केली आहे, हें मार्मिक वाचकांच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं. ६. धैर्यानें, उत्साहानें. ७. शंकरातें. ८. शुद्ध तपश्चरणानें. ९. भरवसा. १०. जगाला. ११. जप करीत बसलों. १२. शरद्=वर्ष. पूर्वीं शरदृतूपासून वर्षारंभ असे, त्यामुळें 'शरद्' म्हणजे 'वर्ष' असा अर्थ झाला असावा असा विद्वानांचा तर्क आहे. हल्लीं मराठी व्यापारीवर्ष आश्विनाच्या अखेरीपासून म्हणजे शरदृतूच्या अखेरीअखेरीला सुरू होतें. १३. तपश्चरण केलें. १४. बहुमान देता झाला. १५. दयेनें पान्हावून, कळवळून. १६. ह्या उत्तरार्धांतील उपमेस 'दरिद्र' शब्दानें बहारी आली आहे. हिंवाळ्यांत रात्रीं पांघरूण नसल्यामुळें थंडीनें काकडलेल्या दरिद्री मनुष्याला सकाळचें ऊन्ह किती गोड लागेल, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

शंभु म्हणे 'न तव तपीं पाहें मी [1]वामदेव [2]विवरातें; ।
मत्प्रेमा मजकरवीं, पुरवाया काम, देववि वरातें. ॥ ४७
चित्तीं असेल, तें तूं माग सकळ [3]शुद्धभक्तवशगा [4]या.' ।
वदला असें, [5]दयामृतनद [6]लावाया कवींस यश गाया. ॥ ४८
नमुनि शिरें पद, वदलों, '[7]त्वच्चरणप्रियनिवासदारा हो ।
मद्भक्ति, तुझ्याठायीं श्रीमदुमासी शिवा! सदा राहो.' ॥ ४९
देव म्हणे 'दिधलें हें मद्ध्यान समुद्र होउ, मासा हो, ।
[9]मन्मूर्तिसीं जडो बहु दयिता तव भक्ति हो, उमा साहो.' ॥ ५०
तों [10]जैगीषव्य म्हणे, सुलभ प्रभु, [11]काय कष्ट गुण गाया? ।
कथितो स्वानुभव, दिलें '[12]अणिमाद्यैश्वर्य अष्टगुण गा! या.' । ५१
द्याया [13]अजातरिपुला विपुलानंद स्वयें म्हणे [14]गर्ग, ।
'देता झाला अद्भुत सकळकळाज्ञान कीं मला [15]भर्ग. ॥ ५२
तैसेंचि [16]सविनयांचें, [17]धर्मज्ञसभाप्रपादितनयांचें, ।

---

१. शंकर. ह्या विशेषणांतील श्लेष फार मौजेचा आहे. मी वामदेव (=वक्रदेव, वांकडा देव) असतांही, मला तुझ्या तपश्चर्येंत कोठेंही उणेपणा दिसत नाहीं. 'वाम' शब्दाचे दोन अर्थ आहेत, (१) वांकडा, विरुद्ध, शत्रुत्व करणारा; (२) सुंदर. २. विवर=छिद्र, न्यून, कमीपणा, उणेपणा. ३. पवित्र भक्ताला वश असणाऱ्याला हें 'या' ह्याचें विशेषण. ४. या मला, महादेवाला. ५. करुणारूप पाण्याचा नद. नद व नदी ह्यांमध्यें श्रीसूरीमल्लिनाथ ह्यांनीं असा फरक दिला आहे कीं, 'नर्मदेवांचून इतर ओघ उगमाजवळ नद्या होत व मुखाजवळ नद होत.' ह्यावरून 'नद' शब्दांत विशालत्वाची कल्पना आहे, हें उघड आहे. हें पद 'वदला' ह्याचा कर्ता. ६. सुज्ञांनीं [परमेश्वराचे] धन्यवाद गावेत म्हणून. ७. सार्थान्वयः–[हे] शिवा! (शंकरा) मद्भक्ति त्वच्चरणप्रियनिवासदारा (त्वत्+चरण+प्रिय+निवास+दारा=तुझे चरण आवडतें वसतिस्थान जिचें अशी भार्या) हो (होवो) [व] श्रीमदुमासी (श्रीउमेप्रमाणें) तुझ्या ठायीं सदा राहो (नांदो). ८. होवो. ९. सार्थान्वयः–तव भक्ति मन्मूर्तिसीं जडो [व] बहु दयिता (आवडती भार्या) हो (होवो), [व हें] उमा (पार्वती) साहो (सहन करो). स्त्रियांस लोण्याचीसुद्धां सवत खपत नाहीं, या संसारांतील अनुभवावर येथें रोंख आहे. १०. जैमिनि. ११. मग त्याचे धन्यवाद गाण्यास श्रम कसले? अर्थात् नाहीं. श्रमाचें फल प्राप्त झालें, म्हणजे श्रम करण्यास उत्साह येतो. दगदग वाटत नाहीं. पहा 'क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते' कुमारसंभव सर्ग ५. १२. आठ गुण ज्यांत आहेत, असें अणिमादि सिद्धीचें ऐश्वर्य. अणिमा=अतिसूक्ष्मरूप धारण करण्याचें जें सामर्थ्य असतें तें. अष्टसिद्धिः–अणिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशत्व आणि वशित्व. १३. उत्पन्न झाला नाहीं शत्रु ज्याला त्याला; धर्मराजाला. १४. यदुकुलाचा उपाध्याय. १५. महादेव. १६. विनयसंपन्नांचें. १७. धर्मज्ञ+सभा+प्रपादित+नयांचें=धर्म जाणणाऱ्या विद्वान मंडळास संमत आहे आचरण ज्यांचें अशांचें. मागील व हें हीं दोन्हीं उत्तरार्धातील 'तनयांचें' ह्या नामाचीं विशेषणें होत.

एक सहस्र दिलें मज बा! धर्मा! ब्रह्मवादि[1]तनयांचें. ॥ ५३
वर्ष[2]शतायुत दिधलें ससुतास मला युधिष्ठिरा! आयू, ।
[3]बा! युद्धीं, वरदानीं अतुलचि हा योगवन्हिचा वायू. ॥ ५४
त्यावरि पराशर म्हणे, 'मद्वचनातेंहि [4]परिस [5]अनराते, ।
शिवचरण सुरां, असुरां, [6]बहुवरद नरां, तसेच [7]अनरां ते. ॥ ५५
[8]पाहे हाही, पसरुनि प्रभुसि तपःपदर, विप्र भव्यास; ।
झाला सुत सुज्ञ, अजर, अमर, [9]तपःपद, रवि[10]प्रभ, व्यास. ॥ ५६
'[11]कौंतेया! या लोकीं सत्यवती होय अदिति, हा साचा ।
विष्णु स्वयें प्रकटला, कर्ता जगदिष्टसदितिहासाचा.' ॥ ५७
[12]मांडव्य म्हणे, "धर्मा! मी नृपदूतासि भासलों चोर, ।
केलों [13]शूलप्रोत, [14]व्यसन असें प्राप्त जाहलें घोर[15]. ॥ ५८
व्यसनीं वदलों, 'शंभो! अंत पहातोसि काय? बा! धावें, ।
दीनां[16]सि दीनबंधो! दुःख, स्मरतां न पाय, बाधावें.' ॥ ५९
प्रभु दे अभयवर जसा बुडतां [17]अवलंब बाप दे हातें, ।
कळवळुनि म्हणे, 'वत्सा! बाधो तुझिया न ताप देहातें. ॥ ६०

---

१. ब्रह्मविद्येचा खल करणाऱ्या मुलांचें. २. दहा लक्ष वर्षांचें. ३. अन्वयार्थः—बा! युद्धीं [तसाच] वरदानीं (=वर देण्याच्या कामीं) हा योगवन्हिचा वायू (=योगरूपी वन्हीला पूर्ण दशेस नेणारा वायू, महायोगी शंकर) अतुलचि (=अनुपमेय, ज्याच्या तुलेस, पासंगास, कोणीही पुरणार नाहीं असा.) वायू हा अग्नीचा साहाय्यकर्ता होय. ४. श्रवण कर. ५. अजातशत्रो धर्मराजा. ६. पुष्कळ वर देणारे. ७. मानवेतरांस, पशुपक्ष्यांस. ८. सार्थान्वयः—हाही विप्र (मी पराशर ब्राह्मण) प्रभुसि (शंकरास) तपःपदर पसरुनि भव्यास (कल्याणाला) पाहे. ९. तपश्चर्येचें स्थान, तपाचें माहेर. १०. सूर्यासारखा तेजस्वी. ११. सार्थान्वयः—कौंतेया (कुंतिपुत्रा धर्मराजा) या लोकीं (मृत्युलोकीं) सत्यवती (व्यासमाता) अदिति (देवमाता) होय; [आणि] हा (व्यास) जगदिष्टसदितिहासाचा (जगत्+इष्ट+सत्+इतिहासाचा=जगाचें कल्याण करणाऱ्या, अशा उत्कृष्ट इतिहासाचा) कर्ता साचा (खरोखर) स्वयें (स्वतः, प्रत्यक्ष) विष्णु प्रगटला (अवतरला). अर्थात् श्रीमद्व्यास म्हणजे विष्णूचा अवतार होय असा भाव. पहा, 'व्यासो नारायणः साक्षात्.' व्यासांनींच अठरा पुराणें व भारत हीं रचिलीं. १२. एक महर्षि. हा महातपस्वी होता. चोर म्हणून त्यास सुळावर चढविलें होतें; पण खरा चोर सांपडून हा निरपराधी ठरला. १३. शूल+प्रोत=सुळावर चढविलेला. १४. संकट. १५. भयंकर. १६. सार्थान्वयः—[हे]दीनबंधो (गरीबांच्या कैवाऱ्या, गरीबांच्या वाली), पाय न स्मरतां (तुझा धांवा केला नसेल तर) दीनासि दुःख बाधावें. [परंतु धांवा केला असतांही माझें दुःख दूर न व्हावें, हें दीनबंधुत्वास कमीपणा आणणारें आहे.] १७. आधार, टेंका, धर.

सत्वर शूळापासुनि होइल माझ्या वरें तुझी सुटका, ।
तुज कर्मविपाकाचा[1], मज याया[2] शरण, दाविला चुटका[3]. ॥ ६१
आधिव्याधि न शिवतिल तुज, बहुतीर्थाभिषेक[4] घडतील; ।
स्वर्ग दिल्हा अक्षय; तव तेजें[5] भंगोनि षंडरि[6] रडतील. ॥ ६२
अर्बुद[7] वर्षें वत्सा! मत्पदसेवापरा[8]! सुखें वांचें, ।
घे सुख, जें अमृताच्या वरि भूदेवा! परासु खेंवांचें[9]. ॥ ६३
शूलप्रोतीं[10], दर्शन देवुनि, करुणा असी करी राया! ।
पीडा, व्रीडा[11] पावुनि, गेलिच सोडूनियां शरीरा या." ॥ ६४
भगवत्प्रसादकथनें सर्वांहुनि अधिक तोष गालव[12] दे[13]; ।
स्वानुभवातें[14], अमितें हर्षें उत्फुल्ल करुनि गाल, वदे. ॥ ६५
"धर्मा! परिस प्रभुची कथितो तुज शक्ति[15], चाल गालव हा; ।
कोणासहि[16] न म्हणों दे ज्याच्या पदभक्तिचा लगा लव 'हा.' ॥ ६६
श्रीगाधिजमुनिजवळी श्रुतिशास्त्रें[17] सांग[18] सर्वही पढलों; ।
श्रीगुरुपदप्रसादें पदवीस प्राज्ञमंडळीं चढलों[19]. ॥ ६७
गेलों गृहासि, माता धाउनियां माझिया गळां पडली, ।
'असता[20] तव तात, सुखी होतां;' ऐसें म्हणोनियां रडली. ॥ ६८

---

१. दैवदुर्विलसिताचा, दैवाच्या तडाख्याचा. २. यावेंस म्हणून. ३. चुणूक, मासला. ४. पुष्कळ तीर्थांचीं स्नानें. ५. प्रतापानें, सामर्थ्यानें. ६. सहा शत्रु; काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर. भंगोनि=पराभव पावून, हताश होऊन. ७. दाहा कोटी. ८. माझ्या चरणाच्या सेवेंत गढलेल्या. ९. सार्थान्वय: [हे] भूदेवा! (ब्राह्मणा! मांडव्या!) परासु (=पर+असु=गतप्राण, मृत) अमृताच्या खेंवांचें (आलिंगनाचें, वर्षावाचें) जें सुख वरि (घेतो, मिळवितो), [तें तूं] घे(उपभोग). १०. सुळावर चढविलेल्या मनुष्यावर. ११. लज्जा. १२. विश्वामित्र ऋषीचा शिष्य. १३. देताझाला. १४. सार्थान्वय:-अमितें (पुष्कळ) हर्षें (आनंदानें) गाल उत्फुल्ल करूनि (गाल फुगवून) स्वानुभवातें वदे (आपणास आलेला प्रत्यय सांगता झाला.) टीप:-गाल फुगविणें ही गोष्ट आनंदाची तशी रागाचीही द्योतक आहे. पहा महाभारत स्त्रीपर्व. अ० ४. गीति २० व नामरसायन गीति १०९. १५. सामर्थ्य व वर्तनक्रम. १६. सार्थान्वय:-ज्याच्या (ज्या प्रभूच्या) पदभक्तिचा (चरणसेवेचा) लगा (आश्रय) कोणास लवही (यत्किंचित्सुद्धां) 'हा' (हाय हाय) म्हणों न दे (म्हणूं देत नाहीं). १७. वेद व शास्त्रें. १८. शाखा, उपशाखांसुद्धां; समग्र. १९. मान्यतेस पावलों. २०. तुझा बाप जिवंत असता, तर सुखी झाला असता. पुत्र शहाणा झालेला पाहून मातापितरांस आनंद होणें साहजिक आहे.

स्वाधिकसाक्षरपुत्रप्रेक्षणजन्यें[1] महासुखें धाता,[2] ।
म्हणता,[3] 'यश वदतों, मज देता जरि काय बहु मुखें धाता.' ॥ ६९
धैर्यातें[4] अश्रुसहचि ती, करुनि विलाप चिर विविध, वेंची; ।
अर्चि[5] घृतासि, तसि दशा माझ्या हृदयासि विरवि विधवेची. ॥ ७०
गेलों शरण शिवाला, भजलों मी सर्व ताप साहून, ।
बहु मानिलें प्रभुवरें मज त्या त्या सर्व तापसांहून.[6] ॥ ७१
म्हणतां 'माग,' म्हणें मी, 'द्यावें मज्जनकदान;[7] होतां तें, ।
सर्वहि असो; मज मृतें शोकीं मज्जन कदा न हो तातें.' ॥ ७२
'जा भेटेल[9] पिता तुज गुरुभक्तिपरा[8] सुता, तदा नातें ।
निर्वेविल बहु' वदुनि असें, दे देव परांसुतातदानातें.[10] ॥ ७३
आज्ञा होतां, प्रभुतें वंदुनि, आलों गृहासि लवलाहें,[11] ।
लवलाहे[12] हर्षभरें, कीं[13] श्रीपदपद्मधूलिलव[14] लोहे.[15] ॥ ७४
गेलों गृहासिं मी जों स्मरत स्मरतमइना[16] शरण्यातें,[17] ।

---

१. स्वाधिक+साक्षर+पुत्र+प्रेक्षण+जन्यें=आपल्यापेक्षां अधिक विद्वान् अशा पुत्रास पाहून उत्पन्न होणाऱ्या. हें 'महासुखें' ह्याचें विशेषण. २. संतोष पावला असता. ३. सार्थान्वयः–[व] म्हणता (म्हणाला असता) [कीं] 'जरि काय (=जर का) धाता (=ब्रह्मदेव) मज बहु मुखें देता (=ब्रह्मदेवानें जर मला पुष्कळ तोंडें दिलीं असतीं तर) [तुझें] यश वदतों (कीर्ति गाइली असती). आपल्या पुत्राची आपल्याहून अधिक विद्वत्ता पाहून बापाला नुसता संतोषच होऊन राहता न,तर त्या आपल्या पुत्राच्या विद्वत्तेची महती वर्णन करण्यास जर अधिक मुखें मजला ब्रह्मदेवानें दिलीं असतीं तर बरें झालें असतें, असें त्यास वाटलें असतें. 'जरि काय' या शब्दसमूहांत 'काय' हें संभावनार्थी आहे. ४. सार्थान्वयः–अश्रुसहचि (डोळयांतील पाण्यासह) धैर्यातें वेंची (नाहींसें करी). अर्थात् सर्व धीर सुटला व रडून रडून डोळ्यांचें पाणीही आटलें, असा भाव. ५. विधवेची दशा माझ्या हृदयासि तसि विरवि (=वितुळवी) [जशि] अर्चि (अग्निज्वाला) घृतासि (तुपातें) [विरवि] (=वितुळविते). माझ्या आईची स्थिति पाहून माझ्या काळजाचें पाणी झालें, हा भाव. ६. सर्व सुप्रसिद्ध ऋषिवर्यांपेक्षां. ७. मत्+जनक+दान=माझा पिता हेंच दान. अन्वयार्थः–[प्रभूनें]'माग' म्हणतां, मी म्हणें [कीं], मज्जनकदान द्यावें; तें (=जनकदान) होतां (=लाभलें असतां) [इतर] सर्वहि असो (=बाजूस राहो). मृतें तातें (=बापाच्या मरणानें) मज कदा[ही] शोकीं मज्जन न हो (=होवो). ८. पितृसेवेस वाहिलेल्यास. ९. भेट झाली म्हणजे पितापुत्रसंबंध तुम्हांला फार संतोष व सुख देईल. १०. मृत पित्याचे दानाला. ११. झटकर, सत्वर. १२. [हा] लवला आहे, [मी] नम्र झालों आहें, ओथंबलों आहें. १३. कारण. १४. श्री+पदपद्म+धूलि+लव=[देवाच्या] मंगल चरणकमलाचा रजःकण. १५. लाभे. १६. कामरूप अंधःकाराच्या (म्हणजे त्यास नाहींसें करणाऱ्या) इना (=सूर्याला). १७. आश्रयदात्या शंकरास.

तों आला तात, जसा पूर्वी जावूनि ये अरण्यातें. ॥ ७५
ईष्टि करूनि, वनातें जावुनि, घेउनि फैळादि वैन्यातें, ।
आला, बा! अत्यद्भुत, कथितां न गमेल सत्य अन्यातें. ॥ ७६
जितुकें वय, जो वर्ण, ज्ञान जसें, जेंवि कैाय होता, तें ।
सर्व यैथास्थित; वौटे, ठकलों कुतुकार्थ काय हो तातें. ॥ ७७
द्रवला प्रेमें बहुतचि तात मज चिॅरागतास पाहून, ।
वदला, 'नसेल कोठें तप पूजित माझिया तपाहून.' ॥ ७८
'ये वत्सा! ये वत्सा!' ऐसें मज गहिंवरूनि बौहूनी, ।
नॅमितां, माथा हुंगुनि, आलिंगी कडकडोनि बौहूंनीं. ॥ ७९
ऐसें हें अॅत्यद्भुत धर्मा! प्रभुचें वैदान्यपण सॅाचें, ।
शंभुयशें रोमांचित होउनि, वपु होय मित्र पणसाचें. ॥ ८०
बॅहु शोक ताप तैसे सोडुनियां काय गालवा जावे? ।
स्तव जप न कळो, केवळ 'हर! हर! हर!' म्हणत गाल वाजावे." ८१
श्रीकृष्ण म्हणे, "धर्मा! वदला उपमन्यु मुनि असें तो कीं, ।
'परमेश्वरपदभजनें सकळहि पुॅरुषार्थ सुॅलभ या लोकीं. ॥ ८२
शरण शिवासि न जाती, जे तॅामस पापमलिन, रॅाजस जे;
जो शुद्ध चरित सात्विक भवभजना तोचि सॅाधुराज सजे. ॥ ८३
शॅक्रत्व, ब्रह्मत्वहि, विष्णुत्वहि, भक्तिॅतुष्ट भॅव देतो; ।

---

१. होम. २. फळादिक रानांतील पदार्थ. ३. शरीर. ४. जसेच्या तसेंच. ५. अन्वयः—कुतुकार्थ (=विनोदास्तव) तातें (पित्यानें) ठकलों काय हो? [असें] वाटे. पित्यानें जीवंत असून आम्हास मौजेनें फसविलें कीं काय असें वाटलें. ६. फार दिवसांनीं आलेल्यास. ७. हांक मारून. ८. मीं नमस्कार केला असतां. ९. भुजांनीं. १०. अलौकिक. ११. औदार्य. १२. खरें खरें, कळकळीचें. १३. सार्थान्वयः—शंभुयशें वपु (शरीर) रोमांचित होउनि, पणसाचें मित्र होय. फणसावर कांटे असतात त्याचप्रमाणें माझ्याही अंगावर हर्षानें कांटा आला, त्यामुळें माझें शरीर व फणस ह्यामध्यें मित्रत्व (=साम्य) उत्पन्न झालें. ही कल्पना पंतांनीं आपल्या काव्यांत वारंवार योजिली आहे:— स्त्रीपर्व, अ० ५, गीति २, पहा. १४. सार्थान्वयः—बहु शोक [व बहु] ताप गालवा सोडुनियां तैसे जावे काय? (गालवऋषींचा शोकातिशय व मनःक्षोभ जसा आतां नाहींसा झाला तसा नाहींसा होण्यासारखी वस्तुस्थिति होती का? नाहीं. पण केवळ शंकराचें आराधन करून त्यास प्रसन्न करून घेतल्याचें हें फळ होय). १५. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ही पुरुषार्थांची (=जीवितकर्तव्यांची) चौकडी. १६. साध्य. १७. तमोगुणी, अज्ञान. १८. ऐहिक सुखाची इच्छा करणारे. १९. सज्जनश्रेष्ठ; उत्तम, सत्पुरुष. २०. इंद्रपद. २१. भक्तीनें प्रसन्न झालेला. २२. शंकर.

वरदवर[1] दयासागर 'नाहीं' ऐसें कदापि न वदे तो. ॥ ८४
इतरें[2] असो कसातरि आचरणें, सर्वथा भवीं तरतो, ।
जो परमेश्वरभक्त, व्यक्त महामुनिसमान बा! नर तो. ॥ ८५
प्रभुसि मनेंचि शरण जे गेले, ते सर्व[3] अमलनय[4] नाकीं ।
सेविति सुरस महित सुरसम हित होवूनि कमलनयना! कीं. ॥ ८६
मारिल[5] तृषिता, न मिळों देउनि, फोडुनि तडाग, तोय, जना, ।
पापें लिप्त नव्हे, बा! प्रभुच्या जरि काय करिल तो यजना. ॥ ८७
पीडू[6] जना, कळि जसा लाउनि दावा नला, समग्रा, मी ।
जाणें त्या शिवयजनें शुचि, जो दावानलासम ग्रामीं. ॥ ८८
नें[7] म्हणे शिव प्रपन्नां माजी संसारचक्रवशग मती; ।
कीं स्मरहरचरण हरि, ब्रह्मवधाद्यखिल दोष शश, गमती.' ॥ ८९
यदुनाथ म्हणे, 'धर्मा[8]! श्रीशिवपदभजन विश्वपावन गा, ।
सोडुनि यासि, सुरांच्या कोण सुधी जन म्हणेल 'पाव' नगा. ॥ ९०

---

१. वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ. २. सार्थान्वयः–इतरें आचरणें [मनुष्य] कसातरि (=कोणत्याही प्रकारचा) असो, परि बा! जो परमेश्वरभक्त, तो नर व्यक्त (=स्पष्ट) महामुनिसमान सर्वथा भवीं (=संसारांत) तरतो. पाठभेदः–इतर असो कैसातरि आचरणें सर्वथा भवा तरतो. । ३. सार्थान्वयः–ते सर्व अमलनय नाकीं सुरसम (देवांप्रमाणें) महित (संमानित) होवूनि [हे] कमलनयना! हित (हितावह) सुरस (अमृत) सेविति कीं. ४. शुद्ध नीतिमान्. ५. सार्थान्वयः–[जरि] तडाग (तळें) फोडुनि, तोय (पाणी) न मिळों देउनि, तृषिता जना मारिल, बा! [तरि] तो [मनुष्य] पापें लिप्त नव्हे (=होणार नाहीं) जरि काय (=जर का) तो प्रभुच्या (शंकराच्या) यजना (भक्तीतें) करील. सर्वसंग्रहपाठः–मारिल तृषिता न मिळोंदे उनि फोडुनि तडागतोय जना । पापें लिप्त नव्हे बा प्रभुच्या जरि काय तो करी यजना. ॥ शंकरभक्तीचें सामर्थ्य असें आहे कीं, त्या योगें सर्व पापें भस्म होतात, असा सिद्धान्त या व पुढील दोन गीतींत प्रतिपादिला आहे. ६. सार्थान्वयः–जसा दावा लावुनि नला कळि, [तसा]ग्रामीं (=गांवांत) दावानलासम (=वणव्यासारखा) [एकादा मनुष्य] समग्रा जना पीडू, मी त्या (=त्याला) शिवयजनें शुचि (=पवित्र) जाणें. ७. सार्थान्वयः–'माजी (=माझी) मती (=बुद्धी) संसारचक्रवशग (=संसार+चक्र+वश+ग=संसाराच्या फेऱ्यांत सांपडलेली, ऐहिक व्यवहारांच्या आधीन झालेली) [आहे] [असें] शिव प्रपन्नां (=आसऱ्यासाठीं आलेल्या दुःखी प्राण्यांना) न म्हणे (=म्हणत नसतो), कीं (कारण) स्मरहरचरण (=शिवपद) हरि (=सिंह), [व] ब्रह्मवधाद्यखिलदोष (=ब्रह्महत्येसारखीं सर्व पापें) शश (=ससे) गमती (=दिसतात, भासतात). सिंहापुढें सशाचें कांहीं चालत नाहीं त्याप्रमाणें शंकरचरणापुढें अवघ्या पापांचें भस्म होतें, त्यांचा कांहीं एक परिणाम घडत नाहीं. ८. अन्वयः–धर्मा! विश्वपावन (=जगास पवित्र करणारें) श्रीशिवपदभजन (=शंकरचरणाची स्तुति) गा. यासि (शिवपदभजनास) सोडुनि सुरांच्या नगा (देवांच्या वृक्षाला, अर्थात्

शिव चंद्र, चकोरचि, कीं शिव मुदिर, मयूर साधु चातक वा; ।
शिव जीवन, यावांचुनि लवहि न देहांत साधुच्या तकवा. ॥ ९१
आम्हां तुम्हां समस्तां भक्तां द्यावीं अभीष्ट वरदानें, ।
हेंचि वैर व्रैत घेउँनि, उद्धरिले नैत अँनंत वैरदानें.' ॥ ९२
ऐसें अद्भुत केलें श्रीकृष्णें प्रकट सद्यश तपानें, ।
जेणें शुद्ध करावें, घडलीं असतांहि मद्यशतपानें. ॥ ९३
वैदले साधु मयूरा, 'शुकसम गमसी बरा शिशो! भावें;' ।
हरिहरपदार्पित दळहि होउनि जितरत्नराशि शोभावें. ॥ ९४

---

## अध्याय सातवा.

ज्यांतिल कथांहुनि सुधावृष्टि गमे हर्षदा न धर्मातें, ।
हें 'पर्व, यांत सेविति बुध पावुनि हर्ष दानधर्मातें. ॥ १
अन्नोदकभूवस्त्रच्छत्रोपानत्सुवर्णगोदात्या ।
जें पुण्य, म्हणे स्वाधिक गंगा, यमुना, शतद्रु, गोदा, त्या. ॥ २

---

कल्पवृक्षाला) कोण सुधी (=शाहणा) जन 'पाव' (प्रसन्न हो) म्हणेल? [कोणीही म्हणणार नाहीं. शिवपदापुढें कल्पवृक्षही तुच्छ होय, असा भाव.]

१. सार्थान्वयः-शिव चंद्र, साधु चकोरचि; कीं (किंवा) शिव मुदिर (मेघ), [साधु] मयूर वा (किंवा) चातक, शिव जीवन (=प्राणचेतनशक्ति), यावांचुनि (ह्याशिवाय) साधुच्या देहांत लवहि (रतिमात्र) तकवा (सामर्थ्य) न. २. ह्या गीतींत, श्रीकृष्णांनीं इतर शिवभक्तांतच आपली गणना केली आहे, त्यावरून श्रीशिवाची थोरवी व कृष्णाची नम्रता चांगली व्यक्त होते. ३. उत्तम. ४. बाणा अंगीकारून. ५. शरण आलेले. ६. अगणित. ७. वर देणाऱ्या शिवानें. ८. सार्थान्वयः-जेणें (ज्या यशानें) [मनुष्याला] मद्यशतपानें घडलीं असतांही (मद्यपान शतवेळां झालें असतांही) शुद्ध करावें. ९. सार्थान्वयः-'शिशो! (बाळा) भावें (भक्तीनें) शुकसम बरा गमसी (दिसतोस), [ऐसें] साधु (सत्पुरुष) मयूरा (मोरोपंतास) वदले. हरिहरपदार्पित दळहि (विष्णु व शिव ह्यांच्या पायांवर वाहिलेलें तुळशीचें व बेलाचें पानसुद्धां) जितरत्नराशि (मागें सारला आहे रत्नांचा समुदाय ज्यानें असें) होउनि शोभावें. १०. 'पर्व' शब्द याठिकाणीं श्लिष्ट आहे; पर्व=(१) अनुशासन पर्व; यांत दानधर्माचें विवेचन आहे. (२) संक्रांत्यादिक पर्वकाळ; अशा पर्वणींत दानधर्मादि पुण्यकर्में करावींत अशी शास्त्राज्ञा आहे. ११. अन्न+उदक+भू+वस्त्र+छत्र+उपानत्+सुवर्ण+गो+दात्या=अन्न, पाणी, जमीन, प्रावरण, छत्री, जोडा, सोनें व गाई ह्यांचें दान करणाऱ्यास. १२. अन्वयार्थः-त्या (त्या पुण्यास) गंगा, यमुना, शतद्रु (=सरयू) [व] गोदावरी स्वाधिक (आपल्याहून अधिक) म्हणे.